# अनुक्रमणिका.



# प्रस्तावना.



प्रस्तुत काळीं मराठी भाषेचा मार्मिक अभ्यास करण्याची इच्छा अगोदर फार थोड्यांच्या ठायीं दृष्टोत्पत्तीस येते, आणि तसा अभ्यास करण्याचीं उपलब्ध साधनेंही इतकीं थोडीं आहेत कीं, एखाद्यानें त्यांच्या संख्येंत अल्पस्वल्प जरी भर टाकली तरी त्याचा प्रयत्न मराठी भाषेचा अभ्युदय इच्छिणारास अभिनंदनीयच वाटला पाहिजे. कोणत्याही भाषेचें मर्म उत्तम रीतीनें कळण्यास त्या भाषेंतील शब्द, त्यांची व्युत्पत्ति, व्याकरण, संप्रदाय व ह्मणी यांचें चांगलें ज्ञान अवश्य लागतें. मराठी भाषेचा शब्दकोश प्रथम इ० स० १८२७ सालीं छापून निघाला. त्यावर ह्मणण्यासारखा चांगला कोश अद्याप झाला नाहीं! व्युत्पत्तीसंबंधाचीं चार दोन लहान पुस्तकें झालीं, तथापि मोठ्या प्रमाणावर त्याही दिशेनें प्रयत्न व्हावयास पाहिजे आहे. मराठी व्याकरणावर मात्र कै० दादोबा पांडुरंग, कृष्णशास्त्री गोडबोले, कृष्णशास्त्री चिपळूणकर, रामभाऊ गुंजीकर व रा० रामचंद्र भिकाजी जोशी यांनीं बराच विचार करून पुस्तकें लिहिलीं आहेत; पण तेथें एकाचें मत दुसऱ्याशीं न जुळल्यामुळें व्याकरणासंबंधाचा घोंटाळा कायम तो कायमच आहे! संप्रदाय व ह्मणी यांच्याकडे विद्वानांचें लक्ष अद्याप गेलें नाहीं. अर्थ किंवा उपपत्ति न देतां ह्मणींचा नुसता संग्रह एका दोघांनीं या पूर्वीं केला आहे, पण संप्रदायासंबंधानें तर तेवढेंही कोणी केलेलें नाहीं! संप्रदाय व ह्मणी यांचें सोपपत्तिक विवेचन करण्याच्या मार्गांत अडचणीही बऱ्याच आहेत ही गोष्ट कोणालाही कबूल करावी लागेल. एखादा संप्रदाय किंवा ह्मण याचा सामान्यतः गोळाबेरीज अर्थ पुष्कळांना ठाऊक असतो; पण तो शब्दांनीं बिनचूक व्यक्त करण्याला सांगितलें ह्मणजे कित्येकांची कशी तिरपट उडते, आणि एकानें सांगितलेला अर्थ दुसऱ्याला न पटून मतभेद कसा उत्पन्न होतो तें पाहण्यासारखें असतें. कित्येक वेळां एखादा संप्रदाय एका रूपानें एका मुलुखांत प्रचलित असतो, तर दुसऱ्या मुलुखांत त्याचें स्वरूप थोडेंसें भिन्न आढळतें. कोणता खरा व कोणता खोटा मानावयाचा? उपपत्तीचा प्रश्न तर याच्याहून अधिक अडचणीचा आहे. मराठी भाषेंत

संस्कृत, हिंदुस्थानी, गुजराथी अशा निरनिराळ्या भाषांतून संप्रदाय व ह्मणी हीं आलीं आहेत. अस्सल मराठी संप्रदायांप्रमाणेंच या परभाषांतून आलेल्या संप्रदायांच्या व ह्मणींच्या उपपत्तीचा संबंध पुष्कळ वेळां अलिखित अशा एखाद्या दंतकथेशीं, धर्मविषयक समजुतींशीं, आचारांविचारांशीं, समाजाच्या प्रकृतिविशेषाशीं किंवा अनेक शास्त्रीय प्रमेयें आणि सिद्धांत यांच्याशीं असतो. ह्मणून सगळ्या दंतकथा, सगळ्या ऐतिहासिक गोष्टी, कल्पित गोष्टी, पुराणें, धर्मपर व नीतिपर वाक्यें, लोकांच्या समजुती, आचार व शास्त्रें यांचें ज्ञान असल्याशिवाय संप्रदाय व ह्मणी यांची उपपत्ति लावण्यास प्रवृत्त होणें हें धाष्ट्याचें काम आहे. बरें, इतकी सगळी तयारी करून सुद्धां एकानें दिलेली उपपत्ति दुसऱ्याला पटेलच असा काय नेम आहे? कारण, पुष्कळ वेळां एकाच संप्रदायाची किंवा ह्मणीची उपपत्ति निरनिराळे विद्वान् गृहस्थ निरनिराळ्या प्रकारें देतांना आढळतात! त्यांतली सयुक्तिक कोणती, अयुक्तिक कोणती, ग्राह्य कोणती, अग्राह्य कोणती हें ठरवावयाचें कोणीं? येवढी जीवाची यातायात करून आणि शिरावर जड जोखीम घेऊन एखाद्यानें संप्रदाय व ह्मणी यांचें सोपपत्तिक विवेचन करणारें असें पुस्तक लिहून प्रसिद्ध केलें. तर त्याला फाडून खाणारे निष्ठुर टीकाकार आपलीं शस्त्रें पाजळून बसलेच आहेत! या व इतर अडचणींना भिऊन आजपर्यंत या कार्याला कोणीं हात घातला नसावा अशी माझी समजूत आहे.

मराठी भाषेचे संप्रदाय व ह्मणी हा विषय भाषेच्या दृष्टीनें जसा महत्वाचा आहे तसा मनोरंजकही आहे. पण कोणाला? तर ज्याचें मन भाषाविषयांत रममाण होईल त्याला. इतरांना तो रुक्षच वाटावयाचा! यामुळें कादंबऱ्या व नाटकें यांच्या पुस्तकांना जसा लोकाश्रय मिळतो, तसा प्रस्तुत पुस्तकास मिळणें शक्य नाहीं; तथापि अलीकडे कांहीं अंशीं मराठी लेखक व वक्ते यांच्या परिश्रमानें व कांहीं अंशीं एम. ए., म्याट्रिक व स्कूलफायनल या परीक्षांत मराठी भाषेचा प्रवेश झाल्याकारणानें लोकांत मराठी भाषेविषयींची आस्था उत्पन्न होऊं लागली आहे. तेव्हां प्रस्तुत विषयावर केलेल्या परिश्रमाचें पहिलें फळ महाराष्ट्रापुढें मांडण्यास सध्यांचा काळ अधिक अनुकूळ आहे असें वाटल्यावरून पंधरावर्षांपूर्वी माझ्या वडील बंधूंनीं आरंभ केलेलें हें कार्य तडीस नेऊन थोड्याशा अंशांनीं तरी त्यांच्या व मातृभाषेच्या ऋणांतून मी मुक्त होत आहें याबद्दल मला समाधान वाटणें स्वाभाविक आहे.

प्रस्तुत पुस्तकाचा उपयोग हायस्कुलांतल्या विद्यार्थ्यांप्रमाणें ट्रेनिंग कॉले-जांतल्या विद्यार्थ्यांना व सामान्य मराठी वाचकांनाही व्हावा ह्मणून हें पुस्तक मुद्दाम मराठींत लिहिलें आहे. पुस्तकांतलें कोणतेंही प्रकरण एखाद्यानें वाच-लें, आणि मग पुस्तक मिटून, आपणाला काय नवी माहिती मिळाली या गोष्टीचा त्यानें आपल्या मनाशीं आढावा काढला, तर एखाद्या तरी संप्रदाया-ची किंवा ह्मणीची नवी उपपत्ति आपणास कळली किंवा जुन्या परिचयाची उजळणी झाली असें वाटून त्याला आनंद होईल. सदर पुस्तक लिहितांना मला स्वतःला अशा तऱ्हेचा आनंद कित्येकवेळां अनुभवण्यास मिळाला, ह्मणून स्वानुभवावरून हें विधान मी करीत आहें.

या पुस्तकांत विद्यार्थ्यांच्या सोयीसाठीं कोठें कोठें इंग्रजी प्रतिशब्द किंवा वाक्यें दिलीं आहेत. सर्वांनाच इंग्रजी प्रतिशब्द दिले नाहींत. जेथें अगदीं समानार्थक किंवा पूर्णपणें तुल्य असे इंग्रजी प्रतिशब्द आढळले तेथें ते दिले आहेत, जेथें तसे सांपडले नाहींत किंवा नुसतें मराठीचें इंग्रजींत भाषांतर करण्यानें काम भागलें असतें तेथेंही विस्तारभयास्तव हात आंखडता धरावा लागला. जे जे इंग्रजी शब्द दिले आहेत ते ते बहुधा मोलस्वर्थ, क्यांडी व दुसरे इंग्रज पंडित यांच्या ग्रंथांतून घेतलेले आहेत, माझ्या पदरचे नाहींत. एका भाषेंतला संप्रदाय परक्या भाषेच्या द्वारें कधीं तंतोतंत व्यक्त होत नसतो ही गोष्ट लक्षांत ठेवून इंग्रजी प्रतिशब्दांची विशेषशी चिकित्सा सुज्ञ वाचक करणार नाहींत अशी आशा आहे.

आतां शेवटीं हें पुस्तक तयार करण्याच्या व छापण्याच्या कामीं ज्यांचें मला साह्य झालें त्यांचे आभार मानण्याचें माझें अवश्य कर्तव्य मला केलें पाहिजे. माझ्या शाळेंतल्या (नूतन मराठी विद्यालयांतील) शिक्षकांकडून संप्रदाय व ह्मणी यांच्या उपपत्ति निश्चित करण्याचे कामीं मला पुष्कळ साह्य झालें. त्याचप्रमाणें महाराष्ट्रकविचरित्राचे कर्ते रा० जगन्नाथ रघुनाथ आजगांवकर यांनींही हें पुस्तक तयार करण्याचे कामीं पुष्कळ मदत केली. या सर्वांचे मी मनःपूर्वक आभार मानतों.

आनंदकार्यालय, पुणें.
ता. १६।२।१०.

वासुदेव गोविंद आपटे.

# मराठी भाषेचे संप्रदाय व ह्मणी.

## प्रकरण पहिलें.

### संप्रदाय व त्यांची व्याप्ति.

संप्रदाय शब्दाचा अर्थ— कधीं कधीं शब्द, पदें किंवा वाक्यें यांचा उपयोग त्यांच्या मूळ किंवा स्पष्ट अर्थाहूनं भिन्न अर्थानें भाषेंत रूढ झालेला असतो. अशा शब्दांना, पदांना किंवा वाक्यांना संप्रदाय ह्मणतात. उदाहरणार्थ—अजागळ शब्द घ्या. याचा मूळ अर्थ शेळीच्या गळ्याला स्तनासारखे दिसणारे मांसाचे लोंबत असलेले दोन अवयव असा आहे. पण 'रामभाऊसारखा अजागळ माणूस नव्हता बुवा आपण पाहिला ' या वाक्यांत हा मूळ अर्थ नष्ट होऊन त्याचे जागीं 'कर्तृत्वशून्य मनुष्य' असा एक स्वतंत्र अर्थ त्या मूळ अर्थांतून निघाला व तोच पुढें रूढ होऊन बसला. यालाच मराठी भाषेंत संप्रदाय व इंग्रजी भाषेंत Idiom म्हणतात. 'आतां येऊन जाऊन काय तें वतन राहिलें आहे ' किंवा 'ती बोलून चालून स्त्री आहे' या वाक्यांत 'येऊन जाऊन' आणि 'बोलून चालून' या पदांच्या मूळ अर्थांचा पत्ताही न लागतां अनुक्रमें 'वरकड कांहीं नाहीं, काय तें वतन आहे तेवढेंच' आणि 'उघड उघड' अशा रूढ अर्थांनीच त्यांचा वाक्यांत उपयोग करण्यांत आलेला आहे. कधीं कधीं सबंध वाक्यचें वाक्य संप्रदाय ह्मणून योजण्यांत येतें. उदाहरण—'तो नाकावर माशी बसूं देत नाहीं.' या वाक्याचा, तो कोणाचें उणें बोलणें सहन करीत नाहीं, हा रूढार्थ आहे. पण हा अर्थ आला कसा हें पाहण्यास थोडेंसें डोकें खाजविल्याखेरीज गत्यंतर नाहीं. नाकावर माशी बसली असतां नाकाला खाज सुटते, हा आपला नेहमींचा अनुभव लक्षांत घ्यावा, तेव्हां कोठें वरच्यासारख्या वाक्याचा अर्थ लागणार ! ह्मणूनच भाषाशास्त्रज्ञांनीं असे शब्द, पदें व वाक्यें यांना संप्रदाय असें नांव देऊन त्यांचा एक निराळा वर्ग केलेला आहे.

मराठी भाषेंत असे संप्रदाय सुमारें तीन चार हजार आहेत. त्या सर्वांचें सोपपत्तिक विवेचन करण्यास हजार दोन हजार पानांचा ग्रंथ पाहिजे.

इतका विस्तार येथें कर्तव्य नाहीं; तथापि येथें ठळक ठळक संप्रदायांचें थोडक्यांत विवेचन करावयाचें आहे आणि तें काम सुलभ जावें, म्हणून प्रथम कोणत्या तरी तत्त्वावर संप्रदायांचें वर्गीकरण करावयास पाहिजे आहे. असकेंच एक तत्त्व लावून केलेलें वर्गीकरण समाधानकारक व्हावयाचें नाहीं; कारण कित्येक संप्रदायांचें विशेषत्व त्यांच्या व्याकरणाच्या रूपांत असतें; कित्येकांचें त्यांच्या ऐतिहासिक किंवा पौराणिक कथेच्या संबंधांत असतें; समाजस्थितीचें प्रतिबिंब दाखविणारे म्हणून कित्येकांची योग्यता मोठी समजण्यांत येते व कित्येक वाक्याच्या गूढार्थरूप कोशाचें द्वार खोलण्याच्या किल्ल्या म्हणून विद्वान् लोक उराशीं बाळगून ठेवीत असतात. या भिन्नभिन्न प्रकारच्या संप्रदायांना एकाच सूत्रांत ओंवणें प्रशस्त व सोयीचेंही नाहीं. ज्या त्या संप्रदायाला त्याचें रूप व अर्थ हीं पाहून योग्य त्या निरनिराळ्या वर्गांत घालले पाहिजे. प्रस्तुत पुस्तकांत संप्रदायांचे पुढील वर्ग केले आहेतः—

१ व्याकरणाचीं विशिष्ट रूपें, एकाक्षरी शब्द किंवा एकच शब्द यांच्याद्वारें होणारे संप्रदाय.

२ ऐतिहासिक, पौराणिक किंवा इतर कथा यांच्यासंबंधानें झालेले संप्रदाय.

३ संख्यावाचक शब्दांवरून झालेले संप्रदाय.

४ प्राणी, पशु, पक्षी इ० वरून झालेले ,,

५ धर्मविषयक संस्कार व नीति यांसंबंधीं ,,

६ खेळांतल्या परिभाषांवरून झालेले ,,

७ व्यापार, शेती, धंदा वगैरेसंबंधाचे ,,

८ भांडणादि व्यापारावरून झालेले ,,

९ संस्कृत, हिंदुस्थानी, गुजराथी वगैरे इतर भाषांतून आलेले संप्रदाय.

१० ठराविक न्याय.

११ किरकोळ संप्रदाय.

याशिवाय म्हणींच्यासंबंधानें या पुस्तकांत पुढें स्वतंत्र विवेचन केलें आहे, तें त्या जागीं पहावें.

---

# प्रकरण दुसरें.

## व्याकरणाचीं रूपें, एकाक्षरी शब्द, किंवा एकच शब्द यांचे योगानें झालेले संप्रदाय.

**अजागळ**—अजा ह्म० शेळी. तिच्या गळ्याशीं स्तनासारखें मांस लोंबत असतें. याचा तिला किंवा लोकांस कांहींच उपयोग नसतो. त्यावरून ज्याच्यांत कोणतेंच कर्तृत्व नाहीं असा मनुष्य— A worthless person.

असे अजागळासारखे काय बसलांत? तुमच्या पूर्वजांनीं केलेले शोध, संपादलेली विद्या आणि मिळविलेला लौकिक या भांडवलावर जर तुह्मांला कांहींच उद्योग करतां येत नसेल, तर तुमची आजची निकृष्ट दशा हीच तुमच्या जन्मोजन्मीं रोकडी ठेवलेली आहे ह्मणून समजा. —आगरकर.

त्याच्याबरोबर आलेला गृहस्थ तर निवळ अजागळ, होस हो देणारा. दिसला. —पण लक्षांत कोण घेतो!

**अतिरथी महारथी**—एकापेक्षां एक पराक्रमी पुरुष (असंख्यात योद्ध्यांशीं एकटा लढणारा तो अतिरथी, आणि दशसहस्र धनुर्धरांबरोबर एकटा लढण्यास समर्थ तो महारथी) Mighty warriors.

तेथें मोठे मोठे अतिरथी महारथी पडले आहेत, त्यांस कोणी पुसेना, मग मला गरिबाला कोण पुसतो?

**अर्धचंद्र**—गचांडी देतांना जी देणाराच्या हाताचा आकार अर्धचंद्रासारखा असतो, त्यावरून गचांडी असा अर्थ.

फक्त घरांत जावयाचें आणि अर्धचंद्राचा उपयोग करून तिला बाहेर काढावयाचें. —फाल्गुनराव.

भाषा सुधारण्याचें व लोकांत ज्ञानप्रसार करण्याचें काम जरी हातीं घेतलें, तरी तें सिद्धीस नेण्यास 'याची गचांडी धर, त्याची गचांडी धर' याप्रमाणें वारंवार अर्धचंद्र प्रयोग करण्याचें कांहीं विशेष कारण दिसत नाहीं. —निबंधमाला

**अर्धांगी**—पत्नी. भार्या ही पतीच्या पुण्यार्धाची विभागिनी असते, ह्मणून तिला अर्धांगी म्हणतात. इंग्रजींत 'Better half' या शब्दाचा अर्थ अर्धांगी असाच आहे.

उदा० लक्ष्मी ही विष्णूची अर्धांगी. ' अर्धांगी पार्वती सुमनाच्या माळा ।

**अद्वातद्वा**–ताळतंत सोडून, मनस्वीपणानें. (मूळशब्द-यद्वातद्वा) Wild.

**अंधेर नगरी**–ज्यां नगरींत अंधेर ( काळोख ) आहे ह्म० न्याय अन्याय यांचा विचार नाहीं, प्रजेची दाद लागत नाहीं अशी नगरी. अर्थात् बेबंदशाहीचें राज्य.

बाळाजीपंतास आतां वाटलें कीं, या अंधेर नगरी व छोटिंगपाच्छाईत आतां राहून उपयोगी नाहीं. –बाजीराव.

**अमृतसिद्धियोगः**–ज्या दिवशीं क्रमानें हस्त, श्रवण, अश्विनी, अनुराधा, पुष्य, रेवती व रोहिणी या नक्षत्रांचा योग झालेला असतो, त्याला अ० म्हणतात. हा काल फार शुभ गणिला आहे. A very auspicious moment.

**अरण्यरोदन**–अरण्यांत रडलें ओरडलें तरी तें कोण ऐकतो ! यावरून निष्फळ तक्रार किंवा आक्रोश असा अर्थ. A cry in the wilderness.

अशा अल्पमति लोकांना ताळ्यावर आणण्याची खटपट करणें ह्मणजे अरण्यरोदनवत् आहे. – निबंधचंद्रिका.

**अरेराव**–गर्विष्ठ मनुष्य, आपल्या इच्छेस येईल तसा कारभार करणारा मनुष्य, इतरांसंबंधानें बेपर्वाईनें वागणारा मनुष्य. A braggadocio.

आह्मी येवढे अरेराव असून बाजीरावाच्या कैदेंत सांपडलों कसे हें रडगाणें जो तो गात बसला. –बाजीराव.

**अलबत्यागलबत्या**–कोणी तरी, साळकोजी माळकोजी. ( थोरामोठ्यानें कांहीं ह्मटलें तरी त्याला ' अलबत् असेंच असलें पाहिजे ' अशा रीतीनें होसहो लावणारे असतात ते अलबत्ते. गलबत्ते हें केवळ नादसादृश्यामुळें आलें आहे. ) An insignificant fellow.

**अलंदुनिया**–हा फारशी शब्द आहे. अलं=सर्व; दुनिया=जग; सगळें जग. The whole world.

तुमच्याशिवाय हें कृत्य झालें नाहीं हें मीच काय, पण अलंदुनिया ह्मणत आहे.

**अलीजा दरबार** ( कारखाना )–अलिजा=फारच मोठा आणि वैभव-

झाली; यावरून पुढें अव्यवस्थित आणि अंदाधुंदीचा असाही अर्थ झाला. A magnificent but ill-managed affair.

ही अलीजाही आह्मांस पुरती भोंवून तिनें अगदीं अन्नास मोताद करून टाकलें आहे. —केसरी.

**अष्टपैलू**– अष्ट+पैलू ( हिऱ्यास घासून कोन पाडतात त्यातला दोन कोनांमधील सपाट भाग; ) त्यावरून व्यवहारचातुर्यादि अनेक गुणांनीं युक्त असा मनुष्य असा अर्थ. A versatile person.

**अष्टाधिकार**– अष्ट+अधिकार; पुष्कळशीं कामें.

एका खणाचे खोलींत सगळे अष्टाधिकार ( ह्म० खाणें, पिणें, उठणें, बसणें, निजणें इ. ) करूं म्हणतां, पण ते होतील कसे ?

**असा तसा**– सामान्य कोटींतला. So so; of moderate intelligence or ability.

**असाच**– निकृष्ट प्रतीचा. Of indifferent quality, so so.

तो सेनापति आपला असाच होता !

**अस्मादिक**– संस्कृत भाषेंत अस्मत् ह्म० आम्ही. यावरून कोणत्याही गोष्टींविषयीं स्वतःची असाधारण योग्यता वर्णावयाची असल्यास प्राकृत जन ‘ आह्मी ’ बद्दल ‘ अस्मादिक ’ शब्दाची योजना करतात.

अस्मादिक होते म्हणूनच या थराला गोष्ट आली; नाहीं तर तुमची धडगत नव्हती.

**अस्मानी सुलतानी**–फारशी भाषेंत अस्मान ह्मणजे आकाश व सुलतान ह्मणजे बादशहा असे अर्थ आहेत. त्यावरून नैसर्गिक व जुलमी राजांनीं आणिलेलीं संकटें किंवा केलेला जुलूम असा अर्थ. Heavenly and regal visitations.

जेथें अस्मानी सुलतानी एकदम येऊन कोसळतात, तेथें बिचारा माणूस काय करणार !

**अक्षरशत्रु**–ज्यास अक्षरओळखसुद्धां नाहीं तो; शिकण्याची आवड नसल्यामुळें जन्मभर अशिक्षित राहिलेला. An illiterate person.

‘ शिवाजीमहाराज अगदीं अक्षरशत्रु होते असें पुष्कळांनीं म्हटलें आहे, पण तें खरें नाहीं. ’

**आखाडसासरा**–आषाढ+सासरा. आषाढाच्या महिन्यांत सुनेनें सासऱ्याचें तोंड पहावयाचें नसतें, ह्मणून तिला दुसऱ्या कोणाकडे ठेवितात. तो

परका माणूस तिच्यावर सासऱ्यासारखा अधिकार गाजवूं लागला ह्मणजे त्याला आखाडसासरा ह्मणतात; यावरून अधिकार नसतांना तो गाजवूं पाहणारा मनुष्य असा अर्थ. (याच अर्थानें नसता उपदेश किंवा छळ करणाऱ्या स्त्रीला आखाडसासू ह्मणतात.)

मोठा मेला आखाडसासरा उपदेश करायला आला आहे !

**आगापिछा**– आगा=पुढला भाग; पिछा=मागला भाग. यावरून वडील माणसें व संतति अशा दोन्ही पिढ्या असा अर्थ.

श्रीधरपंताला आतां आगापिछा कांहीं नाहीं, मग त्यांनीं आपली संपत्ति एखाद्या धर्मकार्याला कां देऊन टाकूं नये ?

**आतुरसंन्यास**–ह्या दुखण्यांतून आपण उठत नाहीं, खास मरणार; असें दिसल्यानंतर जो संन्यास घेतात तो.

**आर्ष**–या शब्दाचा मूळ अर्थ ऋषिसंबंधीं किंवा ऋषींनीं केलेलें असा होता. ऋषींनीं केलेल्या ग्रंथांत व्याकरणाच्या नियमांना सोडून जे प्रयोग आहेत त्यांना आर्ष प्रयोग ह्मणतात. यावरून ठाकठिकीचा गुण ज्यांत नाहीं, जो अव्यवस्थित चित्ताचा व मंद आहे, त्याला आर्ष ह्मणूं लागले. Dull, silly, untidy.

**आहे आहे नाहीं नाहीं**–केवळ आहेच असें ह्मणतां येत नाहीं व नाहीं असेंही ठासून सांगतां येत नाहीं अशा ठिकाणीं या ह्मणीचा उपयोग होतो. Having a semblance of a thing.

अशौचामध्यें स्नानसंध्या ह्मणजे काय, आहे आहे नाहीं नाहीं.

**उठतां बसतां**–प्रतिक्षणीं. Ever and anon.

उठतां बसतां जर असें मुलाला मारूं लागलां तर तो कोडगा होईल.

**उठल्या बसल्या**–घडीघडी, क्षणोक्षणीं, पहावें तेव्हां. 'अहो जातां येतां उठत बसतां कार्य करितां' या वामनी श्लोकांत 'उठत बसतां' याचा अर्थ 'उठल्या बसल्या' असाच आहे.

**उठल्या सुटल्या**–वारंवार. Frequently.

असें उठल्या सुटल्या लोकांच्या दारीं उसनें मागायला जाण्यापेक्षां अडचण काढणें बरें नाहीं काय ?

उडत उडत– १ पक्की निर्धारपूर्वक नव्हे, तर कर्णोपकर्णी आलेली. A *flying* report. २ संक्षिप्तपणें ( उदा० सगळी कथा सांगण्यास वेळ नाहीं सबब उडत उडत सांगतों. )

उपटसुंभ– कोणत्याही धंद्यांत, किंवा कामांत थोडा वेळ राहून त्यांत वर्चस्व मिळविणारा; चंचल आणि लटपटी; An upstart.

नुकतेच परलोकवासी झालेले सातारचे जंगलीमहाराज यांना सरकार ५०० रुपये माहेवारी पेन्शन देत होते. तेव्हां तर ते उपटसुंभ नव्हतेना ? –केसरी.

एळकोट–खंडोबाचे भक्त सर्वजण मिळून तळी उचलतांना 'एळकोट मल्हार' असें ह्मणतात, आणि तळी उचलण्यास हात लावतात. मूळशब्द– एळ=सात (कानडी भाषेंत ) + कोट=कोटि; पुष्कळांनीं मिळून केलेला; त्यावरून या शब्दाचा अर्थ निंद्य असा संयुक्तप्रयत्न अथवा गोंधळ. A combined effort.

ओनामा–मुलें लिहावाचायला शिकूं लागलीं ह्मणजे 'ओ ना मा सी ध म्' हीं अक्षरें प्रथम शिकतात. त्यावरून पहिला धडा असा अर्थ. The A. B. C. of.

परशुरामभाऊंना चवदावें वर्ष लागतें न लागतें तोंच त्यांनीं लढाईचा ओनामा पूर्णपणें शिकून परीक्षा दिली आणि सर्वांना थक्क करून सोडलें.

कचकच–माणसें दांत खाऊं लागलीं ह्मणजे कचकच असा आवाज होतो. यावरून परस्परांवर दांत खाणें अर्थात् भांडणें असा अर्थ.

नरसोपंतांनीं घरांत पाऊल ठेवण्याचाच काय तो अवकाश होता. तों इतक्यांत सासूसुनेची कचकच चाललेली त्यांच्या दृष्टीस पडली. –करमणूक.

कच्छपीं लागणें– मूळ अर्थ– एखाद्याचा कासोटा धरून मागोमाग जाणें; ह्मणजे एखादें काम करून घेण्यासाठीं समर्थाचा आश्रय करणें अथवा त्याच्या तंत्रानें चालणें. ( कच्छप = कार्य असा अर्थ कै० परशुरामपंततात्या गोडबोले देतात. ).

कंबखती–[ फारशी भाषेंत कम = वाईट; बखत ( वख्त )= वेळ ] यावरून दैव फिरल्यामुळें जी आपत्दशा येते ती. Misfortune.

कम्बखती आली आतां. पण डरून काय उपयोग ? –नाटिका.

कपि–मंडळीमध्यें इतरांपेक्षां वयानें व अनुभवानें जो प्रौढ असतो

त्यास थट्टेनें ह्मणतात. (हनुमान् हा चिरंजीव अर्थात् सर्वांहून वृद्ध व तो कपि आहे यावरून हा संप्रदाय निघाला.)

**कर्णपिशाच**– मंत्रसाध्य असें एक पिशाच आहे. तें भूतवर्तमानादिक वृत्त आपल्या उपासकाचे कानांत अदृश्य रूपानें सांगतें असा समज आहे.

मला तुझें सारें कृत्य कर्णपिशाच्यानें सांगितलें. –फाल्गुनराव.

**कर्दनकाळ**– सर्वांचा संहारकर्ता व क्रूर असा शत्रु; उग्र व तापट स्वभावाचा पुरुष. A deadly foe; a hot-tempered person.

मराठे ह्मटले ह्मणजे मोगल, रोहिले, पठाण, रजपूत वगैरेंना कर्दनकाळासारखे वाटत. –लोकहितवादी.

आजेसाम्बाई पुन्हा घरांत पाय घालूं देणार नाहींत अशा कर्दनकाळ आहेत. –पण लक्षांत०

**कर्मकटकट**– प्रारब्धयोगानें कंटाळा येण्याजोगें जें कर्म गळ्यांत पडतें तें.

संध्यावंदन, व्रतवैकल्य, श्राद्धादिक खटाटोप इ. सारी कर्मकटकट ह्मणून ती फेंकून द्यावी असें कित्येक ह्मणतात.

**कर्मधर्मसंयोगानें**– प्रारब्धयोगानें Accidentally; by chance.

कर्मधर्मसंयोगानें तुमची गांठ पडली आहे, तर गोड बोलून काळ लोटावा.

**करतलामलकवत्**– हातांतल्या आवळ्याप्रमाणें अगदीं सुलभ; हस्तगत असलेल्या वस्तूप्रमाणें वाटेल तशी खेळवितां येणारी वस्तु (भाषा, विद्या इत्यादि).

महाराष्ट्र व संस्कृत या दोन्ही भाषा मोरोपंताला करतलामलकवत् होत्या. –निबंधमाला.

**काकरव**– = कावळ्यांची कावकाव; निंदकांची ओरड.

ज्यास आपली योग्यता यथार्थ भासत असेल, त्यानें...... कर्णकटु काकरवाची अगदीं पर्वा करूं नये. –निबंधमाला.

**कांकणभर**–थोडेंसें अधिक.

नानापेक्षां बापू कांकणभर अधिक शहाणे होते; पण एककल्लीपणाच्या वागणुकीमुळें, त्याच्या शहाणपणाचा उपयोग स्वराज्यास फारसा झाला नाहीं.

**(त्याचा) काका दुसरा**– येथें 'काका' शब्दाचा 'त्याच्यासारखा दुसरा कोणी' इतकाच अर्थ आहे.

**काडीचा**– काडीइतका देखील; यत्किंचित् देखील. Not the least

'नाटकवाल्यांत काडीचा देखील गुण नसतो.' –विकारविलसित.

**काशीकर**– पक्का धूर्त. A clever and cunning fellow.

**( अमक्या अमक्याचा ) काळ**– नाश करणारा.

अग्निहोत्राचा सुकाळ। वडापिंपळासी काळ। –एकनाथ.

**कूपमंडूक**– आडांत राहणाऱ्या बेडकाचें सारें जग ह्मणजे त्या आडांतली संकुचित जागा. त्याप्रमाणें जो आपलें घर किंवा गांव सोडून कधीं बाहेर न जाणारा, आकुंचित मनाचा माणूस, त्याला 'कूपमंडूक' ही संज्ञा देतात. A person who has had no experience of the world at large.

**कोटकल्याण**=( कोटि + कल्याण ) पराकाष्ठेचें किंवा पूर्ण कल्याण. ( समाधान. ) A state of perfect gratification.

ज्या महाग्रंथावरून शूद्र जातींचें कोटकल्याण होणार ... त्या ग्रंथाचें स्वरूप वर वर्णिलेंच आहे. –निबंधमाला.

**कोरड्यास**– भाकर वगैरे नुसती कोरडी खाववत नाहीं ह्मणून वरण, भाजी, किंवा दुसरें एखादें कालवण । अर्थ या शब्दांत सूचित आहे. हा शब्द चतुर्थ्यन्त असतां आतां त्याचा उपयोग 'कालवण' अशा अर्थानें स्वतंत्रपणें होतो.

आज कोरड्यास काय केलें आहे?

**कोरा करकरीत**– बूट, जोडा, वहाण हीं अगदीं नवीं असतात तेव्हां चालतांना करकर आवाज देतात. यावरून अगदीं नवी उपयोगांत न आणलेली वस्तु असा अर्थ. Brand new.

बापानें त्यास इतकें शिक्षण दिलें, पण शेवटीं पहावें, तों बेटा आपला कोरा करकरीत! ( शिक्षणाचा परिणाम मनावर न झालेला. )

**कोल्हेकुई**– क्षुद्र लोकांची ओरड.(कोल्हे 'कुई कुई' असा शब्द करतात.)

सुज्ञ आहेत ते दूषकांच्या तोंडीं लागत नसतात; जर कोणाचा आक्षेप खरा असेल, तर तेवढा स्वीकारून बरकड कोल्हेकुईकडे बिलकुल लक्ष देत नाहींत. –निबंधमाला.

**खरवड**– सोडसाळ माणूस ( मूळ अर्थ– दूध वगैरे पदार्थ तापविले किंवा

आटविले असतां खरवडून काढण्याजोगा जो अंश भांड्याच्या बुडास चिकटून राहिला असतो तो, अर्थात् निकृष्ट भाग. )

सोनी ना ? आहे माहीत ! साऱ्या मुलखाची मेली खरवड ! ती कोणाला माहीत नाहीं ?

**खुशालचंद**– चैनी ख्याली खुशालींत दिवस घालविणारा मनुष्य.

**खोगीरभरती**– आंत चिंध्या वगैरे निरुपयोगी पण मऊ वस्तु भरून खोगीर केलेला असतो. त्यावरून वास्तविक उपयोग नसतां केवळ संख्या फुगविण्यासाठीं घेतलेले असा अर्थ. कसलीं तरी निरुपयोगी माणसें किंवा वस्तू आणून केलेली भरती. Bulky and worthless things.

निजामाच्या फौजेंत चांगले लढवय्ये असे थोडे होते, खोगीरभरतीच फार होती.

**ग**–गर्व, अहंमन्यता, वृथाभिमान. Conceit.

विद्यापर्वताची चढण अगोदर कठिण, त्यांत पायथ्यापासून 'ग' महाराज पाठुंगळीस चिकटल्यावर मोठा खंबीर चढणारा असला तरी त्याची किती मजल होणार ! –निबंधमाला.

**गंगाजम्नी**–प्रयाग येथें गंगा आणि जम्ना ( यमुना) यांचा संगम होतो. तेथें दोन्ही नद्यांच्या पाण्यांच्या रंगाच्या भिन्नतेमुळें दोहींचे प्रवाह एकत्र झाल्यानंतरही स्पष्ट दिसतात. त्यावरून दोन निरनिराळ्या आणि परस्पर विरोधी वस्तूंचें मिश्रण असा अर्थ.

'परस्परविरोधी असे इंग्रजी मराठी विचार एकत्र करून गंगाजम्नी पुस्तक करण्यापेक्षां... ... नवीनच पुस्तक लिहिणें बरें.' –विकारविलसित.

**गंडांतर**–आपलें अस्तित्वच नाहींसें होतें कीं काय, अशी भीति उत्पन्न करणारें संकट. गंडांतर हा शब्द फलज्योतिषशास्त्रांत 'अपमृत्यु' या अर्थानें फार प्रसिद्ध आहे.

विविधज्ञानविस्ताराच्या दैवदुर्विपाकामुळें त्याच्यावर अनेक गंडांतरें आलीं.
–विविधज्ञानविस्तार.

**गटारयंत्र**–गांवांतील कुटाळ लोकांची चकाट्या पिटीत बसण्याची चवाठ्यावरील जागा.

एक दोन वृत्तपत्रकारांनीं या महाराजांचें जें इतिवृत्त दिलें आहे, तें वाचलें असतां गटारयंत्रावरील......भटांस जितकी त्यांच्या व्यवसायाखेरीजची माहिती असते तशीच माहिती या लेखकांना असावी असें दिसतें —वि. ज्ञा वि.

**गद्धे मल्हार**– गाढवाच्या आरडण्यासारखें वाईट कर्कश गाणें. मल्हार हें गाण्यातल्या रागांपैकीं एका रागाचें नांव आहे.

**गर्भश्रीमंत**– वाडवडिलांपासून ज्यांचे घरांत श्रीमंती आहे असा मनुष्य. Born to riches and honors.

**ग्रंथ**– १ बत्तीस अक्षरांचा समुदाय; २ अकांडतांडव.

भागवत अठरा सहस्र ग्रंथ आहे (ह्मणजे त्यांत ३२ × १८००० इतकीं अक्षरें आहेत.)

'मुलगा कां रडतो?' येवढं मीं विचारलें; पण त्यावर त्या बाईनें जो ग्रंथ केला तो कांहीं पुसूं नये!

**गाजरपारखी**– गाजरांची पारख करण्याला कांहीं विशेषशी अक्कल लागत नाहीं. यावरून ज्याला कोणत्याही गोष्टीची पारख नसते त्याला 'गाजर०' ह्मणतात. A jackanapes.

आह्मां पुरुषांची जात अशी गाजरपारखी आहे! –कीचकवध.

**गुरुकिल्ली**– मर्म, रहस्य. गुरूनें सांगितल्याशिवाय जें कळत नाहीं तें. The secret; a mystery.

प्रकरण जरा जड आहे; पण तुझ्यापासून तिला नरम करण्याची गुरुकिल्ली आतां शिकलोंच आहें. –त्राटिका.

**गुरुमंत्र**– युक्ति सांगणें; अमुक प्रकारानें वाग ह्मणजे यशस्वी होशील, असें गुप्त रीतीनें सांगणें.

**गृहच्छिद्रें**– घरगुती गोष्टींसंबंधीं दोष; खासगी दोष.

श्रीमंतांच्या घरोघर दुराचार व गृहच्छिद्रें किती असतात हें जवळ जवळच्या लोकांस तरी पूर्णपणें विदित असतें. –निबंधमाला.

**गोगलगाय**– अगदीं निरुपद्रवी प्राणी. Mild; inoffensive.

कृष्णाजीपंत एवढे कर्दनकाळ ना? पण बायकोपुढें अगदीं गोगलगाय होतात.

**गोडीगुलाबी**– सख्यभाव. Friendly relation.

**गोमाजी-तिमाजी**– कोणी तरी मनुष्य, अ आणि ब. 'कोणी तरी उठावें आणि कोणा तरी माणसास लुटावें, ह्मणजे केवळ झोटिंगपाच्छाईच

होय' या वाक्यांत 'कोणी तरी' व 'कोणा तरी' यांच्या जागीं गोमाजी आणि तिमाजी हे शब्द घातले तरी अर्थांत बदल होत नाहीं.

गोमाजीनें उठून तिमाजीच्या घरावर दरवडा घालावा... हा प्रकार जितका दुष्ट-पणाचा आहे, तितकाच... हजारों माणसांचे लढाईंत प्राण घेणें... हा आहे.

–निबंधमाला

**गोरजमुहूर्त**– रानांत चरावयासाठीं सोडलेल्या गाई घरीं येण्याच्या वेळेचा ह्मणजे सूर्यास्त होण्याच्या सुमाराचा मुहूर्त.

**गौडबंगाल**– मंत्रविद्या, जादूचा खेळ; बुद्धीनें आकलन न होण्याजोगी गूढ गोष्ट किंवा कृत्य; पूर्वी गौड व बंगाल हे देश मंत्रतंत्रविद्येसंबंधानें प्रसिद्ध होते. त्यावरून हा शब्द झाला आहे. Tricks; deep plots.

निजाम एक ठक तर बाजीराव सात ठक होता. त्याच्यापुढें त्याचें गौडबंगाल कसचें चालतें!

–बाजीराव.

**घमंडानंदन**– शरीरानें सुदृढ असून जेवावयास पुष्कळ मिळालें ह्मणजे इतर कोणतीही काळजी न करणारा; मुंबईतला सोकाजी; घमेंडखोर.

आतां एखाद्या घमंडानंदनाची साक्ष दिली पाहिजे. –गुप्तमंजूष.

**घरकोंबडा (घरकुबडा)**– आपलें घर सोडून कोठें बाहेर जाण्याचा कंटाळा करणारा. घरीं बसून ज्याला कुबड आलें आहे असा. A house-bird.

**घरबसल्या**– कोठें बाहेर न जातां.

**घेलाशेट**– हमाल्या मनुष्य; उलाढाली करून व्यापार चालविणारा मनुष्य.

**घोडनवरा**– बऱ्याच मोठेपणीं लग्न करण्यास तयार झालेला.

**चटकचांदणी**– खुपसुरत स्त्री. नक्षत्रासारखी सुंदर.

रुचिपरत्वेंकरून जगांत हरएक प्रकरणीं कृतिभेद आढळतो;......दोघीही रूपानें चटकचांदण्या असतील; पण एकीस माणिकमोत्यांनीं आपणांस लेवविण्याची हौस असेल (दुसरीस नसेल).

–निबंधमाला.

**चर्वितचर्वण**– चावलेलें पुनः चावणें, म्हणजे ज्याविषयीं एकदां खल झाला आहे, तो विषय पुनः चर्चेला हातीं घेणें. To reiterate a thing already discussed.

**चापटपोळी**— चापट; उदा०— 'मीं रामास पुष्कळशा चापटपोळ्या दिल्या ' म्हणजे मीं त्यास चापटरूपी पोळ्या खाऊं घातल्या. चापटपोळ्या हा शब्द ' धम्मकलाडू ' ह्या शब्दाप्रमाणें, थट्टेनें वापरतात. पोळी रुंद्ट असते तशी चापटही असते; ह्या साम्यावरून चापटीला पोळीची उपमा दिली आहे. A slap.

**चार खुंट जहागीर**— चार खुंट ह्म० पृथ्वीचे चारी कोपरे; यांची जहागीर म्हणजे पृथ्वीवर हवें तिकडे भिक्षा मागण्याची मोकळीक. Ample domain of the beggar.

**चालतां बोलतां**— अल्पकाळांत; Quickly, promptly.

**चाळीशी**— मनुष्याच्या वयाला चाळीस वर्षें झाल्यानंतर त्याच्या दृष्टीला येणारें मांद्य. त्यावरून तें मांद्य घालविण्याकरितां लावण्याचा चष्मा असाही अर्थ झाला. उदा० विष्णुपंतांना आतां चाळीशी लागूं लागली आहे.

**चिन्ह**— खोड्या करणारा. A mischievous child.

हा मुलगा ह्मणजे एक चिन्हच आहे!

**चिरंजीव**— मुलगा. ( चिरं = दीर्घकालपर्यंत + जीव = जग. असा आशीर्वाद ज्यास द्यावयाचा तो. )

पण आपले चिरंजीव आपणास उलट लिहिणार नाहींत कशावरून!

—पण लक्षांत०

**चुकारतट्टू**— कामांत कुचरपणा करणारा. One evading one's duty.

**छांदिष्ट**— मूळ शब्द छंदस् = वेद. वेदांत हल्लींच्या व्याकरणाच्या नियमांहून भिन्न अशीं पुष्कळ रूपें आहेत. त्यावरून छांदस ( छांदिष्ट ) ह्म० नियमाला सोडून वागणारा, स्वैर वर्तन करणारा, असा अर्थ झाला.

**जडीबुट्टी**— औषधी मुळ्या, पाला वगैरे. त्यावरून गुणकारक वस्तु अथवा जादू असा अर्थ झाला.

खरंच! कायहो एवढी जडीबुट्टी आहे तुमच्याजवळ? —पण लक्षांत०

मंत्रयंत्र संध्या करिसि जडीबुटी।
तेणें भूतसृष्टि पावशील॥ —तुकाराम

**जन्मजन्मांतरीं**– सगळ्या जन्मांतें. During all one's births.

एक वेळ खोटें बोलल्यानें जन्मजन्मांतरीचें पुण्य नष्ट होतें.

**जन्मादारभ्य**– जन्मात् + आरभ्य; जन्मापासून आतांपर्यंत. Since one's birth.

जंन्मादारभ्य खाणावळींत जेवण्याचा हा पहिला प्रसंग!

**जरीपटका**– मूळ अर्थ– पेशव्यांचें मुख्य निशाण; मुख्य खूण.

इन्स्पेक्टरसाहेबांचा जरीपटका पुढें आला आहे. स्वारी लवकरच येईल असें दिसतें.

**जातीचें**– अस्सल; खरें नाणें.

तुका ह्मणे तेथें पाहिजे जातीचें।
येरा गव्हाराचें काम नोहे ॥ —तुकाराम.

**जांवईशोध**– ही ह्मण एका मूर्ख जांवयाच्या गोष्टीवरून निघाली आहे. जांवईबुवांना एक कविता दाखविली. तिचा अर्थ त्यांना नीट लागेना. तेव्हां ती चुकली आहे असें सांगून त्यांनीं तींत फिरवाफिरव करून ती उलट अशुद्ध करून ठेविली. यावरून भलतीच फिरवाफिरव हा अर्थ.

**जिवाजीपंत**– जीव; वेदांतपर ग्रंथांत असा उल्लेख पुष्कळ आढळतो. ( तसेंच– मनाजीराव. )

मनाजीराव निघून जातो, जिवाजीपंतास जाब देणें भाग पडतें.

**जेसतेम** – हा शब्द गुजराथी आहे. याचा अर्थ कसा तरी. Somehow or other.

त्यानें जेमतेम काम शेवटास नेलें इतकेंच; बाकी काम व्हावें तसें झालें नाहीं हें दिसतेंच आहे.

**जो तो**– प्रत्येकजण.

जो तो असें ह्मणतो वगैरे.

**झोटिंग बादशाही**–बेबंद राज्यकारभार, अव्यवस्थितपणानें चालविलेला कारभार; Tumultuous proceedings; wild confusion.

**टुकटुक माकड**– मुलें आपण स्वतः पदार्थ खात असतां दुसऱ्या मुलास वांकडें बोट करून वाकुल्या दाखवितांना ह्मणण्याचा शब्द. To balk and make angry by playing off a fun.

टोळभैरव– टोळासारखे नासाडी करीत उगाच हिंडणारे दांडगेश्वर; गांवगुंड. Wild or reckless youths.

दोन वेळां जेवण्यापुरते कायते घरांत; एरवीं टोळभैरव गांवांत हिंडत आहेत. अशांना घरच्या माणसांनीं बाहेरचा रस्ता दाखविला तरच ते शुद्धीवर येतात.

ठणठणपाळ– द्रव्य आणि विद्या या दोघांच्याही नांवानें पूज्य असलेला.

ढ– अक्षरशत्रु; व्यवहार ज्यास कळत नाहीं तो. Illiterate; stupid.

मोठा ढ जरी असला तरी वरचेवर डोळ्यांसमोरून व कानांवरून जाणाऱ्या गोष्टी त्याचे मनांत कांहींना कांहीं तरी बिंबतीलच. —निबंधमाला.

ढंग– या शब्दाचा मूळ हिंदी भाषेंतला अर्थ स्वरूप असा आहे; त्यावरून वाईट स्वरूपाचे खेळ, चाळे, असा अर्थ झाला. Wild or monkeyish practices.

त्याच्या हातीं बापाची इस्टेट येऊन चार महिने झाले नाहींत तोंच त्याला निरनिराळे ढंग सुचूं लागले, व त्याच्या पायीं तो कफल्लक होऊन बसला.

ढालगज भवानी– पूर्वीं लढाईत जे हत्ती जात त्यांच्या गंडस्थळावर संरक्षणासाठीं ढाल बांधलेली असे. ढाल गज म्ह. लढाईस तयार झालेला हत्ती. यावरून साहसाचें किंवा स्त्रियांच्या लाजाळू स्वभावाला अनुचित असें कृत्य करणारी स्त्री असा निंदाव्यंजक अर्थ. A masculine woman.

ढुढ्ढाचार्य– ( कानडी भाषेंत ढुड्डु = दोन + आचार्य; ) ज्यांना दुप्पट दक्षिणा द्यावयाला पाहिजे असे प्रतिष्ठित विद्वान्. यावरून स्वतःची प्रौढी मिरविणारा असा अर्थ. A swaggerer.

तुमचें लोकांनीं ऐकावें असे काय तुह्मी मोठे ढुढ्ढाचार्य आहां ?

ताकपिठ्या– ताक व पीठ येवढ्यावर ह्मणजे फारच थोडी बिदागी घेऊन कथा करणारा हरदास–किंवा पुराण सांगणारा पुराणिक; अर्थात् नवशिक्या हरदास किंवा पुराणिक.

तापत्रय– आधिभौतिक, आधिदैविक आणि आध्यात्मिक दुःखें; विशेषकरून दारिद्र्यास ही संज्ञा आहे.

तिकडून, तिकडचा, इ०:–स्त्रियांनीं नवऱ्याचे नांवाचा उच्चार करूं नये म्हणून त्याबद्दल मोघमपणें बोलण्याचा प्रकार.

तिरकमशेट- चकणा मनुष्य; जवळ भांडवल नसतां आपण मोठे व्यापारी आहों असा बहाणा करणारा.

तिरशिंगराव- जो दुसऱ्याशीं मिसळून राहत नाहीं आणि थोड्या कारणानें चिडीस जातो त्याला ही संज्ञा देतात. A queer codger.

तिस्मारखां- अंगीं खरी योग्यता नसलेला मोठा मिजासखोर व चिडखोर मनुष्य; A pretender to valour and puissance.

तीर्थरूप- तीर्थाप्रमाणें पवित्र हा मूळचा अर्थ. पुढें मातापितरांस हा शब्द लावूं लागले.

तेरीमेरी- हे शब्द हिंदुस्थानी आहेत; अर्थ-माझी तुझी. यावरून अरे तुरे पर्यंतचें भांडण. Angry words; theeing and thouing.

तेलंगभट-- तेलंगणांतले ब्राह्मण फार चिकट आणि आगंतुकी करण्याबद्दल प्रसिद्ध आहेत. यावरून आगंतुक असा अर्थ. An impudent intruder at an entertainment.

तोंडपाटीलकी- रिकामी बडबड; पाटलाला बसल्या जागेवरून तोंडी हुकूम नेहमीं करावे लागतात यावरून हा अर्थ झाला. Empty talk; volubility of tongue.

दगड- १ मंदबुद्धीचा ( A blockhead ) २ कांहीं नाहीं अशा अर्थी ( उदा०, त्याला काय येतें दगड ? ह्म० कांहीं येत नाहीं. )

गणपतरावांचा मुलगा बापासारखा शिकलेला नरी असायला पाहिजे होता ! पण तो शुद्ध दगड आहे ! ( मंदबुद्धीचा आहे. )

दगडन् धोंडे- ह्मणजे सटरफटर. क्षुद्र गोष्टींच्यासंबंधानें विशेषतः स्त्रियांच्या तोंडीं हा संप्रदाय आहे.

रमाकाकूंनीं धोंडे का धिंगाणे घातले! पोराला मार मार मारलें, लुगड्याच्या चिंध्या केल्या, सुनेला घरांतून हांकून दिलेंन्, दगडन् धोंडे ! किती गोष्टी सांगायच्या !

दत्त- दिलेलें अर्थात् नशीब. उदा० ज्या दत्ताला भ्यावें तें दत्त पुढें उभेंच ! Fortune.

दळूबाई- मुली दळूं लागल्या ह्मणजे 'दळू बाई दळू । जात्याला नाहीं पाळू' अशी ओंवी ह्मणत असतात. यावरून कर्तृत्वशून्य व भेकड अशा

पुरुषाला तिरस्कारव्यंजक हा शब्द लावतात. A timid, cowardly, effeminate person.

धान्याच्या आणि दारूच्या कोठारावर बसवून ठेवून प्रतापराव दळवाईचें काम सांगतहित हें जसें कांहीं आह्मां बायकांना कळत नसेल! –कांचनगडची मोहना.

दिवटा– कुलक्षय किंवा अब्रूचा नाश करणारा. One who dishonours or ruins his family.

दिवाभीत– घुबड दिवसां लपून बसतें, ह्मणून त्याला दिवाभीत ह्मणतात. (दिवा=दिवसास); यावरून लोकांपुढें जाण्यास भिणारा मनुष्य हा अर्थ. A bashful person.

दीनदुनिया– (दीन=धर्म) धर्म व व्यवहार; उदा०– दीनदुनिया त्याच्या खात्रींत नाहीं ह्मणजे धर्म किंवा लोकाचार यांना तो मोजीत नाहीं. Obligations of religion and society.

देवजीधसाडा– माकडाचे खेळांत माकडाला पुरुषाचा वेष देऊन त्याचेकडून खुर्चीवर बसणें, हुकूम करणें, रुसणें वगैरे कामें करवितात. या माकडाला देवजीधसाडा ह्मणतात. यावरून कोणी कुरूप व दांडगा मनुष्य हा अर्थ.

देवमाणूस– साधाभोळा, निरुपद्रवी मनुष्य.

द्राक्षापाकात्मक– तोंडांत टाकतांच विरघळणारी वस्तु; अल्प श्रमानें आंतील रस चाखतां येईल अशी.

खरी कविता ह्मटली ह्मणजे द्राक्षापाकात्मक असावी; कीं द्राक्षांत जसा अंतर्गत रस बाहेर लखलखीत दिसत असतो व द्राक्ष तोंडांत घालण्याचा अवकाश कीं तें विरघळून गेलेंच, तसा कवितेच्या अंगीं सुबोधपणा असावा. –निबंधमाला.

धांगडधिंगा– ज्यास ताळतंत्र नाहीं अशा नाचण्याचा गोंधळ. Wild, boisterous leaping.

पिंगाबाई पिंगा गे। अवघा धांगडधिंगा गे॥ –एकनाथ.

धारातीर्थ– धारा ह्म० तरवारीची धार हेंच कोणी तीर्थ ह्म० पवित्र स्थान यावरून समरभूमि हा अर्थ. A battle-field.

राजा शिवसिंग धारातीर्थीं देहविसर्जन करून 'शिव शिव' ह्मणत शिवलोकास गेला. –संभाजी.

'धूळभेट–पायाची धूळ झाडण्यापुरती–अल्पकालीन भेट; विशेषसें बोलणें

चालणें न होतां झालेली अल्पकालीन भेट; उभ्याउभ्या झालेली भेट. A flying visit.

लाटसाहेब च्या धूळभेटीचा प्रसंग ह्मणजे देशी संस्थानिकांना मोटा आनंदोत्साचा वाटतो. उघडच आहे. प्रत्यक्ष चक्रवर्ती राजाच्या दर्शनाचे अभावीं त्याच्या प्रतिनिधीचें दर्शन सुद्धां रवि-अरुण न्यायानें त्यांना मंगलदायकच होतें. —केसरी.

धेंड— मोठा विद्वान् किंवा वजनदार मनुष्य. A man of high learning, renown or honour.

असलीं ( कृष्णशास्त्र्यासारखीं ) धेंडें हीं विश्वसृष्टींतील अद्भुत कोटींतच गणिलीं पाहिजेत. —विविधज्ञानविस्तार.

नाक— मुख्य भाग, प्रधान वस्तु; शरीराचें पुष्कळसें सौंदर्य नाकावर अवलंबून आहे; नाक नसलेला मनुष्य अगदींच कुरूप दिसतो. त्यावरून ह्या अर्थ झाला आहे. The pick or flower.

रावोपंत नाना म्हणजे आमच्या शहराचें नाक आहेत.

न्हातीधुती— प्रौढ झालेली, जिला चेरें वाईट करूं लागलें आहे अशी. A woman arrived at puberty.

नगद माल— अनेक पदार्थांच्या समुदायांत जो उत्तम असेल तो. The choice portion of a thing.

नखशिखांत— पायाच्या बोटाच्या नखापासून तों डोक्यावरच्या केंसाच्या अग्रापर्यंत ह्म० सर्व शरीरभर. From head to foot.

नंदीबैल— ज्यास संकेतानें 'होय, नाहीं' अशा अर्थाच्या माना हलविण्यास वगैरे शिकविलें असतें असा बैल. त्याला स्वतःची अक्कल मुळींच नसते. यावरून अक्कलशून्य, होस हो करणारा, असा अर्थ. A blockhead.

'तुम्ही व ते मराठे असून त्यांची कल्पना तुम्हांस कशी कळली नाहीं? यावरून तुम्ही शुद्ध नंदीबैल आहां.' —बाजीराव.

नसता— विनाकारण, अन्यायाचा. Undeserved.

गोम्याच्या अपराधाकरितां सोम्याला नसता दंड कां?

नांवाचा— खरा; उदा०—या गोष्टीसाठीं त्याला मी सातदां नाक घासायला लावीन तरच नांवाचा!

नांवाचा मात्र— नामधारी; केवळ नांव धारण करणारा, पण हातीं कांहींएक सत्ता किंवा कर्तबगारी करण्याचा अधिकार नसलेला. Nominal.

मी जॉन्सनचा नांवाचा मात्र गुरु होतों, खरोखर पहातां तो माझ्याहून वरचढ होता. —निबंधमाला.

**नाहीं तेंच**— अशक्य गोष्ट— भलतेंच. Impossible ; improper.

**पंक्तिपटाण**
**पंक्तिबारगीर** } — यजमानाचे पंक्तीस जो उपरी मंडळी असते ती. An idle hanger-on.*cf.* भोजनभाऊ.

झोंप आणि जांभया यांच्या खालींच दिवस घालवून गुलामानें ...... माझा फडशा पाडला. छेः छेः ! फुकटोजीराव पंक्तिपटाण हा ! आमच्या उद्योगराजासारखा मित्र नाहीं. —केरळकोकिळ

**पंक्तिप्रपंच**— पंगतींत एकाला एक पदार्थ वाढावयाचा व दुसऱ्याला दुसरा असा भेद; यावरून पक्षपात हा अर्थ. Partiality.

**पंडितंमन्य**— स्वतःस मोठा पंडित मानणारा. A pedant.

**पर्वणी**— दुर्मिळ योग; फार दिवसांनीं येणारा पुण्यकाल; यावरून अनुकूळ काळ असाही अर्थ होतो.

'आली सिंहस्थ पर्वणी । न्हाव्यांभटां जाली धणी ॥' तुकाराम.

प्लेगचे दिवस म्हणजें स्मशानांतल्या काड्यांची पर्वणीच !

**पायगुण**— कोणी मनुष्य आपल्या येथें आल्यापासून आपणास त्याच्यामुळें किंवा अन्य कांहीं कारणामुळें जें बरें वाईट फळ मिळतें, पण जें आपण त्याच्याच येण्यामुळें मिळालें असें समजतों तें. Luck appertaining to a person as coming.

धनाजीला नौकरीला ठेवल्यापासून हंबीरराव पुनः पूर्वीच्या वैभवपदाला चढले, आणि धनाजीचा हा पायगुण समजून त्याला प्यार करूं लागले. —बाजीराव.

**पिष्टपेषण**— ( पिष्ट = दळलेलें, पीठ केलेलें, त्याचें पेषण = पीठ करणें ) पुनः पुनः तेंच तें सांगणें; चर्वित चर्वण करणें. Fruitless reiteration.

**पिंड**— शरीर; यावरून 'जें पिंडीं तें ब्रह्मांडीं' अशी म्हण पडली आहे.

खाणेंपिणें चमचमीत आणि पिंड सुखांत रुळलेला अशा राजपिंडयाची झांक लोकोत्तर असते. —बाजीराव.

**पैशापासरी**— अतिशय स्वस्त. Dirt-cheap.

युनिव्हर्सिटी स्थापन होऊन नुकतीं १५।१६ वर्षें होताहेत तोंच ( आमच्या ) लोकांत किताबी विद्वान् पैशापासरी या मोलानें विकूं लागले. —निबंधमाला.

**पैसेच पैसे**– पुष्कळ पैसे; कधीं कधीं ‘ च ’ या अव्ययाच्या योगानें ‘ नुसता ’ असाही अर्थ दर्शविला जातो. जसें:–जेवायला भातच भात होता ( = नुसता भात होता ).

**पोटपूजा**– जेवण; *cf*. ‘आधीं पोटोबा मग विठोबा.’

**प्रकरण**– विद्या, कुल, जाति, गुण किंवा अवगुण इ. गोष्टींनीं असामान्य असा पुरुष अथवा अशी स्त्री. An individual pre-eminently excellent, learned, clever &c.

प्रकरण जरा जड आहे, पण तुझ्यापासून तिला नरम करण्याची गुरुकिल्ली आतां शिकलोंच आहे. –नाटिका.

**फाल्गुनवाद्य**– फाल्गुनाच्या महिन्यांत होळीचे वेळीं हातातोंडांनीं वाजविण्याचें वाद्य, अर्थात् बोंब. Beating the mouth with the hand.

**ब्रह्मगांठ**– कधीं न सुटणारी गांठ; हिंदुधर्मशास्त्राप्रमाणें विवाहाचा संस्कार एकदां झाला म्हणजे तो पक्का होतो, तो फिरवितां येत नाहीं. म्हणून विवाह असा अर्थ. A very complicated knot; a marriage tie.

आपण लग्नाचें जें अगदीं योग्य वय असें सर्व संमतानें मानूं, तेथपर्यंत कधीं न सुटणारी अशी ब्रह्मगांठ मारूं नये म्हणजे झालें. –निबंधचंद्रिका.

**ब्रह्मघोंटाळा**– आचारविचाराविषयींची अव्यवस्था; गोंधळ. Chaos.

आमची प्रत्येक गोष्ट धर्मच ! ...बनें बैकल्यें धर्मच...व मनूनें चोरास सांगितलेली शिक्षा धर्मच ! या गोष्टींची मर्यादा आम्ही करीत नाहीं म्हणून हा सारा ब्रह्मघोंटाळा आहे. –निबंधचंद्रिका.

**बागुलबोवा**– मुलांनीं भ्यावें म्हणून जें सोंग आणतात तें; त्यावरून पोकळ भिवडावणें हा अर्थ. A goblin mentioned to frighten children.

जो तो या लोकमताच्या बागुलबोवाला भिऊन दडून बसेल, तर कोणत्याही समाजाला उन्नतावस्था येणार नाहीं. –आगरकर.

**बापजन्मीं**– सगळ्या जन्मांत असा अर्थ.

मीं बापजन्मीं असला हट्टी मुलगा कधीं पाहिला नव्हता.

**बालाग्र**– (बाल=केंस; त्याचें अग्र.) केंसभरही = यत्किंचितही. Not in the least.

(आमचा वीर बहाद्दर) अशा वेळीं बालाग्रही न डगमगतां विश्वभक्षक काळाच्या जबड्यांत उडी टाकण्यास सिद्ध झाला. —पटवर्धनांचे पराक्रम.

**बाहेरचा**— घरांत येण्यास अपात्र; अस्पृश्य जातीचा (महार, मांग, भंगी इ० ) An untouchable person.

**बाळकडू**— लहान मुलांना किराईत वगैरे कित्येक औषधें उगाळून पाजतात तें. यावरून लहानपणीं मिळालेलें वळण अथवा शिक्षण हा अर्थ- An early education.

सतत व्यासंग, नम्रता आणि आज्ञाधारकता यांचें बाळकडू लहानपणीं ज्यांना मिळालें असतें, तींच मुलें मोटेपणीं नाव काढतात.

**बित्तंबातमी**— नक्की बातमी (बित्तं=खरी) यावरून सविस्तर, पूर्ण असाही अर्थ झाला.

अवदल्लीच्या हालचालींची बित्तंबातमी समजण्यास मराठ्यांस कांहीं मार्ग नव्हता.

**बिनभाड्याचें घर**— तुरुंग; (तुरुंगांत राहणाऱ्या कैद्यांस घरभाडें यावें लागत नाहीं, यावरून विनोदानें तुरुंगाला ही संज्ञा देतात.)

त्यानें प्रथमच गुन्हा कबूल केला असता, तर त्याला बिनभाड्याचें घर पहावें लागलें नसतें. त्याच्या अपराधाची क्षमा केली असती.

**बुडीतखर्च**— ज्याचा मोबदला आपलेपाशीं रहात नाहीं असा खर्च. (उदा० ब्राह्मणभोजनांत केलेला खर्च) Monies sunk or lost.

नानाच्या लग्नांत नुसता बुडीतखर्च एक हजार रुपये आला.

**बेगडी**— बेगड लावून एखाद्या वस्तूस आणलेली शोभा क्षणिक असते. त्यावरून तकलादी किंवा नकली, खरी नव्हे असा अर्थ. तुकारामबोवांनीं वर्णिलेला 'रंगबेगडीचा न्याय' प्रसिद्धच आहे.

**बैठा पगार**— चाकरी न घेतां घरबसल्या पेन्शनासारखा पगार मिळतो तो. Pay without actual work; a pension.

**बोकेसंन्यासी**— ढोंगी साधु. बोका ज्याप्रमाणें मोठा साधुत्वाचा डौल घालून मुकाट्यानें बसतो, पण उंदीर नजरेस पडतांच त्याचें साधुत्व लटपटून तो त्याच्यावर झडप घालतो, त्याप्रमाणें लाभ करून घेण्याची संधि येतांच जो आपलें साधुत्व बाजूला ठेवून खरें स्वरूप प्रकट करतो असा ढोंगी मनुष्य. A sanctimonious fellow.

बोबडकांदा– बोबडें बोलणारा. A lisper.

बोंबल्यागणेश– नेहमीं अमंगळ बोलणारा. A croaker, Mr. Dismal.

बोलघेवडा– वाचाळ. A prater; a chatterer.

बोलून चालून– उघडपणें, उघड उघड. Evidently.

तो बोलून चालून सावकार आहे. व्याज घेतल्याशिवाय रकम देणार आहे?

ब्र– चकारशब्द; (मूळ शब्द ब्रह्म असा आहे. पण मनुष्य भयभीत झाला असला तर हा सगळा शब्द उच्चारण्याचें तर राहोच, पण त्याचें अर्ध-ब्र-येवढें सुद्धां त्याच्यानें उच्चारवत नाहीं.) A syllable.

त्याच्यापुढें या गोष्टीसंबंधानें ब्र काढण्याची कोणाची छाती होत नाहीं.

ब्रह्मसूत्र– लग्नाविषयींची ईश्वरघटित योजना; ईश्वरी नेमानेम. The destiny presiding over marriage.

ब्रम्हसूत्रच असेल तर तुमचा आमचा संबंध घडेलच. कोणी नाहीं म्हणावें!

भसकापुरी– मिरच्यांची पूड,–कोरडें तिखट. Dried and pounded chilis.

भागूबाई– भित्रा माणूस. A timid fellow.

परवां ब्याकबेवर केलेल्या प्रीतिभोजनाप्रमाणें अगोदर आरंभशूर आणि मागाहून भागूबाईप्रमाणें पलायन करणारे वीरपुरुष समाजसुधारणेला उपयोगी नाहींत.

–इंदुप्रकाश.

भिकारचाळे– दरिद्रीपणाचीं लक्षणें; निरुपयोगी कृत्य Beggarlike practices.

भुकेबंगाल (कंगाल)– ज्याला खायला मिळत नाहीं असा. भुकेनें पीडित कोणी माणूस. बंगाल या शब्दानें बंगाल देश उद्दिष्ट नाहीं; तर 'कंगाल' या शब्दाच्या नादसादृश्यावरून 'भुके'च्या शेजारी 'कंगाल' च्या ऐवजीं चुकीनें 'बंगाल' हा शब्द वसविलेला दिसतो. Hungry and needy.

भुट्टेचोर–(भुट्टे=कणसें) शेतांतून धान्य चोरून नेणारे; यावरून जे उघडपणें दरवडा घालीत नाहींत, पण मालकाचें लक्ष नाहीं असें पाहून लहानसान वस्तु लांबवितात अशांना भु० ह्मणतात. A petty thief.

भूसकेलड्डू– लांकडाच्या भुसाचे लाडू; दिसण्यांत मात्र लाडवासारखे,

पण खाऊं लागल्यास तोंडांत लांकडाचा भुसा जावयाचा ! नकली भाषण किंवा कृत्य यास अनुलक्षून हा शब्द वापरतात.

**भोजनभाऊ**– कांहीं कामकाज न करतां मोठ्याच्या पंक्तीला नुसते जेवणारे; 'पांक्तिपठाण' शब्द पहा.

हे कोण नायकोचे मामे घरांत हिंडती रिकामे। साखरशाल्योदन खाणें भोजनभाऊ केवळ ॥ –अमृतराय.

**भोपळ्या रोग**– ज्याच्या योगानें भोपळ्यासारखें शरीर होतें (दोंद वाढतें) असा रोग. याला 'रोग' हें नांव विनोदानें दिलें आहे हें उघड आहे. Corpulence, obesity.

**मगरमिठी**– कायमचा संबंध. (मगरानें आपल्या जबड्यांत एखादा प्राणी धरून जबडा मिटला ह्मणजे तो सुटणें कठिण.) A firm hold.

अज्ञानाच्या मगरमिठीहून अधिक जाचक अशी गोष्ट नसेल. –निबंधमाला.

**मंगलाचरण**– आपल्या इकडे कोणत्याही ग्रंथाच्या आरंभीं अगोदर देवाला नमन असतें, त्याला मंगलाचरण ह्मणतात. यावरून आरंभ हा अर्थ.

**मज्जाव**– (हिंदुस्थानी भाषेंत मत=नको; जाव=जा) जाण्याची बंदी हा मूळ अर्थ; यावरून कोणत्याही कामाची बंदी असा अर्थ. Preventing one from doing a thing.

**मंडूकप्लुति**– (मंडूक=बेडूक; प्लुति=उडी.) बेडूक जसा उडी मारीत जातो; त्याप्रमाणें उड्या मारीत मारीत काम करणें ह्म० कांहीं काळ नीट काम करावयाचें, मध्येंच बंद ठेवावयाचें, पुनः उसळीसरसें कांहीं काम करावयाचें असा क्रम. Occasional or intermitted mode of work.

**मंत्रपुष्पांजलि** (किंवा पुष्पांजलि)– पूजा, आरती झाल्यानंतर शेवटीं मंत्र ह्मणून देवाला स्तुतिपूर्वक पुष्पांजलि वहात असतात; त्यावरून एखाद्यावर शिव्यांचा वर्षाव असा विपरीत अर्थ झाला. Showering abuses on.

**मधच्यामध्यें**– १ ज्या गोष्टींत ज्याचें मत घ्यावयाचें त्याचें न घेतां. उदा० तुला हा मधच्यामध्यें कारभार करायला कोणीं सांगितलें ! २ तिसऱ्या

ठिकाणीं–उदा० ते दोघे भांडले आणि तें भांडण सोडवायला हा गेला ह्मणून मधल्यामध्यें याला शिव्या बसल्या.

**मनच्या मनीं**– मनांतल्या मनांत. In the secret of one's mind.

**मन्वंतर**– ( मनु+अंतर ) मनूचा शक किंवा काल; बराच मोठा काल. एकदां क्रांति झाल्यापासून दुसरी क्रांति होईपर्यंतचा काल. यावरून क्रांति असा अर्थ. An epoch.

सर्वत्र मन्वंतर फिरून जिकडे तिकडे अस्वास्थ्य, क्षणभंगुरता आणि अशाश्वती मूर्तिमंत दिसूं लागली. –गुजरांथचा इतिहास.

**महादेवापुढचा**– ह्मणजे नंदी; अर्थात् मूर्ख, अक्कलशून्य.

**महामाया**– आदिमाया ( दुर्गा ). दुर्गेचें स्वरूप भयंकर असतें. त्यावरून निंदेनें बायकांस हा शब्द लावतात. जहांबाज बायको. A woman hated as a shrew.

**मागल्या पायीं**– मागला पाय पुढें न टाकतां तसाच मागल्या मागें वळून; न थांबतां परतून; लवकर. Quickly returning from an errand.

**मानभाव**– ( महानुभाव )–श्रीकृष्णाची भक्ति करणारा व काळीं वस्त्रें परिधान करणारा हा एक पंथ आहे. काळ्या वस्त्रामुळें हे लोक निस्तेज व गरीब दिसतात. यावरून मानभाव ह्म० दिसण्यांत साळसूद व गरीब असा अर्थ प्रचारांत आला. One presenting a smooth exterior.

**मानसपुत्र**– शरीरापासून नव्हे तर मनापासून निर्माण केलेले पुत्र ते; यावरून एखाद्यानें ऊर्जितदशेला आणलेल्या, अत्यंत प्रिय आणि आज्ञांकित माणसास हीं संज्ञा लावतात. A creature.

**मामला**– मामला म्हणजे मामलत; अथवा प्रजेचें रक्षण आणि सरकारी करांची वसुली करण्याचा अधिकार. त्यावरून पुढें करावयाचें एखादें बिकट कृत्य असा अर्थ. A task.

हंबीररावांना मोहना मिळणार कशी ? व पिलाजीराव......वजीर तरी होणार कसे ? मामला कठिण दिसतो. –कांचनगडची मोहना.

**मामळभट्टी**– ढोंगीपणा. श्रीकृष्णाच्या बाळपणीं, एक राक्षस महाबळ भट्टाचें सोंग घेऊन, त्यास मारण्यासाठीं गोकुळांत आला होता. त्या कथाभागावरून हा शब्द प्रचारांत आला आहे. टिळे लावून आणि माळा घालून बाह्यतः मोठा साधुत्वाचा डौल घालावयाचा, पण मनांत लोकांस ठकविण्याचा हेतु, अशा प्रकारच्या वर्तनास 'मामळभट्टी' म्हणतात.

**मायपोट**– अनेक बऱ्या वाईटाचा जेथें समावेश होतो तें. आईच्या पोटांतून निघणारे मुलगे कांहीं चांगले, कांहीं वाईटही असतात. सर्वांचा समावेश त्यांत होतो. त्यावरून वरील अर्थ झाला. उदा० ईश्वर हा सर्वांचें मायपोट आहे. An asylum for all without distinction.

**माया**– धन; डबोलें. उदा० तो आज दहापांच हजारांची माया बाळगून आहे.

**मारवाडी**– मारवाडी लोक व्यापारानिमित्तानें इकडे येतात. त्यांचे अंगीं धूर्तता, व्यवहारज्ञान आणि काटकसरीनें रहाण्याची संवय हे गुण फार असतात. त्यावरून कावेबाज, व्यवहारचतुर पण चिक्कु अशा माणसाला ही संज्ञा लावतात. A cunning, miserly and knavish fellow.

**माहेर**– १ मुलीच्या आईबापांचें घर तें माहेरघर ( मातृगृह ). यावरून मुख्य उत्पत्तिस्थान अथवा आगर असा अर्थ. २ विश्रांतिस्थान.

साधुसंतांचें माहेर । बाप रखुमादेवीवर ॥
वासुदेवस्मरण पापहरणाचें मूळ । तीर्थांचें माहेर ब्रह्मव्यापक निश्चळ ॥

–एकनाथ.

**मुक्ताफळें**– मोत्यें हा मूळ अर्थ. त्यावरून उपरोधिक अर्थानें वेड्यावांकड्या शब्दांबद्दल याचा उपयोग होतो.

ऐका हीं स्वारीचीं मुक्ताफळें ! –फाल्गुनराव.

**मुखशुद्धि**– जेवणानंतर सुपारी वगैरे खाणें; सुपारीनें तोंडाचा ओशटपणा वगैरे जाऊन तें शुद्ध होतें, त्यावरून हा अर्थ झाला.

**मुखस्तंभ**– तोंड असून ( मुका नसतां ) अगदीं न बोलणारा.

**मुष्टिमोदक**– ठोसे; ठोसे देण्यासाठीं हाताची मूठ वळली म्हणजे तिचा आकार थोडासा मोदकासारखा होतो. ह्या साम्यावरून, मुष्टिमोदक हा शब्द थट्टेनें उपयोगांत आणितात. ( चापटपोळी हा शब्द पहा.) Boxing.

कुणबी, माळी, हेटकरी, यांच्या पोरांना मुसलमानांनीं चोपतांना पाहिलें, कीं तो चित्यासारखा धांवून जाऊन त्यांस यथेच्छ मुष्टिमोदक देई. —बाजीराव.

मेल्यापेक्षां मेला होणें— अतिशय लाजिल होणें. To feel extremely ashamed.

मेषपात्र— मेष ह्मणजे बोकड अर्थात् जड व बुद्धिहीन; ज्याच्या अंगांत पाणी नाहीं असा. अजागळ. An imbecile, effeminate person.

अंगांत कर्तृत्वशक्ति पाहिजे; नुसतीं मेषपात्र माणसें काय कामाचीं!

मोजणें— भिणें, पर्वा करणें, जुमानणें. To care for; to regard.

त्याच्या दाराशीं भले जंगी कुत्रे पाळलेले असत; असे, कीं पटाईत चोरांसही भीति वाटावी; पण जॉन्सन त्यांस बिलकुल मोजीत नसे. —निबंधमाला.

म्हणतां म्हणतां—फार थोड्या अवधींत, ( ह्मणण्याला जो काळ लागला तेवढ्या काळांत असा अर्थ. )

' संगीतवाल्यांनीं नाटकप्रयोग पहाण्याची चटक लावून दिल्यामुळें म्हणतां म्हणतां चार दोन नाटकें छापून प्रसिद्ध झालीं. ' —विकारविलसित

यथायथा— कसें तरी; समाधानकारक नव्हे. Somehow; barely.

येथें तुमचें कसें काय चाललें आहे? आपलें यथायथाच. जेमतेम पोटापुरतें मिळतें झालें.

यथास्थित— मूळ अर्थ ( काल ) जसा असेल तसा; कालानुरूप. यावरून पुष्कळ, रगड असा अर्थ. Abundant.

युष्मादिक— मूळ शब्द युष्मद् = तुह्मी. यावरून एखाद्याच्या फजीतीविषयीं त्याला स्वतःला उद्देशून ह्मणावयाचें ह्मणजे मुद्दाम गौरवानें हा शब्द योजतात. Your great and noble self.

आतां शौर्याच्या गोष्टी सांगतां, पण ते दिवशीं चोर आले, तेव्हां युष्मादिकच पळाले.

येवंच ( एवंच )— ( एवम्+च ) एकूण. On the whole.

... एवंच तुमचें साह्य मला करतां येत नाहीं असेंच समजा, आणि सोडा माझा नाद.

रक्तबीज— रक्तापासून उत्पन्न होणारे म्हणजे असुर; ढेंकूणही रक्तापासून उत्पन्न होतात अशी लोकांची समजूत आहे. म्हणून त्यांनाही रक्तबीज म्हणतात. Demons or bugs.

**रगडून**– पुष्कळ, जोरानें, घट्ट; उदा०– तो रगडून जेवला; त्यानें रगडून मारलें; त्याला चांगलें रगडून धर, नाहीं तर तो पळून जाईल. Firmly, closely, vigorously.

**र र**– 'रड' शब्दाचें पहिलें अक्षर 'र' त्याची द्विरुक्ति, ह्मणून रडगाणें हा अर्थ; र र करीत ह्म० जोरानें किंवा उत्साहानें नव्हे, तर रडतकढत, कष्टानें. Dwadling and dragging along lifelessly.

**रडकी सुरत**– नेहमीं रडवें तोंड (सुरत) ज्याचें असतें तो. A person bearing a mournful visage.

**रडतराव**– सदां रडत बसणारा मुख–दुर्बळ मनुष्य, बेहिमती माणूस. A faint-hearted person.

रंभाजीरावासारख्या रडतरावाच्या हातून असलें धाडसाचें काम होईल असें तुम्हांला वाटलें तरी कसें ?

**रमताराम**– रमता=गमणारा; राम=कोणी मनुष्य; भटक्या. A rover.

**राजरोस**– उघडपणें (मूळ शब्द राजा+रोशन्=प्रकाश). Openly, publicly.

आंतून संधान बांधण्याचें काम सोपें आहे; पण राजरोस लांच देण्याचें धारिष्ट तरी कसें करवतें तें कळत नाहीं.

**राजश्री**– हा शब्द सन्मानार्थी योजतात तसा विनोदार्थींही त्याचा उपयोग होतो. राजश्री = बहादूर.

'आपण तें भयंकर रूप दोनदां पाहिलें.पण यांचा कोठें भरंवसा वसतो आहे? मग मला असें वाटलें कीं, या **राजश्रीची** प्रत्यक्षच खात्री करावी.' –विकारविलसित.

**रामपहारा**– सूर्योदयापासून पहिले तीन तास. The early morning.

रामपहाऱ्यांत खोटें बोलूं नकोस; खरें सांग.

**रामरगाडा**– (राम = पुष्कळ) अतिशय गर्दी.

**रामरट्टा**– (राम = जोराचा) रट्टा. A violent blow.

पाहीन पाहीन आणि असा एक रामरट्टा देईन कीं, यादच करीत रहाशील.

**राहून राहून**– पुनः पुनः. Off and on.

राहून राहून मला आश्चर्य वाटतें कीं तुमच्यासारखे शहाणेसुर्ते लोक देखील या भावनींत चकले कसे !

रुकार– ' रुकार ' हा शब्द रुजुवात घेणें यांतलें पहिलें अक्षर जें ' रु' त्यापासून झाला आहे. त्यावरून पुढें संमति असा अर्थ निघाला. Consent.

पण तुमच्या या बेताला तुमच्या वडिलांकडून रुकार मिळाला आहे काय ?

रेसभर– रेस म्हणजे आण्याचा पंचविसावा अंश; यावरून यत्किंचित् असा अर्थ. In the least.

हे हरामखोर काय करतील आणि काय नाहीं याचा कांहीं रेसभरही नेम नाहीं.
–उषःकाल.

लटपटपंची– हा शब्द पोपटाला शिकवितात. यावरून अंगांत ह्मण ण्यासारखी विद्या नसतां मोठ्या डौलाचें जें बोलणें त्याला निंदेनें म्हणतात. Vaunting.

खऱ्या मार्मिक श्रोत्यांस केवळ लटपटपंची केल्यानें लेशमात्रही द्रव येणार नाहीं. यास्तव कपटभाव मनांत धरून वक्तृत्व ... ... न केलेलें बरें. –निबंधमाला.

लठ्ठंभारती– भारती हें नांव गोसाव्यांत असतें. लठ्ठंभारती ह्म० लठ्ठ गोसावी. यावरून कोणीही अक्षरशत्रु, उर्मट आणि मंदबुद्धीचा लठ्ठ माणूस असा अर्थ. A big burly fellow.

लट्टालट्टी– सोटे, दांडे इत्यादिकांनीं परस्परांमध्यें चालणारी मारामारी; ( हिंदुस्थानी भाषेंत लट्ट ह्म० सोटा ). A general combat with cudgels.

आम्हां लोकांत एकी तर इतकी, कीं यत्किंचित् लाभ होण्याचा सुमार दिसूं लागला न लागला तों लट्टालट्टी सुरू व्हावयाची ! –केसरी.

लब्धप्रतिष्टित– विद्या, अधिकार इ० मुळें प्रतिष्ठा ( मान ) ज्यानें मिळविली आहे तो, हा मूळचा अर्थ. पण पुढें या अर्थाला हीनत्व प्राप्त होऊन पोकळ प्रतिष्ठा मिरविणारा असा अर्थ होऊन बसला. ( लब्धप्रतिष्ठ हें शुद्ध रूप आहे ). Vainglorious.

लाटऱ्या गंगाजी– दुसऱ्याची वस्तु खुशाल दडपणारा; लाटालाट करण्याचा ज्याचा स्वभाव तो. One rudely and recklessly appropriating other's property.

लोणकढी– लोणी कढवून तयार केलेलें तूप अगदीं ताजें असतें. त्यावरून अगदीं ताजी–समयानुसार ठेवून दिलेली–जी थाप अथवा खोटी वार्ता ती. A fresh canard.

पण मला आपण आपली तसबीर द्यायची कबूल केली ना? कां लोणकढी दिलीत ? —फाल्गुनराव.

**वरवर**— बाह्यतः Ostensibly; superficially.

**वऱ्हाडी मंडळी**—वऱ्हाड ह्मणजे वर आणि वधू यांचें लग्न. यावरून लग्नास आलेली पाहुणे मंडळी असा अर्थ. Guests in a marriage party.

**वामकुक्षि**—दिवसास भोजनोत्तर अंगांत थोडासा आळस चढतो, तेव्हां अन्नपचनासाठीं ह्मणून वाम (डाव्या) कुशीवर कांहीं कालपर्यंत पडून रहाणें; दुपारची झोंप.

जीवमान आहे तोंवर खाऊन घ्यावें, दुपारची वामकुक्षि चुकूं देऊं नये ......अशा प्रकारचा ज्यांचा स्तुत्य आयुष्यक्रम त्यांच्यापुढें मोठा शिकंदर बादशहा झाला तरी तो काय ! ! —आगरकर.

**विकटांत किंवा विकटोपर्यंत अध्ययन**— मुलांना देवपूजा शिकवितांना गणपतीच्या स्तुतीचा पहिलाच श्लोक ' सुमुखश्चैकदन्तश्च कपिलो गजकर्णकः । लंबोदरश्च विकटो विघ्ननाशो गणाधिपः ।' हा लागतो. हा पहिला श्लोकसुद्धां पुरा न घेतां ' विकटो 'पर्यंतच येणें, ह्मणजे अगदींच थोडें अध्ययन – ठोंबेपणा – हा अर्थ.

कोण सोमशास्त्री ना ? आहेतच मोठे–अगडबंब–शास्त्री. त्यांचें अध्ययन तरी किती अचाट ! अगदीं विकटोपर्यंत ! !

**' विकटो 'पर्यंत ज्ञान**– ( वर विकटोपर्यंत अध्ययन हा संप्रदाय पहा. )

धार्मिक व सामाजिक विषयांसंबंधानें आमच्या लोकांचें ज्ञान 'विकटो'पर्यंत जाऊन थडकलें होतें. राज्यविषयक गोष्टींत मात्र आह्मी दीर्घश्रवे होतों. —आगरकर.

**विंचूकाटा**— विंचू व दुसरे दंश करणारे प्राणी.

अंधारांत बसलांत ह्मणून म्हटलें. हो विंचूकाटा असतो! दिवा लावून बसायला नको का म्हटलें आहे कोणीं ? —पण लक्षांत०

**वितंडवाद**— आपला पक्ष वस्तुतः खोटा असतांही खोट्या युक्तीनें आपलेंच ह्मणणें सिद्ध करण्याविषयींचा आग्रह. सरळ रीतीनें वाद न करतां भलतेच मुद्दे घेऊन तंडूं लागणें. Unprofitable and vexatious wrangling.

आपली बाजू घसरते आहे असें त्यास (जॉन्सन यास) वाटूं लागलें असतां

वितंडवादांत शिरणें... किंबहुना 'शेषं कोपेन पूरयेत्' ही युक्ति लढविणें यांतही तो वेळेनुसार मागें घेत नसे. —निबंधमाला.

वेळ अवेळ— योग्य किंवा अयोग्य वेळ. In season and out of season.

म्हातारा वेळ अवेळ न पहातां शिव्या देत सुटतो.

वेळेनसार— ( शुद्ध रूप वेळेनुसार. ) समयानुसार.

वेळेवारीं—योग्य वेळीं.

शब्दानुशब्द— प्रत्येक शब्द. कोणत्याही शब्दाची द्विरुक्ति करून मध्यें नू घातला ह्मणजे त्यांपैकीं प्रत्येक असा अर्थ होतो. जसें पैनूपै देऊन टाकली. ( प्रत्येक पै — सगळें कर्ज. )

या एकंदर बोलण्यांतील शब्दानुशब्द शांतपणानें शिवाच्या मुखांतून निघत होता. —उषःकाल.

शिखानष्ट— मुसलमानांना शेंडी नसल्यामुळें त्यांना हा निंदावाचक शब्द लावतात. उदा०— ' शिखानष्टां दुष्टां करुनि रणिं शिक्षा निजकरीं. ' —पु० बा० जोशी.

शुक्लकाष्ट— आपण कोणीकडेही गेलों तरी आपल्या मागोमाग येणारा माणूस किंवा पाठीस लागणारें लचांड. A pest or an encumbrance.

हें आमच्या मागचें शुक्लकाष्ट सुटेल तेव्हां आमच्या जिवाला स्वस्थता वाटेल. तोंपर्यंत ही वणवण लागलीच आहे पाठीस !

शुष्काशुष्की— कांहीं फायदा नसतां, निष्फळ, व्यर्थ.

शेणामेणाचा— सहज भंग पावणारा; हलका; मऊ; ( शेणाचा किंवा मेणाचा ).

शेलापागोटें— पूर्वी कोणालाही बहुमानाचें बक्षीस द्यावयाचें झालें तर शेलापागोटें देत. यावरून बक्षीस किंवा बहुमान हा अर्थ. An honor conferred.

श्मशानवैराग्य— प्रेतदहनासाठीं आलेल्यांस आपणही एके दिवशीं असेच इहलोक सोडून जाणार असा विचार येऊन वैराग्य उत्पन्न होतें तें.

श्रीगणेशा— पोथ्या, पुस्तकें लिहितांना किंवा कोणतेंही कार्य आरंभतांना

प्रथम 'श्रीगणेशाय नमः' लिहितात व ह्मणतात. त्यावरून आरंभ हा अर्थ. *cf.* –'ओनामा.'

**श्रीमन्महा**– कोणतेंही कार्य आरंभतांना 'श्रीमन्महागणाधिपतये नमः' असें ह्मणून गणपतीला वंदन करण्याची चाल आहे. त्यावरून या शब्दाचा अर्थ प्रारंभ असा झाला. The beginning.

आमच्या इकडे अधिकारी मंडळांत कलहाचा श्रीमन्महा हेस्टिंग्स व त्याचे कौन्सिलदार यांनीं पहिल्यापासूनच केला. –केसरी.

**सटवी**– षष्ठीदेवता ( सटवाई ). त्यापासून हा अपशब्द ह्मणून स्त्रियांसंबंधानें योजितात.

एक शिपाई भाकर...खात बसला होता, इतक्यांत एक भिकारी म्हातारी बाई येऊन...तुकडा मागूं लागली....त्यानें तिला झिडकारलें तरी ती जाईना. तेव्हां तो इतका संतापला कीं, या सटवीला उभी चिराबी म्हणून त्यानें तलवारीला हात घातला. –बाजीराव.

**सटी (ठी) सामासीं**– कधीं कधीं; सहा महिन्यांनून एखादे वेळीं. Occasionally.

**सवतीमत्सर**– सवतींचा परस्परांसंबंधानें फार द्वेष असतो, तो द्वेष कधींही कमी होत नाहीं; त्यावरून एखाद्यासंबंधानें उभा दावा हा अर्थ.

**साखरझोंप**– साखरेसारखी गोड झोंप ( सकाळीं अरुणोदय होण्याच्या सुमाराची ).

मी आपणांकडे आलें होतें, तेव्हां आपण साखरझोंपेंत होतां. –गुप्तमंजुष.

**सागेलागे**– मूळ शब्द सांगेलागे म्हणजे अमकें अमकें कृत्य कर असें सांगणारे व तें कृत्य करूं लागणारे; अर्थात् साथीदार. Accomplices.

**सावळागोंधळ**– सावळा ह्मणजे धड पांढरा ह्मणवत नाहीं, धड काळाही म्हणतां येत नाहीं असा; यावरून कोणत्याही प्रश्नाचा धड एक परिणाम न होतां तो तसाच गोंधळांत रहातो त्यास सावळागोंधळ म्हणतात. An undecided state.

**साळकाया माळकाया**– स्त्रियांसंबंधानें तिरस्कारदर्शक शब्द.

**साळकोजी माळकोजी**–पुरुषांसंबंधानें तिरस्कारदर्शक शब्द *cf.* John Nokes anh Thomas Stiles. Tagrag and bobtail,

सुमाराचा— मध्यम. उदा० हें सोनें कांहीं उत्तम नाहीं, सुमाराचें आहे. Of moderate or middling quality.

साळसूद— मूळ शब्द—शालाशुद्ध—म्हणजे ज्याला चांगलें शिक्षण मिळालें आहे तो. लबाड किंवा खोडसाळ नव्हे असा सालस मनुष्य. Honest and simple.

रंगराव दिसायला कसा साळसूद ! कोणी म्हणेल याच्या हातून कीडमुंगीसुद्धां कधीं मरावयाची नाहीं. पण त्याचींच हीं राक्षसी कृत्यें बरें !

सूर्यवंशी— सूर्याच्या मागून त्याच्या वंशांत झालेले; यावरून विनोदानें सूर्य उगवल्यानंतर अंथरुणांतन उठणाऱ्यांना हा शब्द लावतात. A late-riser.

सैरावैरा— वाट फुटेल तिकडे. ( सैरा हा स्वैर शब्दाचा अपभ्रंश; वैरा हा शब्द नादसादृश्यामुळें उगाच आला आहे. त्याला अर्थ नाहीं.) Helter-skelter, hurry-skurry.

भीम गदा घेऊन येत आहे हें पाहतांच कौरवसैन्य सैरावैरा पळूं लागलें.

स्मशानवैराग्य—( श्मशानवैराग्य शब्द पहा. )

हंडीबाग— गारुड्याचे खेळांत त्याला मदत करणारा असा एक हुषार आणि धीट मुलगा त्याचेबरोबर असतो त्याला हंडीबाग म्हणतात. त्यावरून स्वतः हुशार पण दुसऱ्याच्या तंत्रानें सर्वथा चालणाऱ्या माणसाला ही सञ्ज्ञा देतात.

हिरसातट्टू—खिकाळणारें तट्टू; यावरून खोडकर, दुर्व्यसनी लोक हा अर्थ.

लंडे गुंड हिरसे तट्टू यांची संगत धरूं नको ! —अनंतफंदी.

होयबा—होस हो करणारा; स्वतःची अक्कल ज्याला नाहीं, दुसरा म्हणेल त्यास अनुमति देणारा. A yesser.

---

# प्रकरण तिसरें.

## पौराणिक, ऐतिहासिक किंवा इतर कथांवरून निघालेले संप्रदाय.

**अनागोंदी जमाखर्च**— अनागोंदी नांवाचें ठिकाण कर्नाटकांत आहे. येथें एके काळीं विजयनगरच्या गादीची शाखा होती. पुढें तें साम्राज्यवैभव नष्ट झालें, तरी तेथील दरबारची पद्धति अशी असे कीं, वर्षाचे अखेरीस अमक्या राष्ट्राकडून इतकी खंडणी आली, तमक्याकडून इतकी आली, असे काल्पनिक आंकडे जमेच्या बाजूस लिहावयाचे आणि तितक्याच रकमा त्या त्या राष्ट्रांना बहाल केल्या म्हणून खर्चीं लिहावयाच्या, असे पोकळ जमाखर्च चालत. त्यावरून ज्याला ताळतंत्र नाहीं अशा पोकळ जमाखर्चाला ही संज्ञा लावतात.

**अहिल्याबाई**— अहिल्याबाई होळकरीण ही मोठी साध्वी, उदार व सत्वशील स्त्री होऊन गेली. यावरून तिच्यासारखे गुण जिच्या अंगीं आहेत अशी स्त्री असा अर्थ.

**आनंदीबाई**— राघोबादादा पेशवे यांची पत्नी आनंदीबाई ही मोठी कृत्या होती. हिच्या दुष्टपणाचे पायीं नारायणराव पेशव्यांचा खून होऊन पेशवाई बुडण्याच्या पंथाला लागली. यावरून एखाद्या दुष्ट, घर बुडविणाऱ्या बाईला आनंदीबाई म्हणतात.

**आळशावर गंगा**— गंगोदकानें स्नान घडलें असतां सगळ्या पापाचें क्षालन होतें असा हिंदूंचा समज आहे आणि त्यासाठीं ते लोक शैंकडों कोसांवरून मोठे कष्ट सोसून गंगास्नानास जातात. अशा स्थितींत एखाद्याचे घरीं गंगा आपण होऊन चालून आली तर तो मोठा भाग्यवान् म्हटला पाहिजे. यावरून एखादी भाग्याची गोष्ट अनायासें घडून आली असतां या म्हणीचा उपयोग करतात. सगराचे साठ हजार पुत्र शापानें दग्ध होऊन पडले असतां भगीरथानें खालीं आणलेल्या गंगेचा ओघ त्यांच्या अंगावरून गेल्यामुळें त्यांचा उद्धार झाला. या पौराणिक कथेशीं या संप्रदायाचा संबंध आहे.

गंगा आली आळशावरी । आळशी देखूनि पळे दुरी ॥ —तुकाराम.

**इंद्राय तक्षकाय स्वाहा**– एखादा मनुष्य आणि त्याचा कवारी किंवा आश्रयदाता या दोघांचीही आहुति घेणें. ( तक्षक नांवाचा नागकुलाचा एक अधिपति होता. जनमेजय राजाच्या सर्पयज्ञांत आपली आहुति पडेल या भीतीनें तो इंद्राच्या आश्रयास गेला;पण ब्राह्मणांनीं इंद्राय तक्षकाय स्वाहा असे मंत्र ह्मणून दोघांनाही खेंचून आणिलें. या कथेशीं या संप्रदायाचा संबंध आहे.)

जॉनसनसारख्या रसिकांनीं ...ज्यांस कवित्वसिंहासनावर आरूढ करवून सर्वांच्या अभिनंदनास पात्र करून ठेविलें होतें, त्यांस मेकॉलेप्रभृति अर्वाचीन निबंधकारांनीं पदच्युत करून 'इंद्राय तक्षकाय स्वाहा' या न्यायानें जॉनसनप्रभृति मोर्चेलवाल्यां-ही त्यांच्याबरोबरच खालीं ओढलें. –निबंधमाला.

**कत्तलची रात्र**– मोहरम महिन्याच्या दहाव्या तारखेला रात्रीं करबेलाच्या मैदानांत हसन व हुसेन यांच्यांत भयंकर लढाई होऊन मोठी कत्तल झाली; त्यावरून कत्तल० म्हणजे अतिशय गर्दीची–घाईची–वेळ. *cf*. लग्नघाई.

**कर्णाचा अवतार**– कुंतिपुत्र कर्ण हा दानशूरांत श्रेष्ठ म्हणून त्याची प्रसिद्धि आहे. त्यास अंगचीं कुंडलें होतीं. तीं काढून दिलीं असतां आपण मरूं हें माहीत असतांही ब्राह्मणानें तीं मागितलीं म्हणून तीं त्यानें काढून दिलीं व त्यामुळें पुढें तो अर्जुनाच्या हातून मरण पावला. यावरून एखाद्याची दातृत्वाची पराकाष्ठा दाखवावयाची असल्यास त्याला कर्णाचा अवतार म्हणतात.

(कधीं) उदारामध्यें होतसे तीच कर्ण ।
कधीं देइना वाळलें एक पर्ण ॥ –कु० ना० आठल्ये.

**कल्याण**– कल्याणस्वामी ( गोसावी ) हे श्रीसमर्थ रामदासस्वामी यांचे पूर्ण भीतींतले व एकनिष्ठ असे पट्टशिष्य होते. रामदासस्वामींचे सगळे ग्रंथ त्यांनीं तोंडानें सांगितले व यांनीं लिहिले, यावरून सामान्यतः पट्टशिष्य असा अर्थ.

**कळीचा नारद**– देवर्षि नारद हे ब्रह्मदेवाच्या दहा मानसपुत्रांपैकीं एक होते. यांनीं इकडच्या गोष्टी तिकडे सांगून देवांत आपसांमध्यें कळ लावून द्यावी म्हणून त्यांना कळीचा नारद म्हणतात. यावरून कांहीं निमित्त काढून आपापसांत कलह माजविणारास हें नांव देतात.

**कांचनभट**– रा. देवल यांच्या संगीत शारदा नाटकांत हें एक पात्र आहे.

कांचनभटानें द्रव्यलोभानें आपली शारदा नांवाची अल्पवयी मुलगी जरठ झालेल्या पण श्रीमंत अशा एका गृहस्थाला देण्याचा घाट घातला होता, पण तो फसला, असें त्या नाटकाचें कथानक आहे. यावरून कांचनभट म्हणजे पैशाच्या लोभानें म्हाताऱ्याला मुलगी देणारा असा सामान्यतः अर्थ घेतात.

**कुंभकर्ण**– फार आळशी, झोंपाळू व खादाड अशा माणसासंबंधानें उपहासबुद्धीनें हा शब्द वापरतात. 'कुंभकर्णी झोंप' म्हणजे वाजवीपेक्षां अधिक वेळ झोंप घेणें, शेजारीं कितीही गडबड झाली तरी जागृत न होणें.

[ रावणाचा भाऊ कुंभकर्ण यानें ऐरावताचा दांत उपटल्यावरून तूं सर्वकाल निद्रित राहशील, सहा महिन्यांतून फक्त एक दिवस जागा असशील असा ब्रह्मदेवानें त्याला शाप दिला होता. म्हणून तो सहा सहा महिने झोंपेंत असे. या कथेशीं या संप्रदायाचा संबंध आहे. ]

**कुबेर**– जो सगळ्या यक्षांचा अधिपति व देवांचा धनाध्यक्ष त्याला कुबेर म्हणतात. यावरून अतिशय संपत्तिमान् पुरुषाला कुबेराची उपमा देतात.

रॉकफेलर व रॉथचाइल्ड यांच्यासारख्या कुबेरांची गांठ सोडली तर एकंदरीनें इंग्लंड व अमेरिका या देशांत सामान्य लोकांची सांपत्तिक स्थिति आपली यथातथाच आहे. —केसरी.

**कैकेयी**– अयोध्येच्या दशरथराजाची स्त्री. श्रीरामचंद्राच्या वनवासाला तीच कारण झाली. यावरून नवऱ्यापेक्षांही शिरजोर आणि दुष्ट स्वभावाच्या स्त्रीला ' कैकेयी ' म्हणतात.

**गंगाजळी**– खजिना–श्री. शिंदेसरकार यांच्या खजिन्याला गंगाजळी हें नांव आहे. गंगेचा प्रवाह जसा कधीं खुंटावयाचा नाहीं, त्याप्रमाणें ज्यांतले पैसे कधीं संपावयाचे नाहींत असा मोठा खजिना.

सर्व राज्याची अमीन आनां त्याचे हातीं आली...पैशानें गच्च भरलेली गंगाजळी हातीं लागली. हांजी हांजी करणारे लोकांचा सभोंवतीं वेढा पडला. —संभाजी.

**गंगेत घोडे न्हाणें**– कार्य तडीस गेल्यामुळें कृतकृत्य होणें. To accomplish a mighty undertaking.

[ मराठे लोक ज्या वेळीं उत्तर हिंदुस्थानांत स्वाऱ्या करूं लागले, तेव्ह भीमथडीच्या तट्टांना गंगेचें स्नान घालावयाचें ह्म० गंगेपर्यंतचा मुलूख काबीज करावयाचा असा त्यांचा विचार असे. या ऐतिहासिक गोष्टीशीं याचा संबंध आहे. ]

'एकदांचें हें पुस्तक लिहिण्याचें काम संपलें म्हणजे गंगेस घोडें न्हालें.'

गनीमी कावा— गनीमी ह्मणजे लुचेगिरीचा. यावरून अगोदर भ्यालोंसें दाखवून शत्रूला पाठीवर घ्यावयाचें व तो अडचणीच्या जागेंत आला असें पाहून त्याच्यावर उलटावयाचें वगैरे प्रकारच्या ज्या लढाईच्या युक्त्या त्यांना हा शब्द लावतात. Guerilla tactics of war.

'माझें इतकेंच बोलणें कीं, गनीमी काव्यानें कार्यभाग साधावा.' —कां० मो०

[ मराठ्यांचें सैन्य कमी व मुसलमानांचें मोठें असल्यामुळें शत्रूशीं समोरें उभें राहून युद्ध करण्याची मराठ्यांची छाती नसे. ह्मणून ते युक्तीनें लढत. यावरून हा संप्रदाय आला. उर्दु भाषेंत गनीम = शत्रु किंवा लुटारू.]

गोमागणेश पितळी दरवाजा— या संप्रदायाच्या उपपत्तीविषयीं पुढील दंतकथा सांगतात. एका बादशहाचे वेळीं राज्यांत इतकी अंदाधुंदी असे कीं, वर्षानुवर्षे दरबारांत दाद लागत नसे. याचा फायदा घेण्याचें एका धूर्त माणसानें मनांत आणिलें आणि पितळी दरवाजा नांवाची एक वेस शहरांत होती, त्या वेशीच्या तोंडाशीं तो आपली कचेरी मांडून बसला. कोणताही माल शहरांतून बाहेर किंवा बाहेरून शहरांत जावयाचा झाला, तर कांहीं ठराविक जकात घेतल्याशिवाय तो जाऊं देऊं नये असा बादशहाचा हुकूम आहे असें तो सांगत असे. जकात भरल्याबद्दल तो जी पावती देत असे, तिच्यावर 'गोमागणेश पितळी दरवाजा' असा शिक्का तो मारी. कित्येक वर्षे असें चाललें होतें. पुढें एके दिवशीं बादशहाला ती गोष्ट उमगली. पण इतक्या वर्षांची वहिवाट त्याला मोडतां येईना व शिवाय त्या माणसाचा धूर्तपणा पाहून बादशहा खुष झाला व त्यानें ती वहिवाट तशीच पुढें चालविली. यावरून गोमागणेश ह्मणजे कोणी तरी 'क्ष' ( गोमाजी कापशे ) असा अर्थ झाला.

घटोत्कचाचा बाजार— घटोत्कच हा हिडिंबेपासून झालेला भीमाचा पुत्र.

चलरामाची कन्या वत्सला हिच्या लग्नाच्या वेळीं यानें मायेचा बाजार उघडून जुन्या वस्तु घेऊन नव्या झकपक मायावी वस्तु कौरवांना दिल्या, आणि त्यांना फसविलें. यावरून फसवेगिरी असा अर्थ.

घाशीरामी—घाशीराम कोतवाल हा श्रीमंत सवाई माधवराव पेशव्यांचे कारकीर्दींत पुण्यास मुख्य कोतवालाच्या हुद्यावर होता. नाना फडणिसाची यावर कृपादृष्टि असल्यामुळें शेफारून त्यानें रयतेवर फार जुलूम मांडला होता. एकदां त्यानें कांहीं तेलंगी ब्राह्मणांना कोंडून मारल्यावरून श्रीमंतांच्या हुकुमावरून त्याची धिंड काढली व ब्राह्मणांनीं दगड मारून त्याला ठार केलें. यावरून 'घाशीरामी' म्हणजे अत्यंत जुलुमाची कारकीर्द असा अर्थ झाला.

चतुरसावाजी—सावाजी नांवाचा एक चतुर पुरुष होऊन गेला. यावरून विपरीत लक्षणेनें मूर्खाला ही संज्ञा देतात.

चंदुलाल—हा जातीचा खत्री असून निजामाचा मुख्य दिवाण होता. याचा दानधर्माबद्दल मोठा लौकिक असे. यावरून दानशूराला चंदुलाल ही संज्ञा देऊं लागले.

चर्पटपंजरी—या नांवाचें श्रीशंकराचार्यांच्या नांवाखालीं मोडणारें एक स्वतंत्र काव्य आहे. हें बरेंच लांब असून एकाच वृत्तांत असल्यामुळें कंटाळवाणें होतें. यावरून शुष्क, लांबणीचें व कंटाळा आणणारें भाषण असा अर्थ. A long yarn.

भास्करभाऊची ती स्थिति पाहून सीतागमाला वाईट वाटलें. पण पंड्याजीची चर्पटपंजरी चाललीच होती. —जग हें.

चाणक्य—हा गांधारदेशचा, तीन वेदांचें अध्ययन केलेला, विद्वान् ब्राह्मण होता. हा मगध देशांत आला असतां तेथील नंदराजाशीं त्याचें वैर जडलें. तें इतकें कीं, नंदकुळाचा नाश करीन, तेव्हांच शेंडीला गांठ देईन, अशी त्यानें प्रतिज्ञा केली. पुढें त्यानें चंद्रगुप्ताला हाताशीं धरून अनेक राजकारस्थानें करून शेवटीं नंदाचा नाश करून चंद्रगुप्ताला गादीवर बसविलें. यावरून अतिशय खोल कारस्थानी माणसाला चाणक्याची उपमा देतात.

चार्वाक–सुप्रसिद्ध नास्तिकमताचा प्रवर्तक. यावरून कोणीही नास्तिक हा अर्थ.

चित्रगुप्त–प्राणिमात्राच्या पापपुण्याचा हिशेब ठेवणारा यमाचा एक सेवक; यावरून हिशेबाच्या व लिहिण्याच्या कामांत पटाईत कारकुनाला ही संज्ञा लावतात.

जडभरत–या नांवाचे ऋषि होते. ते अतिशय मंद दिसत. त्यावरून मंदबुद्धीच्या व आळशी माणसाला ही संज्ञा देतात.

जमदग्नि–हे फार तामसी वृत्तीचे रागीट ऋषि होते. यावरून रागीट मनुष्य हा अर्थ.

त्यांत आजोबा तर फारच कडकडीत! जमदग्नीचाच अवतार!

–पण लक्ष्यांत०

जांबुवंत–रामचंद्राच्या वानरसेनेपैकीं एक वृद्ध कपि. यावरून मंडळीपैकीं कोणीही वयोवृद्ध नायक असा अर्थ.

तिमाजी नाईक–रा. हरि नारायण आपटे यांच्या 'आजकालच्या गोष्टीं' पैकीं 'मधली स्थिति' या कादंबरीच्या प्रारंभींच तिमाजी नाईक नांवाच्या एका अत्यंत कृपणाचें पात्र घातलें आहे. नाईक मरावयाला टेंकलें असतांही औषधाकरितां पैसाअधेला खर्चण्याचें त्यांच्या जिवावर आलें. यावरून अत्यंत चिक्कु किंवा कृपण माणूस हा अर्थ.

तुकारामबुवाची मेख–तुकारामबोवाच्या कांहीं कांहीं अभंगांत असा गूढ अर्थ भरला आहे कीं, तो कोणालाच निश्चयपूर्वक उकलतां येत नाहीं. यावरून तु० म्हणजे न उकलण्यासारखें कोडें किंवा गूढ हा अर्थ.

त्राटिका–एका राक्षशिणीचें नांव. यावरून एखादी जहांबाज, कजाग बायको. A shrew.

त्रिशंकु–त्रिशंकु नामक पौराणिक कालचा एक राजा सदेह स्वर्गलोकीं गेला असतां, देवांनीं त्याला खालीं लोटून दिलें; परंतु आपल्या पुण्याच्या जोरावर त्याला स्वर्गाला नेण्याचा विश्वामित्रानें यत्न केला. यामुळें तो बिचारा अधांतरींच लोंबकळत राहिला. यावरून धड इकडेही नाहीं व तिकडेही नाहीं, असा लोंबकळत राहिलेला मनुष्य असा अर्थ.

त्रिस्थळी यात्रा– काशी, प्रयाग, ( अलाहाबाद ) आणि गया या तीन क्षेत्रांची यात्रा ती त्रिस्थळी यात्रा. एकाच माणसाला निरनिराळ्या ठिकाणीं कामें करावीं लागलीं ह्मणजे त्यासंबंधानेंही हा शब्द वापरतात.

कोठें पुणें, कोठें बडोदें आणि कोठें हैद्राबाद ! त्रिस्थळी यात्रा, पण आह्मी ती अवघ्या दहा दिवसांत करून आलों.

दत्त ह्मणून उभें राहणें– दत्तात्रेय ह्मणून जो देवाचा अवतार झाला, तो स्वयंपाक सिद्ध होतांच कोल्हापुरास अकस्मात् भिक्षेस येई अशी प्रसिद्धी आहे. त्यावरून एखाद्या कार्याच्या सिद्धीसाठीं खटपट न करतां केवळ उपभोगापुरतें किंवा मनींमानसीं नसतां एकाएकीं आयतेवेळीं येऊन हजर होणें असा अर्थ. To step in to enjoy an advantage.

इतक्यांत निजामाच्या हत्तीवरून त्यांचा बॉडीगार्ड उठला, आणि......मधोमध भीमसेनाप्रमाणें नग्न तरवार घेऊन एकाएकीं पेशव्यांपुढें दत्त ह्मणून उभा राहिला.

—लक्ष्मी आणि सरस्वती.

दिल्लीचा सोदा– दिल्ली हें मुसलमानांचें राजधानीचें शहर असल्यामुळें तेथें साहाजिकच पुष्कळ श्रीमंत सरदार व सावकार वगैरे लोक रहात असत. त्यांना फसविण्यासाठीं तसेंच अट्टल सोदेही तेथें येऊन राहिले होते. यावरून अट्टल सोदा हा अर्थ. A first class rake, or scamp.

द्राक्षें आंबट– इसापनीतींत एक कोल्ह्याची गोष्ट आहे कीं, एक कोल्हा द्राक्षांच्या वेलीखालीं उभा होता. द्राक्षांचे घोंस पाहून त्याच्या तोंडाला पाणी सुटलें आणि ते घोस मिळविण्यासाठीं त्यानें फार खटपट केली. पण वेल उंच असल्यामुळें त्याच्या हातीं द्राक्षें लागलीं नाहींत. तेव्हां आपल्या मनाला निराशा न वाटावी ह्मणून तो ह्मणाला कीं, द्राक्षें आंबट आहेत, तीं मला नकोत. या गोष्टीवरून जी गोष्ट प्रयत्नांतीं साध्य होत नाहीं, ती वाईट अशी मनाची समजूत करणें असा अर्थ.

द्राविडो लडब्रडाम्यहम्– या संप्रदायाच्या उत्पत्तीविषयीं पुढील दंतकथा सांगतातः—श्रीमंत सवाईमाधवराव पेशव्यांची स्वारी पुरंदरास होती, आणि नाना फडणीस सासवडास राहून राज्यकारभार पहात होते. तेव्हां एक द्रविडदेशीय ब्राह्मण पुरंदरास जाऊन श्रीमंतांना भेटला. त्यांनीं

त्याला नाना फडणिसाकडे लावून दिलें. नानांचे मनांत त्याचें काम करावयाचें नव्हतें. ह्मणून त्यांनीं पुनः त्याला पुरंदरास जावयास सांगितलें. याप्रमाणें टोलवाटोलवी चाललेली पाहून ब्राह्मण कंटाळला, आणि त्यानें पुढील श्लोक रचला–' गडाच्च सास्वडं यामि सास्वडाच्च पुनर्गडम् । गडसास्वडयोर्मध्ये द्राविडो लडबडाम्यहम् । यावरून इकडून तिकडे व तिकडून इकडे विनाकारण लुडबुडण्याला ही ह्मण लावतात.

**धन्वंतरी**– समुद्रमंथनानंतर समुद्रांतून निघालेला उत्तम वैद्य. यावरून रोग प्रतिज्ञेनें बरें करणारा वैद्य हा अर्थ.

तुझ्यासम नसेचि या भ्रमगदास धन्वंतरी
नसेल दुसरा असा भ्रमगदार्त माझ्यापरी ॥ –गो० वा० कानिटकर.

**धर्मराज**– युधिष्ठिर हा फार सच्छील आणि सचोटीचा पुरुष असल्यामुळें त्याला धर्माचा अवतार समजत. त्यावरून कोणीही सच्छील व धर्मनिष्ठ माणूस असा अर्थ.

**नाना फडणीस**– पेशवाईंत नाना फडणीस हे मोठे धोरणी, चतुर आणि कारस्थानी पुरुष होऊन गेले. यावरून सामान्यतः कोणी विलक्षणबुद्धीचा व धोरणी पुरुष असा अर्थ.

**नृसिंहावतार ( नरसिंहावतार )**– हिरण्यकशिपु नांवाच्या दैत्याच्या वधासाठीं श्रीविष्णु खांबांतून उग्र नृसिंहाच्या रूपानें प्रकट झाले, या कथेला उद्देशून उग्र स्वरूप धारण करणाराला नृ० ह्मणतात.

कलुशाची गांठ पडल्यावर, ज्यांच्या मसलतीनें त्याला बापाची गादी मिळूं नये असें ठरलें होतें, त्या सर्वांवर संभाजीनें कडक नृसिंहावतार धारण केला.
–संभाजी.

**पांचजन्य करणें**– पांचजन्य हें विष्णूच्या शंखाचें नांव आहे. पांचजन्य ( शंख ) करणें=बोंब मारणें हा अर्थ.

भयंकर गर्दी उसळली ! कोणाचे हात तुटले, कोणाचे पाय तुटले ... ह्मणून ते पांचजन्य करूं लागले. –लक्ष्मी आणि सर०

**पुराणांतलीं वांगीं पुराणांत**– ही ह्मण कशी निघाली याविषयीं पुढील गोष्ट सांगतातः–एकदां एक पुराणिकबोवा पुराण सांगतां सांगतां चातुर्मा-

स्यांत वांगीं खाणें शास्त्रांनीं निषिद्ध आहे असें मोठ्या आवेशानें बोलून गेले. तें पुराण ऐकायला पुराणिकबुवांची बायकोही होती. तिनें तें ध्यानांत ठेविलें आणि वांग्यांची भाजी करण्याचें सोडलें. बुवांना तर वांगीं फार प्रिय होतीं. रात्रीं बुवा जेवायला बसले, तेव्हां ताटांत वांग्यांची भाजी वाढलेली नाहीं हें पाहून रागावले आणि असें कां असें त्यांनीं विचारलें. बायकोनें ह्मटलें ' आजच आपण वांगीं निषिद्ध ह्मणून सांगितलें. तेव्हां अशी निषिद्ध भाजी कशी करावी ? ह्मणून मीं केली नाहीं. ' यावर पुराणिकबुवा हंसून ह्मणतात, ' अग वेडे, पुराणांतलीं वांगीं पुराणांत, घरीं काय त्याचें !' Mighty in talk, slack in act.

पूतना मावशी– पूतना ही एक राक्षसी होती. ती मायावी रूप धरून कृष्णाचा नाश करण्यासाठीं आली व मी मावशी आहें असें ह्मणून कृष्णाला पाजूं लागली. तिच्या स्तनांत विष होतें. तिला कृष्णानें मारलें. यावरून दिसण्यांत सुंदर व सभ्य, पण अंतर्यामीं दुष्ट अशी स्त्री असा अर्थ.

बाजीराई (वी)– थाटमाट ( दुसरे बाजीराव पेशवे यांच्या थाटामाटाची प्रसिद्धि आहे. )

बाजीरावाचा नातू– थोरले बाजीराव पेशव्यांचे नातू दुसरे ( धाकटे ) बाजीराव यांना आयतें राज्य मिळालें असतां ऐषआरामाच्या व मूर्खपणाच्या पायीं त्यांनीं तें घालविलें. यावरून ' बडे बापके बेटे ' पण मूर्ख, मिजासखोर अशा माणसाला हें नांव देतात.

बादरायण संबंध– एकदां एका श्रीमंताच्या घरीं एक लुच्चा मनुष्य पाहुणा ह्मणून गेला, आणि मी आपला संबंधी आहे असें सांगून राहिला. त्या गृहस्थाला वाटलें कीं, बायकोच्या माहेरच्या संबंधाचा कोणी असेल; बायकोला वाटलें नवऱ्याच्या संबंधाचा कोणी असेल. पण प्रत्यक्ष त्याला संबंधी कसा तें कोणीच विचारीना. बरेच दिवस लोटल्यावर त्या गृहस्थाला वाटलें कीं याला एकदां विचारावें. ह्मणून त्याला विचारलें. तेव्हां तो ह्मणाला कीं, आपला व आमचा बादरायणसंबंध आहे. ह्मणजे असा– ' अस्माकं बदरीचक्रं युष्माकं बदरीतरुः। बादरायणसंबंधात् यूयं यूयं वयं वयम् ॥ ' ह्मणजे आमच्या गाडीचें चाक बोरीच्या लांकडाचें आहे

आणि तुमच्या दाराशीं बोरीचें झाड आहे. झाला हा बादरायण संबंध ! ! यावरून कोठला तरी ओढून बळेंच चिटकविलेला संबंध हा अर्थ.

विष्णुपुराणांतला एखादा श्लोक घ्यावा आणि अमुक अमुक इतिहासकाराचा अमुक अमुक लेख आहे ह्मणून त्याशीं तो ताडून पहावा, आणि कांहीं तरी सांगड लावून बादरायण संबंध जोडून द्यावा येवढाच काय तो हल्लींच्या स्थितींत मार्ग उरला आहे. —निबंधमाला.

बायजाबाई— बायजाबाई शिंदे या दानधर्माकरितां आणि वैभवाकरितां प्रसिद्ध होत्या. त्यावरून आपलें वैभव दाखविण्यासाठीं दानधर्म करणाऱ्या बाईला बायजाबाई ह्मणतात.

बारभाईचें कारस्थान—[ बारभाई = बारा भाऊ ] अगदीं भावासारखी एकमतानें वागणारी जी मंडळी तिनें केलेलें कारस्थान. श्री. नारायणराव पेशवे मारले गेल्यानंतर राघोबादादांचे विरुद्ध कारभारी मंडळीनें केलेला कट. यावरून कांहीं दुष्ट मंडळी गुप्तपणानें एकत्र जमून जें काय कारस्थान करतात त्याला बार० ह्मणतात. A Cabal.

बारभाईचा कारभार— गोंधळ [ जो तो त्या कारभारांत हात घालणार अशा रीतीनें उडालेला गोंधळ. ] या संप्रदायाचें मूळही वरच्यासारखें पेशवाईतल्या बारभाईच्या कारस्थानांतच आहे.

एखादा कारखाना एकाकडेच असल्यानें जितका सुरळीत चालण्याचा संभव असतो, तितका बारभाई झाल्यानें असत नाहीं. —केसरी.

बिरबल— अकबर बादशहापाशीं बिर० नांवाचा एक फार चतुर व शहाणा प्रधान होता, त्यावरून चतुर व धोरणी मनुष्य असा अर्थ.

बिवलकरी वळण— बिवलकर नांवाच्या गृहस्थानें घालून दिलेलें मोडी अक्षरांचें वळण; या वळणाचीं अक्षरें साधीं व गोल असतात. त्यांच्यांत खोंच नसतें. यावरून साध्या बालबोध वर्तनाचा कित्ता असा अर्थ.

बीचमें मेरा चांदभाई— मध्यें आपलेंच घोडें पुढें ढकलणें. या ह्मणीची उपपत्ति अशी सांगतात कीं, एक बाई आपल्या मुलांच्या हुशारीच्या गोष्टी दुसऱ्या एका बाईपाशीं सांगत होती. त्या ऐकून एका मुसलमानिणीच्यानें राहवेना. ती मध्येंच तोंड घालून ' मेरा चांदभाई ' असें ह्मणे, व

आपल्या मुलाच्या ( चांदभाईच्या ) हुशारीच्या गोष्टी सांगण्याची उत्सुकता दाखवी. यावरून ही ह्मण पडली.

**बृहस्पति**– ( खालीं 'वाचस्पति' हा शब्द पहा. )

**भगीरथ प्रयत्न**– भगीरथानें महत्प्रयासानें स्वर्गलोकची गंगा मृत्युलोकीं आणिली. यावरून अतिशय मोठे प्रयत्न हा अर्थ. A herculean feat.

**भीष्मप्रतिज्ञा**– भीष्मानें अविवाहित राहण्याची केलेली प्रतिज्ञा आमरण पाळली. यावरून कडकडीत रीतीनें पाळलेली प्रतिज्ञा असा सामान्यतः अर्थ झाला. An inviolable engagement.

**मदनाचा पुतळा**– मदन हें कामदेवाचें नांव. यावरून सुंदर पुरुष असा सामान्यत्वेंकरून अर्थ घ्यावयाचा. A handsome person.

'पाहीन ना आतां कसला मदनाचा पुतळा हिला नवरा मिळतो तो!'

–पण लक्ष्यांत॰

**मनु पालटणें, मन्वंतर होणें**– पुराणांत मन्वंतरें सांगितलीं आहेत; एक मनु जाऊन त्याच्या ठिकाणीं दुसरा आला ह्मणजे मनु पालटला, मन्वंतर झालें असें ह्मणावयाचें. कालक्रांति झाल्यामुळें विचारक्रांति झाली ह्मणजे मनु पालटला, असें हल्लीं ह्मणतात.

'आतां मनु पालटल्यामुळें पूर्वींचीं धर्मबंधनें पुष्कळच शिथिल झालीं आहेत, धर्मसमजुतींतही बदल झाला आहे.'

**मारुतीचें शेंपूट**– मारुती सीताशुद्धीसाठीं लंकेंत गेला, तेव्हां तेथें राक्षसांनीं त्याला पकडून त्याच्या शेंपटाला चिंध्या बांधल्या. पण तें इतकें लांबलें कीं संपेचना. यावरून मा॰ ह्मणजे लांबत जाणारें काम. A work ever prolonging.

**मोगलाई**– मोगलाईंत अंदाधुंदी व जुलूम असत अशी समजूत आहे. यावरून अंदाधुंदी, अव्यवस्था इ॰चें राज्य असा अर्थ. Misgovernment.

**म्हाळसा**– खंडोबाची स्त्री; हिच्या मूर्तीच्या कपाळाला कुंकवाचा मोठा मळवट भरतात. यावरून जिच्या कपाळीं मोठा कुंकवाचा मळवट असेल व जी शरीरानें धष्टपुष्ट असून गबाळ असेल अशी स्त्री असा अर्थ.

**यादवी**— कृष्णावताराचे शेवटीं यादव पिंडारकक्षेत्रीं मदिरेनें धुंद होऊन आपापसांत भाडूं लागले व शेवटीं भांडणाचे पायीं त्यांचा नाश झाला या कथेवरून गृहकलह हा अर्थ. Internecine dissensions.

मुसलमानांचा शिरकाव हिंदुस्थानांत कसा झाला ? मराठ्यांच्या राज्याला खग्रास ग्रहण कसें लागलें ? बंगालचा सुभेदार सुराजउद्दौला कां उलथून पडला ? या सर्व प्रश्नांचें उत्तर ' यादवीमुळें ' या एका शब्दांत देतां येतें.

**रांगडा**— गुजराथ व माळवा या प्रांतांतल्या हिंदु रहिवाशांचें जातिवाचक नांव. हे लोक सुधारणेंत मागें असल्यावरून या शब्दाचा अर्थ अडाणी बोंगाडे, रीतभात ठाऊक नसलेले, असा होतो.

**राम नसणें**— रामायणांत अशी कथा आहे कीं, सीतेनें एकदां हनुमानावर सुप्रसन्न होऊन त्याला आपल्या गळ्यांतला रत्नहार बक्षीस दिला. पण तें मर्कट ! त्याला रत्नहाराची काय किंमत ! त्यानें त्यांतलें एकेक रत्न तोडून हातीं घेतलें आणि त्यांत रामाची मूर्ति दिसली नाहीं, ह्मणून फोडून टाकलें. कारण ज्यांत राम नाहीं त्यांत कांहीं अर्थ नाहीं अशी त्याची समजूत ! त्यावरून राम नसणें ह्म० सत्व किंवा अर्थ नसणें हा अर्थ.

**रामबाण औषध**— रामाचा बाण जसा कधीं व्यर्थ न जाणारा, त्याप्रमाणें गुण केल्यावांचून कधीं न राहणारें असें खात्रीचें औषध. A never failing remedy.

**रामराज्य**— आदर्शराज्य ( जसें असावें तसें उत्कृष्ट राज्य ). श्रीरामचंद्र अयोध्येस राज्य करीत असतां सगळी प्रजा आपापल्या धर्माप्रमाणें वागे; कोणीही पापाचरण करीत नसे; यामुळें सर्वत्र सुख नांदत होतें, असें रामायणांत म्हटलें आहे. त्यावरून उत्कृष्ट, सुखाचें व शांततेचें राज्य असा अर्थ. An ideal government.

जालें रामराज्य काय उणें आह्मांसी । धरणी धरी पीक गाई वोळल्या हैंसी ॥
रामराज्य झालें, रामराज्य झालें । रामराज्य झालें, सद्गुरूचेनि वोलें ॥ —एकनाथ.

**रामाय स्वस्ति, रावणाय स्वस्ति करणें**— दोन परस्परविरुद्ध पक्ष असले तरी दोन्हीं पक्षांचें अभीष्ट चिंतणें, आपण कोणत्या पक्षाचे आहों हें समजूं न देणें; दोन्ही पक्षांस खुष ठेवणें. दोन्ही पक्षांच्या ह्मणण्यांत तथ्य आहे असें सांगून थापाथोपी करणें. [ रामाचा पक्ष सत्याचा होता त्यावि-

रुद्ध बोलतां येत नाहीं, व रावण बलाढ्य राजा त्याच्याविरुद्ध ब्र काढण्याची सोय नाहीं अशा अडचणींत दोन्ही पक्षांला चांगलें म्हणून आपला भलेपणा कायम ठेवण्याची ही युक्ति होती. ]

रावणराज्य– रामराज्याचे उलट ( वर रामराज्य शब्द पहा ).

लंकेची पार्वती– जिच्या अंगावर यत्किंचित्ही अलंकार नाहीं अशी सौभाग्यवती स्त्री. ही संज्ञा खोगीर, जीन वगैरे कांहीं नसलेल्या घोडीलाही केव्हां केव्हां देतात.

[ लंकेंत संपत्तीची समृद्धि असल्यामुळें अलंकारांना तोटा नाहीं; तथापि पार्वती ( शंकराची पत्नी ) तेथें गेली तरी तिला अलंकार मिळावयाचे नाहींत. कारण ती बोलून चालून गोसाव्याची बायको ! यावरून अलंकार-विहित स्त्री असा अर्थ. ]

लंकेस सोन्याच्या विटा– लंका हें शहर अतिशय श्रीमंत होतें असा लोकप्रवाद आहे. तेथें सहज थोडेंतें काम केलें कीं, मजुरीबद्दल सोन्याची वीट मिळते, पण हजामतीबद्दल न्हाव्याला सोन्याचीच वीट द्यावी लागते असें सांगतात, पण लंका फार दूर राहिली. तिचें वैभव आपल्या काय उपयोगाचें ? अशा अर्थानें या संप्रदायाचा उपयोग होतो.

वाचस्पति– देवांचे गुरु बृहस्पति यांना त्यांच्या अस्खलित वक्तृत्वावरून वाचस्पति ( वाणीचे ईश्वर ) म्हणत. यावरून निंदेच्या अर्थानें एखाद्या वाचाळ माणसाला बृहस्पति किंवा वाचस्पति म्हणतात.

वामनमूर्ति– ठेंगू मनुष्य. विशेषतः मोठ्या कर्तबगारीचा मनुष्य ठेंगू असला म्हणजे त्यास ' वामनमूर्ति ' म्हणतात. ईश्वराचा पांचवा अवतार वामन हा फार ठेंगू होता, पण शेवटीं त्यानें आपल्या पायानें बळीस पाताळीं घातलें !

एखादा नेपोलियन बादशहा ...... कीं नो एकटा सैन्यांत असणें आणि अव्वांलाख फौजेची कुमक मिळणें बरोबर असे. ती स्वारी स्वतः कशी होती म्हणाल तर वामनमूर्ति !
–निबंधमाला.

वीरभद्र– दक्षयज्ञाचा ध्वंस करण्यासाठीं शंकरांनीं जटेपासून निर्माण केलेला वीर पुरुष. यावरून अतिशय दुराग्रही, बेसुर रूपाचा व नाशास प्रवृत्त झालेला असा मनुष्य हा अर्थ.

शकुनिमामा– शकुनि हा दुर्योधनाचा मामा होता. हा कपटकर्मांत व दुष्टपणांत पटाईत होता. यावरून कपटी व कृष्णकारस्थानें करणारास हा शब्द लावतात. A Machiavelli.

शतंभीष्म–भीष्म हा भारतीय युद्धांतला महान् वीर होता. शतं ह्म० त्याच्यासारखे शेंकडों; शेंकडों पराक्रमी पुरुष असा अर्थ.

कवीनें तत्काळ उत्तर केलें कीं 'ऐसे दाते शतंभीष्म बहुत आहेत; परंतु ऐसा याचक कोणीं तुम्हीं पाहिला नसेल.' –शिवाजीचें सप्त० चरित्र.

शरपंजरीं पडणें– भीष्म प्राणावसान होण्याचे अगोदर आपल्या भोंवतीं शरांचें ह्मणजे बाणांचे पंजर (आवरण) करून आंत आसन्नमरण होऊन पडले होते. त्यावरून श० पडणें ह्म० मृत्यूच्या द्वारीं खितपत पडणें; दुसरा अर्थ–ज्यांतून बाहेर पडण्यास कोणताच उपाय नाहीं अशा संकटांत पडणें.

शापादपि शरादपि– हे शब्द प्राचीन काळच्या ऋषींसंबंधानें उपयोजिले जातात. शाप देऊन भस्म करण्याची शक्ति व त्याचप्रमाणें शरांनीं (बाणांनीं) ठार करण्याची शक्ति या दोन्ही द्रोणाचार्यांच्या अंगीं होत्या. ह्मणून शापा० हें विशेषण प्रथम द्रोणाचार्यांना लावीत. पुढें गृहस्थाई आणि भिक्षुकी, शास्त्र आणि व्यवहार, धर्म आणि कर्म अशा दोहोंतही जे सारखे निपुण त्यांना ही संज्ञा देऊं लागले.

शांभवी– शंभूची प्रियसखी ह्म० पार्वती. पुढें भांग असा अर्थ झाला. कारण शंभूला भांग प्रिय आहे.)

शिकंदर– मॅसिडोनियाचा राजा अलेक्झांडर (आस्कंदर–शिकंदर). हा मोठा धूर्त व भाग्यशाली होता. यावरून धूर्त, शहाणा व भाग्यशाली पुरुष असा अर्थ. उपरोधिक अर्थानेंही या संप्रदायाचा उपयोग करतात.

त्याचें नशीब मोठें शिकंदर कीं नाहीं! बेटा जन्मास आल्याबरोबर बाप मरला वरादाराचें वाटोळें झालें, आणि आश्रयदात्याला देशांतर करावें लागलें!

शिखंडी– हा प्रथम स्त्री असून मागाहून त्याला पुरुषत्व मिळालें होतें. यावरून पुंस्त्वहीन असा तृतीय प्रकृतीचा मनुष्य हा अर्थ.

शिराळशेट– या नांवाचा एक वाणी पूर्वी होऊन गेला. यानें दुष्काळांत लोकांचे प्राण वांचविल्यामुळें खुश होऊन राजानें आपल्या राज्याचा सगळा

अधिकार साडेतीन घटकांपर्यंत त्याला दिला होता. पण तेवढ्यांतही त्यानें देवस्थानें वगैरेंना इनामें वगैरे करून देऊन आपलें नांव चिरकाल गाजविलें. या त्याच्या उपकाराच्या स्मरणार्थ अजून श्रावण शु० ६ ला लोक त्याचा मातीचा पुतळा करून पुजतात व त्याच्या नांवानें जत्रा भरवितात. शिराळशेटीचें राज्य किंवा औट घटकांचें राज्य म्हणजे अल्पकाल टिकणारें वैभव.

शुकाचार्य– श्री व्यास मुनीचा मुलगा शुक हा कडकडीत ब्रह्मचारी होता. यावरून कडकडीत ब्रह्मचर्य व्रतानें राहणारास ही संज्ञा देतात.

शुक्राचार्य– दैत्यगुरूचें नांव. याचा एक डोळा फुटला होता. यावरून एका डोळ्याच्या कोणाही माणसाला विनोदानें शुक्रा० म्हणतात.

शुंभ– या नांवाचा दैत्य होता. त्याचा दुर्गेनें वध केला. हा आकृतीनें विशाल होता. यावरून चांगला धष्टपुष्ट पण बुद्धीनें मंद असा मनुष्य असा अर्थ. A dull and stupid fellow.

ज्ञानसंपन्नतेच्यासंबंधानें हे ( अब्दुल हमीद ) आणि त्यांचे चाकरनोकर यांत कांहीं अंतर नव्हतें. ते शुंभ तसे हे शुंभ ! –ओक.

शूर्पणखा– रामायणांत वर्णिलेल्या एका राक्षसिणीचें नांव. यावरून कुरूप स्त्री असा सामान्यत्वें करून अर्थ. An ugly woman.

'असल्या छप्पनहजार शूर्पणखा तुझ्या पायाशीं लोळतील.' –पण लक्षांत०

शेंदाडशिपाई– एक भित्रा माणूस आपल्या बायकोच्या नथेंतून तीर मारून मडक्यांच्या उतरंडी फोडण्यांत आपली बहादुरी दाखवीत असे. एके दिवशीं त्याची फजिती करण्यासाठीं कांहींजण रात्रीचे टपले, आणि हा बाहेरून घरांत शिरत असतां त्यांनीं त्याच्या पाठीवर पिकलेलीं शेंदाडें ( एक फळ आहे ) मारलीं; त्याबरोबर तो इतका भ्याला कीं, आपणांला कोणी गोळ्या घालून मारलें, धांवा, धांवा, असें तो ओरडूं लागला. लोक येऊन पाहतात तों ज्याला हा इतका भ्याला त्या गोळ्या नसून शेंदाडें ! त्यावरून शूरत्वाच्या वल्गना करणारा भित्रा माणूस असा अर्थ. A braggadocio.

पण तुमच्यासारख्या शेंदाड शिपायांवर असले शब्दप्रहार तरी करण्यांत काय अर्थ आहे.

सगळ्या गलबतांत अर्धी सुपारी माझी– एक मनुष्य समुद्रांतून

प्रवास करीत असतां त्यानें सुपारीचीं दोन शकलें करून त्यांतलें एक ज्या गलबतांत माल भरला होता त्यांत टाकून दिलें आणि गलबत किनाऱ्याला लागलें व माल उतरावयास लागले, तेव्हां ती अर्धी सुपारी माझी मला द्या असें तो ह्मणूं लागला. खंडोगणती सुपारी गलबतांत भरलेली त्यांत याची अर्धी सुपारी कशी सांपडावी ? यावरून भलतीच एखादी मागणी करून तिच्यासाठीं हट्ट धरून बसणें असा अर्थ.

सटवाजीराव ढमाले— एका फ्रेंच प्रहसनावरून मराठींत स० या नांवाचें एक प्रहसन झालें आहे ! त्यांतलें मुख्य सटवाजीरावांचें पात्र मोठें गमतीचें आहे. सटवाजीराव हा मूर्ख, पण शहाणपणाची व विशेषतः कुलीनत्वाची घमेंड बाळगणारा होता. त्याला परगांवच्या एका लुच्चानें खासा फसवून त्याची फजीती केली असें प्रहसनाचें कथानक आहे. त्यावरून खरोखर मूर्ख व भोळा, परंतु शहाणपणाची ऐट आणणारा, फजीतखोर अशा माणसाला स० ह्मणतात.

सरस्वति— विद्येची अधिष्ठात्री देवता. यावरून विद्यासंपन्न विशेषतः उत्तम वक्त्री अशा स्त्रीस सरस्वति ह्मणतात. An eloquent woman.

साडेतीन शहाणे—सखाराम बापू, विठ्ठल सुंदर आणि देवाजीपंत, हे तीन शहाणे व नाना फडणवीस अर्धे शहाणे, मिळून साडे तीन शहाणे पेशवाईंत प्रसिद्ध होते. यावरून विपरीत लक्षणेनें लुच्चे किंवा मूर्ख माणसांच्या जमावाला ही संज्ञा देतात.

सांबाचा अवतार— सांब ( शंकर ) हे फार भोळे अशी प्रसिद्धि आहे. यावरून फार भोळा माणूस हा अर्थ. A credulous and simple person.

सुभद्रा— ही श्रीकृष्णाची बहीण अर्जुनाला दिली होती. हिची सौंदर्याबद्दल प्रसिद्धि होती. त्यावरून सामान्यत्वेंकरून सुंदर स्त्री असा अर्थ. A beautiful woman.

'धोंडु, पायपोस गेला ही नाहीं तुझी बायको झाली नर...... काय मेली सुभद्रा लागून गेली आहे !' —पण लक्षांत०

सूर्याचे पोटीं शनीश्वर [ शनैश्वर ]— सूर्य हा अत्यंत तेजस्वी आणि

शनि हा फार मंद आहे. शनि हा सूर्याचा मुलगा आहे अशी पौराणिक कथा आहे. यावरून चांगल्या बापाच्या पोटीं वाईट मुलगा जन्मास आला असा अर्थ.

सूतउवाच करणें– सगळ्या पौराणिक कथा सूतांनीं शौनकाला सांगितल्या आहेत. ह्मणून प्रत्येक कथेच्या प्रारंभीं 'सूत उवाच' ह्म० सूत ह्मणाले असें वाक्य असतें. त्यावरून सू० करणें ह्मणजे प्रारंभ करणें हा अर्थ.

हा सूर्य आणि हा जयद्रथ– आज सूर्य अस्तास जाण्यापूर्वी मी जयद्रथाला मारीन, नाहींतर स्वतः मरेन अशी अर्जुनानें प्रतिज्ञा केली होती. तेव्हां श्रीकृष्णानें जयद्रथाला फसविण्यासाठीं सूर्याआड सुदर्शन चक्र लावून संध्याकाळ झाल्याचा भास उत्पन्न केला. तोंपर्यंत जयद्रथ लपून बसला होता. पण आतां संध्याकाळ झाली, आतां आपण निर्धास्त झालों, असें समजून अर्जुन प्राणत्याग कसा करतो तें पाहण्यासाठीं तो बाहेर पडला. त्याबरोबर कृष्णानें सुदर्शन काढून अर्जुनाला ह्मटलें, 'हा सूर्य आणि हा जयद्रथ.' तें ऐकतांच अर्जुनानें त्याला मारून आपली प्रतिज्ञा खरी केली. यावरून दोन्ही गोष्टी समक्षासमक्ष आहेत असा अर्थ. This is the hour and this is the man ! *cf.* घोडा मैदान जवळ आहे.

गड्या तुझ्या एका मुलीचा तर अनुभव तुला आलाच; आतां दुसऱ्याही मुलीचा येईल ! हा सूर्य आणि हा जयद्रथ व्हायला फार अवकाश नको. –अतिपीड०

हिडिंबा– या नांवाची एक कुरूप व अक्राळ विक्राळ स्वरूपाची राक्षसी होती व तिनें भीमाला वरलें अशी महाभारतांत कथा आहे. त्यावरून कुरूप व कजाग बायकोला हिडिंबा म्हणतात.

---

# प्रकरण चवथें.

## संख्यावाचक शब्दांवरून झालेले संप्रदाय.

अठरा धान्यांचें कडबोळें—पुष्कळ निरनिराळ्या प्रकारचीं धान्यें भाजून पीठ केलेलें असतें त्याला भाजणी ह्मणतात. या भाजणीचीं कडबोळीं करतात. यावरून निरनिराळ्या प्रकारच्या गोष्टींचें मिश्रण हा अर्थ.

अठरापगड जात—प्रत्येक जातीची पगडी बांधण्याची रीत निराळी असते. यावरून जितके पगड्यांचे प्रकार तितक्या जाती समजतात. अठरा हें सामान्यत्वेंकरून अनेकत्वबोधक आहे. ह्मणून पुष्कळ निरनिराळ्या जातींचे लोक असा अर्थ. All sorts of castes.

कालच्या यात्रेस अठरापगड जात आली होती.

अठराविश्वे दरिद्र—विश्वा ह्मणजे पराकाष्ठेच्या प्रमाणाचा विसावा अंश. वीस विश्वे म्ह० अगदीं पूर्ण अंशांनीं. यावरून अठराविश्वे दरिद्र म्हणजे बहुतेक पूर्ण दारिद्र. Extreme poverty.

घरांत अठरा० दरिद्र असतें; खावयाचे पदार्थ विकत घेण्याची पंचाईत असते. तरी आईबापें मुलांस लहान-लहान खेळणीं विकत घेऊन देत असतात. —ओक.

अढीच्या दिढी—फाजीलपणानें; सढळ हातानें. ( एकाच्या ठिकाणीं दीड खर्च करून हा अर्थ. ) Extravagantly.

अर्ध्या वचनांत असणें—आज्ञा होईल केव्हां व मी ती पाळीन केव्हां अशा उत्सुकतेनें शब्द झेलणें. To be obsequiously obedient unto.

माझे मित्र मला साह्य करण्यास तयार आहेत. सर्व सुखदायक वस्तू माझ्या अर्ध्या वचनांत आहेत, नरी दुःख नाहीं असे निव्वळ सुखाचे दिवस सगळे चौदा भरतात. —ओक.

अर्ध्या हळकुंडानें पिंवळें होणें—यत्किंचित् संपत्ति किंवा गुण प्राप्त झाल्यानें गर्व होणें.

अद्वाचे सद्वा—एकाचे जागीं सवा; मनस्वी आणि अव्यवस्थित. Immoderately large.

बाजारांत माल थोडा आणि मागणी फार, अशी स्थिति पहातांच व्यापाऱ्यांनीं कापसाचा भाव अद्वाचे सद्वा वाढविला.

आवट घटकांचा आनंद–ओट ह्म० साडेतीन. यावरून अल्पकाळ टिकणारा आनंद हा अर्थ.

आवट घटकांचें राज्य– ( मागच्या प्रकरणांत शिराळशेट शब्द पहा. )

आठ हात लांकूड व नऊ हात धलपी–आठ हात लांकडाची नऊ हात धलपी निघणें शक्य नाहीं. अर्थात् यांत अतिशयोक्ति आहे. यावरून अतिशयोक्ति असा अर्थ. अगदीं अशक्य अशी गोष्ट सांगणें. पांच हात कांकडी आणि सहा हात बीं या म्हणीचा अर्थही हाच आहे. Exaggeration.

गेल्या तीन शतकांत आम्हीं एवढें मात्र केलें कीं, आठ हात लांकूड व नऊ हात धलपी अशा मासल्याचीं...अकटोविकट पुराणें रचून ठेविलीं ! —नि. मा.

आंवळ्यायेवढें पूज्य– पूर्ण अभाव. Total absence of.

अलीकडच्या लोकांत बडबडच फार. कर्तृत्वाच्या नांवानें ह्मणाल तर आंवळ्यायेवढें पूज्य !

इजा बिजा तिजा–एकामागून एक असें तीन वेळां. For three times in succession.

इन मीन सवा तीन–फार अल्प संख्या [ इ = ही (बायको) न्= आणि, स =तो ( मुलगा ) वा=अथवा, ती ( मुलगी ) ]; मी, माझी बायको व एखादें मूल. यावरून फार थोडीं माणसें हा अर्थ.

एकछत्री राज्य–एका सार्वभौम राजाच्या सत्तेखालचा प्रदेश. The imperial rule.

हें भरतखंड इंग्लिश लोकांच्या एकछत्री राज्याखालीं आहे. —केसरी.

एक घाव कीं दोन तुकडे करणें– एका झटक्यानिशीं वादग्रस्त गोष्टीचा निकाल लावणें. Showing promptitude.

एक नाहीं कीं दोन नाहीं–एखाद्यास कांहीं विचारलें असतां तो मुळींच कांहीं उत्तर देत नाहीं त्या वेळीं या संप्रदायाचा उपयोग करतात.

बाळा ! तुला लाड देऊं कीं करंजी हवी. असें त्याला शंभरवेळां विचारलें असेल; पण त्याच्याकडून एक नाहीं कीं दोन नाहीं. —करमणूक.

चतुर्भुज करणें–१ मुसक्या बांधणें To have the arms tied behind; २ लग्न करणें To get married.

चतुर्भुज होणें–१ कैद होणें.२ लग्न होणें.

१ अंतःपुरांत असा पांचटपणा करायला लागलें म्हणजे चतुर्भुज होण्याला उशीर लागत नाहीं. –मूकनायक.

**चवदावें रत्न**– मार. समुद्रमंथनाचे वेळीं चौदावें रत्न अमृत निघालें, त्या अमृतावरून युद्ध होऊन दैत्यांना चांगला मार बसला. त्यावरून ही म्हण पडली. कित्येक लोक चवदावें रत्न चाबूक असें समजतात. ती चूक आहे. चाबूक हा चौदा रत्नांपैकीं नाहींच. A sound thrashing.

आम्ही इतकें धीट आहों कीं चवदावें रत्न आमच्या दृष्टीस पडलें कीं पुरे, आम्ही आपले पाय लावून पळत सुटलोंच. –आगरकर.

**चार अक्षरें**—थोडीशी विद्या.

त्याला चार अक्षरें आलीं, कीं देतों कोठें तरी नोकरींत अडकवून.

**चारी दिशा मोकळ्या होणें**– वाटेल तिकडे जाण्याला जग सगळें मोकळें असणें. To have the wide world open before one.

**चारी ठाव जेवण**– भात, भाजी, वरण, पोळी. A decent feast.

**चारी वाटा मोकळ्या**–स्वच्छंदानें वागण्यास मोकळा झालेला. At large.

**चौहोंचा आंकडा घालणें**–प्रशस्तपणें मांडी घालून बसणें. To sit widely, broadly or roomily.

**चौदा चौकड्यांचें राज्य**–कृत, त्रेत, द्वापार आणि कलि हीं चार युगें मिळून एक चोकडी होते. अशा चौदा चौकड्या होत तोंपर्यंत म्हणजे अतिशय दीर्घ काळपर्यंत केलेलें राज्य.

चौदा चौकडीया लंकापति । त्याची कोण झाली गति ॥ – तुकाराम.

सर्व देवांना बंदींत टाकणारा व चौदा चौकड्यांचें राज्य करणारा रावण स्वतःच्या प्रतापासंबंधाच्या ...... चुकीच्या कल्पनेला बळी पडला. – कीचकवध.

**चौपदरी**–चार पदर असलेली अर्थात् भिक्षेची झोळी.

अन्नछत्रवाल्यास जसा चौपदरीचा योग यावा, त्याप्रमाणें या भरतभूमिवासी जडभरतांची आजला हालहवाल होऊन गेली आहे. –केसरी.

**चौपदरी घेणें**–चार आहेत पदर जिला अशी म्हणजे झोळी. यावरून भिक्षा मागणें हा अर्थ. To beg.

**चौऱ्यांशीचा फेरा**–चौऱ्यांयशीं लक्ष योनि फिरल्यानंतर जिवाला मोक्ष

प्राप्त होतो, अशी हिंदूंची समजूत आहे. या सान्या जन्मांतून जाणें याला चौऱ्यांयशींचा फेरा ह्मणतात. A cycle of innumerable births.

विचारावें विवेक दृष्टि । संतचरणीं द्यावी मिठी । तेणें चुके जन्म जरा । चुकवी चौऱ्यांयशींचा फेरा ॥ —एकनाथ.

छत्तिसाचा आंकडा—एकाचें तोंड पूर्वेकडे तर. दुसऱ्याचें पश्चिमेकडे असणें. विरुद्ध असणें. ' ३६ ' हा आंकडा पहातांच या म्हणीचा अर्थ चांगला लक्षांत येतो. कोणत्याही गोष्टीसंबंधानें दोन व्यक्तींचीं विरुद्ध मतें असलीं म्हणजे, त्यांच्यामध्यें 'छत्तिसाचा आंकडा' आहे, असें म्हणतात.

मि. मोर्ले आणि ग्लॅडस्टन यांच्यांत धर्मसंबंधानें छत्तिसाचा आंकडा आहे असें ह्मणण्यास हरकत नाहीं. —आगरकर.

तिसरा पाय !—अगदीं तयारी. फार उतावळी.

' त्याला दाखवाल तें तो सांगेल किंवा सांगाल तें तो दाखवील. त्याला दाखविण्याची मात्र भीड धरतां कामा नये, ह्मणजे सांगायला तिसरा पाय ! ' —विकारविलसित.

तेरड्याचा रंग तीन दिवस—एखादी संस्था किंवा कृत्य थोडे दिवस फार जोरानें चालून बंद पडणें. तेरडा हें एक लहानसें फूलझाड पावसाळ्यांत उगवतें, त्यास गणेशचतुर्थीच्या सुमारास गुलाबी रंगाचीं फुलें येतात. थोडे दिवस फुलांचा बहार असतो, तोंपर्यंत तें झाड फुलांनीं गजबजलेलें दिसतें, पण बहर संपतांच त्याची सगळी शोभा निघून जाते. A display or show which does not abide.

तेरा, बारा चालणें—वाद चालणें, कलागत चालू असणें. To be at sixes and sevens.

त्रिकूट—तिघांचा समुदाय.

आहार, व्यायाम व ब्रह्मचर्य या त्रिकूटावर शरीराच्या सुस्थितीची रचना झाली पाहिजे. —डॉ॰ देशमुख.

त्रेधा उडणें—( त्रि+धा=तीन प्रकार ) गडबड उडणें; हाल होणें; हें करूं, तें करूं, कां आणखी कांहीं करूं असें होणें.

दशग्रंथी ब्राह्मण—ज्यानें संहिता, ब्राह्मण, अरण, शिक्षा, कल्प, व्याकरण, निघंटु, निरुक्त, छंद आणि ज्योतिष या दहा ग्रंथांचें अध्ययन केलें आहे असा

ब्राह्मण. A Brahmin well versed in the ten branches of the Vedas.

दीडदमडीचा–हलका; ज्यास यत्किंचितही किंमत कोणी देत नाहीं असा. Of very little worth.

दीड शहाणा–मूर्ख. A wiseacre.

दुष्काळांत तेरावा महिना– दुष्काळांत वर्षाचे बारा महिने काढतां काढतांच मुष्कील पडते. अशा वेळीं अधिक मास (तेरावा महिना) आला ह्मणजे संकटांत आणखी भर पडते. यावरून संकटांत भर पडणें असा अर्थ. *cf.* Difficulties seldom come single.

दोन हातांचे चार हात होणें– लग्न होणें; To get one married.

एकदां माझ्या बाळ्याचे दोन हातांचे चार हात झाले ह्मणजे डोक्यावरचें ओझें उतरलें. –नि० चं०.

नवकोट नारायण– ज्याचेपाशीं अपार द्रव्य आहे तो. A millionaire.

नव्याचे नऊ दिवस– कोणतीही गोष्ट नवी असते, तोंपर्यंत लोक तिचें कौतुक करतात; पण हा नवेपणा व कौतुक दोन्ही फार वेळ टिकत नाहींत. A wonder lasts for nine-days.

नांवानें पूज्य– मुळींच नसणें. To be wanting in.

विद्येच्या नांवानें पूज्य.

दस गेले पांच उरले (राहिले)– आयुष्याचा बराचसा भाग गेला व थोडा राहिला असा अर्थ.

या थेरड्याला आतां या नसत्या उठाठेवी कशाला पाहिजेत? 'दस०' आतां यानें जपमाळ हातीं घेऊन राम राम म्हणत स्वस्थ राहिलेले दिवस काढावे –संभाजी.

पंचपंच उषःकाल– सूर्योदयाच्या अगोदरच्या पांच घटकांचा काल; यावरून अरुणोदयाचा काळ हा अर्थ. The period of dawn.

पंचप्राणांची आरती ओंवाळणें– प्राण, अपान, समान, उदान आणि व्यान हे पांच मुख्य प्राण आहेत. या प्राणांसह ह्म० सर्वभावेंकरून आरती ओंवाळणें हा अर्थ.

पंच प्राणांची आरती । मुक्ताबाई ओंवाळती ॥

पांचावर धारण बसणें- ( पांच=पंच प्राण ) पंचप्राण निघून जातील कीं काय अशी भीति वाटणें; अतिशय भयभीत होणें. To be frightened to death.

पांचामुखीं परमेश्वर- चार लोक म्हणतील तें खरें. Vox populi vox dei.

बत्तीस गुणी किंवा बत्तीस लक्षणी- शास्त्रामध्यें स्त्रिया व पुरुष यांचीं ३२ लक्षणें सांगितलीं आहेत तीं सगळीं ज्यांचे ठायीं आहेत असे.

बत्तिशी रंगविणें- दांतांतून रक्त वाहील असें जोरानें थोबाडांत मारणें.

बत्तिशी दाखविणें- येथें बत्तिशी ह्मणजे दांत ( ते ३२ असतात अशी समजूत आहे ); यावरून हंसणें हा अर्थ. To show one's teeth.

बहात्तर रोगांचा खंडोबा- ज्याला अनेक रोग एका काळीं आहेत असा रोगी मनुष्य. ( वैद्यशास्त्रांत एकंदर ७२ रोग मानिले आहेत ).

बारा घरचे बारा- भिन्न भिन्न स्थळांचे, व भिन्न भिन्न प्रकृतीचे लोक कांहीं कार्याकरितां एके ठिकाणीं जमतात ते.

बारापंधरा करणें- बोलण्यांत एकदा बारा तर दुसऱ्यांदा पंधरा सांगणें, ह्म० बोलण्यांत मेळ नसणें. To prevaricate.

बारा पिंपळांवरचा मुंजा- ज्याचें जाणें येणें पुष्कळ ठिकाणीं असल्यामुळें अमक्या वेळीं अमुकच ठिकाणीं तो सांपडेल असा नेम नाहीं असा मनुष्य. ( मुंजा=कंवरेस मुंज असतां मरून भूत, झालेला मुलगा. हा पिंपळावर राहतो अशी समजूत आहे ).

बारा बंदरचें पाणी प्यालेला- अनेक देश फिरल्यामुळें चतुर झालेला. A much travelled man.

बाराभाईची खेती- ज्या कामांत किंवा उद्योगांत पुष्कळ मंडळींचें अंग असतें आणि प्रत्येकजण यजमानासारखे हुकूम सोडीत असतो, पण त्या हुकुमांची बजावणी मात्र कोणी करीत नाहीं, अशा प्रकारचा गोंधळ.

बारा महिने तेरा काळ- सदासर्वदा. Incessantly.

बारा वाजणें-विणें- दिवसां किंवा रात्रीं बारा वाजल्यानंतर अनुक्रमें दिवस व रात्र यांना उतरती कळा लागते. यावरून एखाद्याचे बारा वाजणें

म्हणजे त्याच्या उत्कर्षाला ओहोटी लागून तो नाशाच्या पंथाला लागणें. दिवाळें निघणें, नोकरी जाणें किंवा नाश होणें. बारा वाजविणें म्हणजे एखाद्याच्या नाशास कारण होणें.

त्यांचे बारा वाजवीन तरच नांवाचा हैदर होईन. —पटवर्धन यांचे पराक्रम.

बारावा बृहस्पति— जन्मनक्षत्रापासून बाराव्या राशीला बृहस्पति येणें अशुभ समजतात. यावरून उभा दावा, अतिशय द्वेष हा अर्थ.

बावनकशी सोनें— बावन वेळां कसास उतरलेलें सोनें; शुद्ध सोनें; यावरून अतिशय शुद्ध आणि प्रामाणिक मनुष्य.

बेचाळीस उद्धरणें— पूर्वींच्या बेचाळीस पिढ्यांना (पितरांना) शिव्या देणें. To abuse one's ancestors.

मेल्या ह्मशीस दहा शेर दूध— जी म्हैस मरून गेली, ती दहा शेर दूध देत होती असें सांगितलें तर तें खपण्यासारखें आहे. कारण आतां प्रत्यंतर कसें पाहणार ? यावरून मेलेल्या माणसाची यथेच्छ स्तुति करणें हा अर्थ. Praise lavished on the dead.

लाख रुपयांची गोष्ट—लक्ष रुपये किंमतीची अर्थात् अत्यंत मोल्यवान्-महत्त्वाची गोष्ट.

विशी एकुणविशी—वीस होते ते एकूणवीस झाले, म्हणजे कांहीं कमी झाल्यासारखें. Some relief.

'आतां आपली प्रकृति कशी आहे ? कांहीं विशीएकुणविशी वाटतें का ?' —रंगराव.

शतपावली करणें—भोजनोत्तर अन्नपचन चांगलें व्हावें म्हणून थोडेंसें हलकें हलकें घरांतल्या घरांत चालणें.

शंभर नंबरी—शंभर नंबरी सोनें म्हणजे उत्कृष्ट प्रतीचें सोनें; यावरून उत्कृष्ट असा अर्थ.

शंभर वर्षें भरणें—' शतायुर्वै पुरुषः ' याप्रमाणें मनुष्याचें आयुष्य शंभर वर्षें आहे. तीं संपणें ह्मणजे विनाश काळ येणें; मरण प्राप्त होणें.

तुला जी काय हकीकत माहीत असेल ती सगळी सांग, नाहीं तर तुझीं शंभर वर्षें आतांच भरलीं समज. —मथुरा.

शेरास सव्वा शेर—प्रतिपक्ष्यापेक्षां श्रेष्ठ. More than a match.

पट्टकर्णी होणें–एखादी गोष्ट तिसऱ्या माणसास कळणें; यावरून ती फुटणें, इतर लोकांना कळणें हा अर्थ. To be divulged.

सकट घोडे बारा टक्के–(सगळ्या घोड्यांची किंमत बारा टक्के ह० एक-सारखी.) प्रत्येकाच्या गुणावगुणाप्रमाणें प्रत न लावतां सर्वांना सारखें लेखणें.

सरड्याप्रमाणें घटकेंत तीन रंग पालटणें–सरड्यांचे रंग वरचेवर पालटतात, त्याप्रमाणें वरचेवर स्वरूप बदलणें.

सवामणाची बिडी–अतिशय जड अशी पायांतली शृंखला. विवाहित स्त्रीचें पुरुषावर जन्मभर ओझें रहातें यावरून पत्नी हा अर्थ. A wife.

अठरावें वर्ष पुरें होऊनही पायांत सवामणाची बिडी टोकली नाहीं असे मुलगे आतां पूर्वींपेक्षां जास्त सांपडतील. –नि० चं०

सहा महिन्यांची जांभई–पुष्कळ दिवस लांबणीवर पडणारी गोष्ट. A suit in Chancery.

साठी उलटणें–वार्धक्य येणें. To be on the wrong side of sixty.

साता गुणांचा खंडोबा–ज्याला पुष्कळ व्यसनें एका काळीं आहेत, किंवा जो पुष्कळ रोगांनीं पीडिला आहे असा माणूस.

साडेतीन पोपाख–पागोटें, शालजोडी (किंवा शेला), महामुदी (पायजमा किंवा झगा करण्यासाठीं) आणि पटक्यासाठीं किनखापाचें अर्धें ठाण मिळून ३॥ वस्त्रें. बहुमान असा अर्थ.

साडे तीन मुहूर्त–दसरा, दिवाळीचा पाडवा, गुढीपाडवा आणि नागपंचमी.

सात ताड उंच–अतिशय उंच.

सातपांच करणें–जींत पुष्कळ जागीं विसंगतपणा आहे अशी गोष्ट सांगणें. (एकदां सात म्हणणें, दुसऱ्यांदा पांच म्हणणें असा विसंगतपणा).

सातां समुद्रांच्या पलीकडे–फारच फार दूर.

सातां सायासांनीं–फार परिश्रमांनीं. With might and main.

सोळा आणे–पूर्ण. Complete.

काय पण सोळा आणे फजीती झाली!

स्वर्ग दोन बोटें उरणें–गर्वानें ताठणें; वैभवाचा कळस झाल्यासारखें वाटणें.

---

# प्रकरण पांचवें.

## पशु, पक्षी वगैरे प्राण्यांच्या शरीरावयवांवरून झालेले संप्रदाय.

अंगाखांद्यावरचें-डागदागिने (हा संप्रदाय स्त्रियांचे तोंडीं विशेषतः आहे.)

उफराट्या (किंवा) उलट्या काळजाचा-वाटेल तें साहसकर्म करण्यास तयार होणारा. A heartless and daring person.

उष्ट्या हातानें कावळा न मरणें-कावळ्याला मारण्यासाठीं उष्टा हात उचलला तर त्याला लागलेलीं शितें उडतील व तेवढेंच नुकसान होईल इतकी बारीक दृष्टि असणें; कद्रुपणा करणें; कोणाला जेवायला न घालणें असा अर्थ. To carry miserliness to an extreme.

एका पायावर तयार (सिद्ध) असणें-अगदीं तयार असणें. एक पाय पुढें टाकण्यासाठीं उचलला इतकी तयारी असा अर्थ. To be eager or anxious.

बाजीराव शिपाई आहेत तसा मीही आहें. त्यांच्याप्रमाणेंच हा प्रतिनिधि योग्य प्रसंगीं पाहिजे त्या मोहिमेवर जाण्यास,एका पायावर सिद्ध आहे. —बाजीराव.

दुसऱ्याच्या ओंजळीनें पाणी पिणें- ह्म० तो पाजील तेवढें पिऊन स्वस्थ राहणें; अर्थात् दुसरा सांगेल तसें मुकाट्यानें वागणें हा अर्थ. To be led by the nose by.

आमचे नवे साहेब हेडक्लार्कच्या ओंजळीनें पाणी पिणारे नाहींत. ते प्रत्येक प्रकरण स्वतः पाहतात, स्वतः चौकशी करतात, आणि स्वतःच्या हातानें त्याचा निकाल करतात, यामुळें रयतेला सुख वाटत आहे.

कंठ फुटणें- १ (-चा कंठ० )आवाजाला चीर जाणें; २ (-ला कंठ०=) आवाज काढतां येऊं लागणें.

कंठस्नान घालणें- शिरच्छेद करणें. (कंठछेदनामुळें निघालेल्या रक्तानें ती जागा भिजून जाते.) To behead.

धोंडी वाघासारख्या काळपुरुषास ज्यानें कंठस्नान घातलें, त्या बापू गोखल्याच्या पराक्रमाचें वर्णन काय करावें ?

**कपाळ उठणें**– कपाळ दुखूं लागणें. To get a head-ache.

**कपाळाचें कातडें नेणें**– सगळ्या जन्माचें मातेरें करणें. To blast one's fortunes.

**कपाळ ठरणें**– नशिबांत लिहिल्यासारखी एखादी गोष्ट घडून येणें. 'जावें तिकडे दुःख भोगावें हें माझें कपाळ ठरलेलेंच आहे' ह्मणजे मी निरंतर दुःख भोगावें असेंच माझ्या नशिबीं लिहिलेलें आहे.

पुढें मागें......याही गोष्टींत सुधारकांचा वरचष्मा होऊन या हताश, विचारशून्य, मत्सरी,......लोकांस......मुळुमुळू रडत बसावें लागेल हें यांचें कपाळ ठरलेलेंच !

–आगरकर.

**कपाळ फुटणें**– दुर्दैव ओढवणें. To have a misfortune.

**कपाळमोक्ष होणें**– प्रेतदहनाचे वेळीं प्रेताच्या डोक्याची कवटी अग्नीनें तडकून फुटली ह्मणजे तिचा मोक्ष झाला असें ह्मणतात. त्यावरून क॰मोक्ष होणें ह्मणजे कपाळ फुटणें–मरणें, हा अर्थ. To die.

खरी वेळ आली ह्मणजे या भीमाच्याच लत्ताप्रहारानें त्या धर्मभ्रष्टाचा कपाळ-मोक्ष होणार हें मला पक्कें दिसत आहे. –कीचकवध.

**कपाळीं [कपाळाला] येणें**– नशिबीं येणें. To fall to one's lot.

दे उग्रविवरसत्न अंकीं घेऊन लोकपाळाला ।
हा ! त्या वदनीं खाया आला रस काय तो कपाळाला ? ॥ –मोरोपंत.

**कंबर बांधणें**– तयार होणें. ( कोणतेंही शारीरिक काम करण्याला अवसान यावें म्हणून कंबर बांधीत असतात. ) To gird up one's loins.

**करकर दांत चावणें**– क्रोधाचा आविर्भाव करणें. To gnash one's teeth.

आयकतां अशि वाणी हृदया लागे खळाचिया असिवाणी ।
चावी दांत करकर, क्रोधें चोळी रिपु प्रणाशकर कर ॥ –मोरोपंत.

**कांखा वर करणें**– जेव्हां बगलेंत कांहीं नसतें तेव्हां कांखा वर करतां येतात. यावरून जवळ कांहीं नसणें, दिवाळें काढणें हा अर्थ. To plead bankruptcy.

**कान उघडणें किंवा कानउघाडणी करणें**– उलट वागलास तर घात होईल असें सांगून एखादी गोष्ट पुरतेपणीं मनांत भरविणें. To open one's eyes; to expostulate.

**कान किटविणें–किटणें**– तीच ती गोष्ट पुनः पुनः सांगून कंटाळा आणणें. To weary one with ( some frequently told tale).

**कानगोष्टी सांगणें**– हळूंच कानांत गोष्ट सांगणें; गुप्तपणें एखादी मसलत देणें. To whisper a matter in the ear.

पण लाख्न खेळण्याचे वेळीं ह्मातान्या भीष्माचार्यांनीं कौरवांना किंवा पांडवांना कोणालाच दोन कानगोष्टी सांगितल्या नाहींत! –कां० मो०

**कानच्या कोंपऱ्यास**–कोणालाही.

‘ ही गोष्ट कानच्या कोपऱ्यास कळूं देऊं नकोस; नाहींतर पहा, तुझी गर्दनच उडवीन ’ असें राजपुत्रानें बजावून सांगितलें. –आ० भा० सु० गोष्टी.

**कानटाळ्या बसणें**–कर्कश आवाजामुळें कर्णेंद्रिय बधिर होणें. To stun the ear.

**कान देणें**– ऐकणें; विनंति मान्य करणें. To lend the ear.

यास्तव ज्या कोणां या निजभाषेचा असेल अभिमान ।
देतील सादरें मम विनतिकडे ग्रंथकारं ते कान ॥ –मोगरे.

**कान फुंकणें, भरणें, किंवा भारणें**– आपल्या इष्ट गोष्टीकडे दुसऱ्याची प्रवृत्ति व्हावी ह्मणून त्याला गुप्तपणें कांहीं सांगून त्याचें मन वळविणें. To prompt one secretly; to poison one's ears.

**कान फुटणें**– ऐकूं न येणें; बहिरे होणें. To be deaf.

**कान लांबणें**– अक्कल कमी होणें ( गाढवाचे कान लांब असतात यावरून गाढव होणें ). To grow foolish.

**कानशिलांत देणें**
**कानशिल रंगविणें**
**श्रीमुखांत देणें**
**तोंड रंगविणें**
— कानफडांत ( कानापुढील गालाचा भाग ) मारणें. To slap on the ear.

**कानाचा चावा घेणें**– कानांत सांगणें. To whisper in the ear.

**कानाचा हलका**— कोणी खरी खोटी कशीही गोष्ट सांगितली असतां ज्यास ती तत्काल खरीशी वाटते असा. Easy of belief; credulous.

**कानाडोळा करणें**— पाहिली न पाहिलीशी करणें, दुर्लक्ष करणें. To connive at.

**कानांत तुळशीपत्र घालणें—तुळशी घालून बसणें**:—

१ प्रपंच संबंधीं लबाडीचे छंद सोडून साधुत्व धरलें आहे, असें बाह्यात्कारीं दाखविणें. To play the hypocrite.

२ ऐकूं येत नाहीं असा बहाणा करणें. To feign deafness.

**कानांत बोटें घालणें**— एखादी भयंकर किंवा दुःखाची, ऐकवणार नाहीं अशी, गोष्ट कानीं पडूं नये ह्मणून माणूस कर्णरंध्रें बंद करण्यासाठीं कानांत बोटें घालतो. यावरून ऐकवत नाहीं असें सूचित करणें.

तो हा वधिला; केलें कर्म अमितसाधुवानसें मोटें ।
खोटें हें; ह्मणतिल 'शिव! शिव!' कर्णीं घालितील बुध बोटें ॥

—मोरोपंत.

**कानांत मंत्र सांगणें**— गुप्त रीतीनें सल्लामसलत देणें.

**कानामागें टाकणें**— दुर्लक्ष करणें.

शत्रूचा समाचार अगोदर घेतला पाहिजे. घरचीं भांडणें तूर्त कानामागें टाकलीं पाहिजेत. —बाजीराव.

**कानाला खडा लावून घेणें**— कानाची पाळी फार नाजूक असते. त्या ठिकाणीं खडा लावून दाबणें हा पूर्वींच्या काळीं शिक्षेचा प्रकार होता. यावरून स्वतःस पुनः तशी चूक होऊं नये म्हणून शिक्षा लावून घेणें असा अर्थ. To resolve stoutly against repeating foolish act.

बरं आहे. एकदां माणसाला ठेंच लागते. पुनः कानाला खडा लावून घेईन!

—पण लक्ष्यांत.

**कानावर हात ठेवणें**— आपणांस माहीत नाहीं किंवा आपल्याच्यानें ऐकवत नाहीं असा भाव अंगचेष्टितांनीं व्यक्त करणें.

कर श्रवणिं टेविते नुघडि नेत्र, घे भीतिला।
न चालिन भिडेस मी जरिहि कार्यलोभी तिला॥

–मोरोपंत.

कानाशीं लागणें– कानांत सांगणें; चहाड्या सांगणें. To whisper in the ear of.

कानींकपाळीं ओरडणें– वारंवार बजावून सांगणें. To be ever lectrring.

केंसांच्या अंबाड्या होणें– वृद्धावस्थेंत काळ्या केंसांला अंबाडीसारखा कांहींसा पांढरा व कांहींसा पिंगट वर्ण येतो, त्यावरून वृद्धावस्था येणें हा अर्थ.

आमच्या केंसांच्या अंबाड्या होन चालल्या, आतां आम्हांला इंग्रजी शिकून काय करावयाचें आहे ?

केंसानें गळा कापणें– केंस हें खरोखर कापण्याचें शस्त्र नव्हे. तथापि एकाद्यानें अशा अकल्पित साधनानें घात केला आणि तो घात करणारा विशेषतः स्नेह दाखविणारांपैकीं असला ह्मणजे हा सं० योजितात. To ruin a person by making a show of kindness.

कोणत्या तोंडानें ?–तोंड नाहीं, धैर्य नाहीं असा अर्थ. With what face !

तो या गांवचा देणेंदार आहे, तेव्हां तो कोणत्या तोंडानें येथें येईल ?

कोणाचा पायपोस ( जोडा ) कोणाचे पायांत नसणें– पायपोस= जोडा; पुष्कळ मंडळी जमलेली असली आणि व्यवस्था नसली ह्मणजे ज्याचा जोडा त्याला सांपडणें मुष्किल होतें. यावरून मोठा गोंधळ होणें असा अर्थ. To be all medley and confusion.

कोंपरापासून हात जोडणें किंवा नमस्कार करणें– संबंध न यावा अशी इच्छा करणें.

'असल्या नाटक्यांना कोंपरापासून नमस्कार असो !' –विकार०

खांदा देऊन काम करणें–झटून काम करणें. To put one's shoulder to the wheel.

खायचे दांत वेगळे, दाखवायचे वेगळे–हत्तीला दोन प्रकारचे दांत असतात. एक मोठाले बाहेर आलेले मुळे व दुसरे आंत खाल्लेला

पदार्थ चावण्याचे. त्यावरून वर दाखविण्याचा रंग एक व मनांत असावयाचें भलतेंच अशा रीतीचें ढोंग हा अर्थ. Hypocrisy.

**गळा कापणें**—एखाद्यास अगोदर भरंवसा देऊन मागाहून फसविणें; घात करणें. To ruin one with deceit.

**गळ्यांत घोंगडें येणें**-कांहीं एक काम करीत असतां संकट किंवा लचांड अंगावर येणें. ( डोक्यावरचें घोंगडें घसरत घसरत गळ्यांत आलें ह्मणजे त्यानें तोंड झांकलें जाऊन जीव गुदमरावयाचा ! यावरून मोठें संकट प्राप्त होणें. बाजू उलटणें इ. ) To have the tables turned against.

ताइ, आलें घोंगडें गळ्यांत ! आतां आपण होऊन आपली फजिती करून घेण्यांत काय शहाणपण आहे ! —त्राटिका.

**गळ्यांतला ताईत**—कंठमणि, अति प्रिय वस्तु. An object of endearment.

कालिदास, भवभूति, बाणभट्ट यांच्यासारखे प्रतिभावान् कवि सरस्वतीदेवीच्या गळ्यांतले ताईत होते. —नि. चं.

**गळ्याशीं पाणी लागणें**—गळ्यापर्यंत येणें. कर्ज वगैरे गोष्टींची पराकाष्ठा होणें. To be over head and ears in debt &c.

**गोरागोमटा कपाळकरंटा**—वर्णानें व दिसण्यांत सुरेख पण खडतर नशीबाचा. Fair but unfortunate.

दुर्गीचा नवरा लग्नांत गोरागोमटा पण पुढें असा कपाळकरंटा निघाला, कीं लाख रुपयांची मालमत्ता उधळून टाकून अन्नान्नदशेस लागला. —पण लक्षांत०

**चरणारविंदीं लिलिंदायमान होणें**—ज्याप्रमाणें भ्रमर कमलाचे ठायीं एकनिष्ठतेनें रमनाण असतो, त्याप्रमाणें सेवेंत एकनिष्ठपणें निमग्न असणें.

**चिमणीच्या दांतांनीं फोडणें**—सुपारी वगैरे जो फोडण्याचा जिन्नस तो उष्टा होऊं नये म्हणून फडक्यांत घालून दांतांनीं फोडणें. ( पदार्थ उष्टा केला नाहीं अशी मुलांची समजूत करण्याकरितां आपल्या नाहीं तर चिमणीच्या दातांनीं फोडला असें सांगतात. )

**चिमणीसारखें तोंड करणें**— एवढेंसें तोंड करणें. To look sad.

पण पहा तो कसें चिमणीसारखें तोंड करून बसला आहे ! —गुप्तमंजूष.

छाती करणें– धैर्य दाखविणें; हिय्या करणें. To show the spirit of adventure.

छातीला हात लावून सांगणें– खात्रीपूर्वक--धैर्यानें सांगणें To positively assert.

जिभेचा पट्टा– वाचाळता, अद्वातद्वा बोलणें. The stream of nonsense.

जीभ चावणें– एखादी गोष्ट बोलावयाची नसतां बोलून गेलों असें दाखविणें.

जीभ पाघळणें– जें बोलायचें नाहीं तें बोलण्याचे भरांत बोलून जाणें. To let a secret slip out.

जीभ लांब करून बोलणें– वडील माणसांशीं किंवा वरिष्ठांशीं आपल्या मर्यादेच्या बाहेर बोलणें. To speak saucily to a superior.

जिभेस हाड नसणें– वाटेल तसें अमर्याद बोलणें. To have one's tongue utterly without restraint.

टाके ढिले करणें–होणें– ( टाके=सांधे ) फार काम केल्यानें किंवा मार खाण्यानें सांधे खिळखिळे होतात. त्यावरून फार काम करणें, किंवा मार देणें–घेणें असे अर्थ. To overwork; to beat soundly.

टाळूवर मिऱ्यें वाटणें–मिऱ्यें हा उष्ण पदार्थ आहे. मिऱ्यें वाटणें ह्मणजे झणझणायला लावणें; अंमल गाजविणें. To exercise absolute sway over.

डोईचे वाटेनें–वांकडीतिकडी गोष्ट न सांगतां नम्रतेनें. ( डोकें वांकविणें हें नम्रतेचें चिन्ह आहे. ) Humbly; without demur.

तो डोईचे वाटेनें तुमचें कर्ज फेडील.

डोईवर (डोक्यावर) हात ठेवणें– आशीर्वाद देणें; आपल्यासारखें वर्तन करण्यास दुसऱ्यास शिकविणें. To let one's mantle fall on.

डोईवर ( डोक्यावर किंवा डोक्यावरून ) हात फिरविणें– फसविणें. To gull or beguile.

एखादं बावळं रत्न गळ्यांत पडलं असतं ह्मणजे मग त्या भावंडांनीं......चांगला डोक्यावरून हात फिरवून आपल्याला मुलंबाळं संभाळायला लावलं नसतं तर काय ह्मणाल तें ऐकेन. —जग हें॰

डोईवर शेकणें—नुकसान पोंचणें. To inflict a loss.

डोकीवरचें खांद्यावर येणें—कर्जाचा अंश फेडल्यामुळें त्याचा बोजा थोडासा हलका होणें. ( जड ओझें न्यावयाचें असलें ह्मणजे मनुष्य तें डोक्यावर घेतो; आणि मग तें थोडेंसें हलकें झालें म्हणजे खांद्यावरून वाहून नेतो. यावरून ही ह्मण निघाली असावी. )

डोकें खाजविणें—एखाद्या गोष्टीचें स्मरण करतांना किंवा विचार करतांना मनुष्य साहजिकपणें डोकें खाजवितो; यावरून आठवण करण्याचा यत्न करणें हा अर्थ. To try to recollect.

साहेब पगाराच्या लखोट्यांत पाहूं लागले तों पन्नास रुपयांची नोट कमी! आपण कोणास दिली किंवा कोठें ठेविली असें वाटून त्यांनीं बरेंच डोकें खाजविलें, पण कांहीं आठवण होईना. —जग हें असें आहे.

डोकें मारणें—शिरच्छेद करणें, नाश करणें. To behead; to ruin.

डोक्यावर खापर फोडणें—निर्दोषी माणसावर दोष टाकणें. To cast all blame on a blameless person.

डोक्यावर बसविणें—स्वतःच्यावर प्रस्थ माजवून ठेवणें. To exalt unduly over one's self; to idolize.

डोक्यावरून पाणी फिरणें—जाणें—एखाद्या गोष्टीचा कळस होणें, परमावधि होणें, अगदीं शिकस्त होणें.

साऱ्या दिवसभर उपद्व्याप करून वर्षाचे कांहीं शेंदोनशें रुपये मिळाले ह्मणजे डोक्यावरून पाणी फिरलें!

(वस्तुवर) डोळा असणें— कांहींएक वस्तु मिळावी अशी इच्छा असणें. To have an eye to.

पण मध्यें कांहीं घोटाळा होण्याचीं चिन्हें दिसूं लागलीं. मुंबईच्या जागेवर दोघांनिघांचा डोळा होता. त्यांच्या खटपटी चाललेल्याच होत्या. —रण लक्ष्यांत॰

डोळा घालणें—खूण करणें; खुणेनें सुचविणें. To wink.

डोळे उघडणें—सावध होणें. To have one's eyes opened.

आतां तरी याचे डोळे उघडले असले ह्मणजे पुष्कळच चांगलें झालें ह्मणायचें.

—उषःकाल.

डोळे करणें—डोळे वटारणें. To stare at angrily.

' मी नुसतें त्याचें नांव घेतलें मात्र ! तों बाईसाहेबांनीं केवढे डोळे केले तें तूं पाहिलें-सना ?

—फाल्गुनराव.

डोळे थंड होणें किंवा निवणें—समाधान होणें. To obtain the desire of one's eyes; to feel gratified.

डोळे पांढरे करणें—मरायला टेंकणें.

हे शेवटले शब्द पंड्याजींनीं दांतओंठ खाऊन उच्चारले आणि मानमूट धरलेली बेचक अशा तऱ्हेनें दाबली कीं भास्करभाऊचे डोळे पांढरे होण्याची अवस्था झाली.

—जग हें०

डोळे फिरणें—गर्वानें ताठणें. To be dizzy or supercilious.

डोळे फुटणें—डोळ्याच्या खांचा होणें; आंधळे होणें.

डोळे भरून पहाणें—मनाचें समाधान होई तोंपर्यंत पाहणें. To feast one's eyes upon.

पाहीन डोळे भरून हरी । दुजी उरी टेवींना ॥

—एकनाथ.

डोळे येणें—डोळ्यांत लाली येऊन खुपऱ्या वगैरे होतात असा रोग. To have sore eyes.

डोळ्यांच्या खांचा होणें—आंधळे होणें. To become stone-blind.

डोळ्याचें पारणें फिटणें—' पारणें ' फेडणें म्हणजे अन्नादिकांच्या योगानें मनाचें समाधान करणें. हा अर्थ डोळ्यांकडे लाविला ह्मणजे डोळ्यांचें समाधान होणें असा अर्थ होतो. To have the desire of one's eyes gratified.

डोळ्यांत खुपणें-सलणें— परोत्कर्ष सहन न होणें. To pain one's eyes.

डोळ्यांत गंगाजमना येणें—रडूं येणें, डोळ्यांत अश्रु येणें. To have one's eyes filled with tears.

डोळ्यांत तेल घालून पाहणें—रात्रीं झोंप येऊं नये म्हणून कित्येक वि-
ार्थी कापूर घालून तयार केलेलें तेल डोळ्यांत घालतात. त्याच्या योगानें
ळ्यावर झोंप येत नाहीं, जागृति राहते. त्यावरून जागृतीनें किंवा दक्षतेनें
हणें असा अर्थ. To inspect minutely; to be watchful.

डोळ्यांत प्राण उरणें—अगदीं मृत्युपंथाला लागणें. To be in the
ast lingerings of life.

डोळ्यांत माती ( धूळ ) फेंकणें—फसविणें. To cheat.

डोळ्यांत मावणें—एखाद्यानें डोळे वटारले असतां ' खुशाल डोळे वटार.
ी तुझ्या रागाला भीत नाहीं ' अशा अर्थानें या संप्र० चा उपयोग करतात.

डोळ्यांतलें काजळ चोरणारा—अट्टल चोर. An arrant
hief.

डोळ्यापुढें काजवे दिसणें—एखाद्याच्या कानशिलांत जोरानें मारलें
सतां त्याच्या डोळ्यांपुढें किंचित् कालपर्यंत तेज स्फुरण पावलेलें दिसतें,
यास काजवे दिसणें असें ह्मणतात. To feel giddy.

डोळ्यावर कातडें ओढणें—एखाद्या कृत्याविषयीं दोषादोषादि विचार
पहाणें, उपेक्षा करणें. डोळ्यांवर कातडें ओढलें अर्थात् डोळे मिटले कीं
ांगलें वाईट कांहींच दिसत नाहीं. To shut one's eyes to.

डोळ्यावर धूर येणें—संपत्ति वगैरे गोष्टींनीं उन्माद येणें. To be
blinded by.

डोळ्यांशीं डोळा भिडविणें—समक्षासमक्ष नजरेशीं नजर भिडविणें;
To look at audaciously.

डोळ्याशीं डोळा लागणें—डोळे मिटणें, झोंप लागणें.

ढुंगणाला हात पोंचणें—वडील माणसांचा दाब नाहींसा होऊन स्वच्छं-
दानें वागण्याची मोकळीक प्राप्त होणें. To be independant and
unruly.

तळची ( तळव्याची किंवा तळपायाची ) आग मस्तकास जाणें—अति-
शय संतापणें. To be filled all over with passion.

कारटा असा द्वाड निघाला ह्मणून शिवाजी महाराजांच्या तळव्याची आग मस्त-
काला गेली. —संभाजी.

**तळहाताच्या फोडासारखें वागविणें**— तळहातावर फोड झाला असतां त्याला यत्किंचितही धक्का लागूं नये म्हणून आपण जपतों तसें जपणें. To keep like the apple of one's eye.

उत्तर म्हणे, नको, गे ! पायां पडतों बृहन्नडे ! सोड । जोड दिली, दुखवुं नको, केवळ पितृकरतलस्थ हा फोड ॥ —मोरोपंत.

**तुपाचें नख**— तुपाचा एक थेंब; नखावर मावेल एवढें तूप.

**तोंड आंबट करणें**— निराशेमुळें तोंड वाईट करणें. To look sour.

**तोंड आहे कीं तोबरा आहे ?**— तोंडांत फार मोठा घास घेतला म्हणजे किंवा एकसारखी बडबड चालविली असली म्हणजे या सं०चा उपयोग करतात. Said of one who is cramming huge gobbets into one's mouth; as also a chatterbox.

**तोंड उजळ करणें**—कलंक काढून टाकणें, कीर्ति मिळविणें. ( उजळ= उज्ज्वल ) To remove a stain from; to brighten.

गेलें साल तुर्कस्थानास जरी पराकाष्ठेचें जड गेलें, तरी त्यांनीं साऱ्या एशियाचें तोंड उजळ केलें. — निबंधमाला.

**तोंड उतरणें**—मुखश्री उतरणें; तोंड निस्तेज दिसणें. To look crest-fallen.

**तोंड करणें**—रागानें बोलणें; बडबडणें. To wrangle; to prate.

असें सुमारें तासभर तोंड केल्यावर चिमू वन्सं थकल्या आणि आपोआपच मुकाट्यानें बसल्या.

**तोंडघशीं पडणें**—तोंड जमिनीला घांसेल अशा रीतीनें पडणें. To fall on one's teeth.

देउनि तोंडावरि, हरि पळ काढी, थांब येउनी मागें।
तो तोंडघसींच पडे करतां दंतप्रहार वहुरागें ॥
—मोरोपंत.

**तोंडघशीं पाडणें**—अगोदर मदत देण्याचें कबूल करून एखाद्याला एखादे कामाला प्रवृत्त करून मग आपण मदत न देतां त्याला फशीं पाडणें. To leave one in the lurch.

**तोंड घालणें**—दोघांच्या संभाषणांत तिसऱ्यानें बोलूं लागणें. To join forwardly in a conversation.

तोंडचें पाणी पळणें—भीतीनें तोंडाला कोरड पडते. यावरून भयभीत होणें हा अर्थ. To be terror-stricken.

हें बघ, सकाळपासून माझ्या तोंडचं अगदीं पाणी पळालं आहे. सांग ग काय झालं तें, असं काय करतेस ? —पण लक्षांत०

तोंड टाकणें—सोडणें— अद्वातद्वा बोलूं लागणें; शिव्या देणें. To rail at.

तोंड दाबणें—लांचलुचपत देऊन उलट बोलूं नये असें करून ठेवणें. To stop one's mouth with; to bribe.

तोंड दिसणें—बोलणारा वाईट ठरणें.

सासू बोलली ह्मणजे तिचें तोंड दिसतें, पण सुनेचे हे ढंग कोणाला दिसतात का ?

तोंड धरणें—बोलण्याची मनाई करणें. To prevent one from speaking.

*cf.* बोलणाराचें तोंड धरवत नाहीं.

जो सांगे पांचापाशीं । त्याचें तोंड तूं धरिशी ।
ठकडा कैसा होशी । म्हणे एकाजनार्दनीं ।

— एकनाथ.

तोंड देणें—To face boldly.

जें संकट आलें त्यास तोंड देऊन शूराप्रमाणें लढावें हाच मार्ग उत्तम; आणि कोणाही वीरमातेनें आपल्या पुत्रास असाच उपदेश करावा. —उपःकाल.

तोंड पसरणें—वेंगाडणें—याचना करणें. To beg.

तोंड येणें—औषधामुळें किंवा इतर कारणानें लाळ गळण्यासारखी अवस्था होणें. To be salivated.

तोंड पहात बसणें— कसें करावें या विवंचनेंत पडणें. To sit with folded hands.

तोंड भरून बोलणें— दुसऱ्याचें व आपलें समाधान होण्याजोगें बोलणें To talk freely.

तोंड वाजणें— वाजविणें—बडबडणें. To clack, to clatter.

आमचे कान देखील दुखूं लागले यांचें ऐकतां ऐकतां; पण यांचें तोंड कांहीं रहात नाहीं वाजायचें. —नाटिका.

तोंड वासणें– तोंड पसरणें, याचना करणें.

कां हो माझी सांड केली हृषीकेशी
आह्मी कोणापाशीं तोंड वासों। –नामदेव.

तोंड ( मुख ) वासणें–

किती सर्वकाळ सोसावें हें दुःख
किती लोकां मुख वासूं तरी॥ –तुकाराम.

तोंड वासणें– 'आ' करून मरून पडणें.

जो खळ ह्मणे पृथेची सांगुन दासीस कोंडचा सून।
तो पडला सिंहनिहतमत्तद्विपसाचि तोंड वासून॥ –मोरोपंत.

तोंडसुख घेणें– जी गोष्ट करण्यास आपण असमर्थ, तिच्यासंबंधानें नुसतें यथेच्छ बोलून तिलक्यानेंच समाधान मानणें. To take delight in wagging the tongue.

तोंड सुरू होणें– बोलणें सुरू होणें; बोलूं लागणें.

आजोबांचें तोंड जें काय सुरू झालें तें कांहीं विचारूंच नका. –पण लक्षांत०

तोंड सोडणें– अमर्याद बोलणें. To be clamorous of speech.

तोंडाची टकळी– जिभेचा पट्टा, अद्वातद्वा बोलणें.

तोंडाची वाफ दवडणें– बोलणें निष्फळ होणें. To waste one's breath..

तोंडांत बोट घालणें–फारच आश्चर्य वाटलें म्हणजे आपण तोंडांत बोट घालतों. यावरून आश्चर्यचकित होणें असा अर्थ. To be wonder-struck.

पण माझ्या हातून लोकांनीं तोंडांत बोट घालण्याजोगें काय होणार होतें!
–पण लक्षांत०

तोंडाचें बोळकें होणें– तोंडांतले दांत पडणें.

तोंडांत शेण घालणें–फजीत करणें, नांवें ठेवणें. To put one to shame.

तोंडांत साखर घालणें–साखर हा शब्द उपरोधिक आहे. त्याचा अर्थ 'शेण' असा समजावयाचा. फजीत करणें हा अर्थ. To put one to shame.

सावित्रीबाईच्या तोंडांत लोक जेव्हां फारच साखर घालीत, तेव्हां तिनें दोन तीन जुनेरीं एकत्र शिवून जानकीबाईला द्यावीं. —रंगराव.

तोंडांतून ञ काढणें— अधिकउणें अक्षर काढणें.

'आंतल्याआंत चूर होऊन मेलें पाहिजे; तोंडांतून ञ काढण्याची सोय नाहीं.' —विकारविल०

तोंडावर तुकडा टाकणें—गप्प बसावें म्हणून थोडेंसें कांहीं देणें.

तोंडावर हात फिरविणें— गोड बोलून फसविणें. To bamboozle, to befool.

तोंडाला पानें पुसणें— जें आपल्या बरोबर दुसऱ्यासही मिळावयास पाहिजे तें त्यांना न देतां एकट्यानेंच घेऊन बाकीच्यांना दगा देणें. खाऊच्या पुड्यांतला खाऊ आपण खाऊन वरचीं पानें दुसऱ्यासाठीं ठेवणें. To chouse one out of all one's property.

तोंडाला हाड नसणें— बोलण्याला सोयसुमार नसणें. To know no restraint in speaking.

तोंडावर सांगणें— समक्ष सांगणें. To tell to one's face.

तोंडास तोंड— समक्षासमक्ष. Tete a tete; face to face.

तोंडास तोंड देणें—उत्तरास प्रत्युत्तर देऊन भांडण वाढविणें. To exchange words.

जितकी थट्टा करावयाची असेल तितकी करून घे. तुझ्या तोंडास तोंड देण्याची कांहीं सोय नाहीं. —मूकनायक.

तोंडास पाणी सुटणें—आपल्या देखत कोणी आंबट पदार्थ खाऊं लागला तर आपल्या तोंडास पाणी सुटतें ( लाळ सुटते ). त्यावरून लोभ उत्पन्न होणें हा अर्थ. Watering of the mouth.

पोर्तुगीज लोकांची बढती पाहून तिकडच्या दुसऱ्या साहसी लोकांच्या तोंडास पाणी सुटलें. —बाजी०

तोंडीं खीळ पडणें—तोंड बंद होणें. To have one's mouth gagged.

अवघ्या कोल्यांचें मर्म अंडीं ! धरितां तोंडीं खीळ पडे ॥

तोंडीं लागणें— वादविवादास प्रवृत्त होणें; उलट उत्तर देणें.

सुज्ञ आहेत ते दूषकांच्या तोंडीं लागत नसतात. —निबंधमाला.

थोबाड रंगविणें– तोंडांत मारणें. To slap the face.

तळहातास केंस आले नाहींत– अजून काम करण्याची अंगांत धमक आहे. I am not yet rusty; I am still able to work.

दंडावर गोणी देणें– एखाद्याच्या इच्छेविरुद्ध त्याच्यावर काम सोंपाविणें.

मी धर्मस्थापनेसाठीं युगायुगाचे ठिकाणीं संभवत असतों अशा प्रकारचें विधान केलेंस, त्या वेळेस तें करण्याविषयीं तुझ्या दंडावर कोणीं गोणी दिली होती? —काळ

दाढी धरणें
दाढीला हात लावणें } – खुशामत किंवा प्रार्थना करणें. To supplicate.

दांत धरणें–असणें– द्वेष करणें–असणें.

दांत खाणें– द्वेषाचा आविर्भाव दाखविणें. To grind one's teeth.

तापविती अतिदुःसह पतिसुतशोकार्क आंत बाहेर।
विधिवरि बोटें मोडुनि कोपें खाताता दांत बा! हेर॥ —मोरो॰

दांतखीळ बसणें–सन्निपातादि दोषामुळें वरील दांत व खालचे दांत एकमेकांस चिकटून घट्ट बसतात ते. यावरून न बोलवणें हा अर्थ. To have a locked jaw.

खटपट करतां खटपट करतां गेला सारा वेळ।
रामनाम घेतां तुझी बैसे दांतखीळ॥ —एकनाथ.

दांत पाडणें– वादांत वगैरे पराजय करणें; चांगला टोमणा मारणें. To get the better of; to outwit.

इतका खोटें बोलणारा तूं असशील असें मला वाटलें नव्हतें; नाहीं तर दोन चार साक्षीदार टेवून तुझे चांगले दांत पाडले असते. —त्राटिका.

दांत वासणें– हातीं घेतलेलें कार्य शेवटास नेववत नाहीं म्हणून निराश होऊन बसणें. To be despondent.

दांत वासून पडणें– दुखण्यानें अंथरुणाला खिळून रहाणें. To be laid on one's back from sickness.

दांत विचकणें–उपहास करणें; हंसणें. To jeer at.

जे ऐसा प्रभु त्या जना न विचकूं दे दांत, बाहे, रहा।
वैंकुंठींच ह्मणे प्रसन्नचि सदा ही आंत बाहेर हा॥

—मोरोपंत.

दांत विचकणें– १ याचना करणें. To beg. २ तोंड पसरून हंसणें. To laugh at.

दांताच्या कण्या करणें–तांदूळ वगैरे धान्यांचे जे बारीक बारीक कण त्यांना कण्या ह्मणतात. दांताच्या कण्या केल्या ह्मणजे मागून मागून किंवा विनंति करकरून दांत झिजविले असा अर्थ. To beg importunately.

दांताच्या कण्या होणें–( दांताच्या कण्या करणें हा सं० पहा. )

'होतां कुठें यमूबाई ? हांका मारतां मारतां माझ्या दांतांच्या कण्या झाल्या.'
– पण लक्षांत०

दांताच्या धुगऱ्या होणें–फार बोलावें लागणें. To labour hard ( in teaching, begging &c ).

दांतावर मारायला–मुळींच; उदा०–त्याच्याजवळ दां० पैसा नव्हता ह्मणजे एकसुद्धां पैसा नव्हता. पैशासंबंधानेंच ह्मणतांना या सं० चा उपयोग होतो.

दांतावर मांस नसणें– द्रव्यानुकूलता नसणें. To be poor.

' उगीच भरीस भरल्याप्रमाणें लग्नांत खर्च केला. आपल्या तर दांतांवर मांस नाहीं. कुटुंब एवढें थोरलें......असें शंकर मामंजींचें रडगाणें चालू होतें.
–पण लक्षांत०

दांतास दांत लावून रहाणें– तोंड मिटून ( कांहीं न खातां उपाशीं ) रहाणें. To fast.

दांतीं तृण धरणें– अभिमान सोडून शरण जाणें. To be humble before; to profess submission.

दुसऱ्याच्या तोंडाकडे बघणें– हा दुसरा माणूस आपणास मदत करील काय अशा आशेनें त्याच्याकडे पहाणें; दुसऱ्याच्या आश्रयाची अपेक्षा करणें.

नक्राश्रु ढाळणें– गाळणें–नक्र ( सुसर ) कोणी तावडींत सांपडलें ह्मणजे त्याला खाऊन टाकतो; पण खातांना त्याच्याबद्दल दुःखानें अश्रु गाळतो अशी लोकांची समजूत आहे. अर्थात् खोटे अश्रु गाळणें. अंतर्यामीं आनंद होत असतां बाह्यतः दुःख होतेंसें दाखविणें. To shed crocodile tears.

नख लावणें– लहान अर्भकाच्या कोमल मानेला नखांनीं दाबून जीव घेणें. Infanticide.

अरि हि न करील असें त्वां केलें, कां नख न लाविलें जननी?

—मोरोपंत.

नरडीचा घोट घेणें– ठार मारणें. नरडीचा घोट = नरडीचे रक्ताचा घोट.

तुझ्या नरडीचा घोट घ्यावयास कोणी उरलें नाहीं असें कां तूं समजतोस?

—उषःकाल.

नाक कापणें– चेहऱ्यांत नाक हा मुख्य महत्वाचा अवयव मानला आहे. तो कापला कीं सगळें सौंदर्य फुकट गेलें. यावरून गर्व उतरणें हा अर्थ. To take the conceit out of.

आपलें नाक कापून दुसऱ्यास अपशकुन (अवलक्षण) करणें– दुसऱ्याचें वाईट व्हावें ह्मणून अगोदर स्वतःचें मोठें नुकसान करून घेणें. To ruin one's self in order to injure another.

नाक घांसणें– स्वकार्यसाधनार्थ दुसऱ्याचे पाय धरणें. To crouch or cringe before.

नाकदुरई काढणें– अत्यंत नम्रतेनें व दीन होऊन प्रार्थना करणें; कृतापराधाबद्दल प्रायश्चित्त भोगणें असाही अर्थ होतो. To supplicate earnestly and humbly.

नाक धरून बसणें–प्राणायाम करतांना नाक धरावें लागतें. यावरून सामान्यतः धर्मसंबंधीं कृत्यांत गुंतलेला असणें हा अर्थ. पुढें आपलीं बाकीचीं कामें सोडून नुसत्या देवपूजेच्या व ध्यानधारणेच्या मागें मनुष्य लागला, ह्मणजे विशेषतः या ह्मणीचा उपयोग होऊं लागतो. To be always engaged in meditation; hence to sit in vacant stillness neglecting one's duties.

नाक मुरडणें– नापसंत करणें, एखादी गोष्ट नापसंत आहे हें शब्दांनीं व्यक्त करायचें नसलें ह्मणजे नाक मुरडून व्यक्त करतां येतें. यावरून हा अर्थ झाला. To turn up the nose at.

नाकांत काड्या घालणें– चीड येईल असें कृत्य करणें.

कुरुसिंहाच्या नाकीं घाली पांचाळगर्जना काडी ।
धांवोनि शंखदेशीं अत्यावेशें वृकोदरा ताडी ॥

—मोरोपंत.

**नाक ( नाकें ) ठेंचणें**—खोड मोडणें, खालीं पहावयास लावणें, नाकावर टिचणें, नक्षा उतरणें. To mortify.

( स्त्रियांच्या उन्नतीस विरोध करणारांचीं ) आनंदीबाईनें आपल्या धारिष्टानें, विद्येनें, सौजन्यानें व शुद्धाचारानें......कशीं नामी नाकें ठेंचलीं ! —वि० ज्ञा० वि०

**नाकाचा बाल**—बाल = केंस. नाकांतले केंस काढूं लागलों असतां आपणांस त्रास होतो म्हणून आपण त्यांस फार जपतों. यावरून ज्याला फार जपतों असें एखादें अत्यंत प्रीतींतलें माणूस हा अर्थ. An apple of one's eye.

हंबीरराव कितीहो हलकट माणूस ! पण आमच्या भोळ्या यजमानसाहेबांनीं त्याला अगदीं नाकाचा बाल करून ठेविलें आहे !

**नाकाडोळ्याचा वैद्य (वैदू)**—जडीबुटी विकीत दारोदार हिंडणारे वैदू. यांना वैद्यशास्त्राचा गंधसुद्धां नसतो. वनस्पतींची ओळख मात्र थोडीशी असते. यावरून वैद्यशास्त्राची माहिती नसतां उगीच वैद्य बनलेला मनुष्य. A quack.

**नाकांतले केंस जळणें**—घाणीचा एकदम भपका आला असतां नाकांतले केंस जळाले असें आपण ह्मणतों; कारण केंस जळण्याची घाण फार वाईट असते. यावरून फार दुर्गंधि येणें हा अर्थ. To stink in the nose.

**नाकानें कांदे किंवा वांगीं सोलणें**—स्वतः वाईट कर्मे करावयाचीं, पण तीं करीत नाहीं असें बाह्यतः दाखवून तशीं कर्मे करणाराविषयीं तिरस्कार दाखविणें व स्वतःची प्रतिष्ठा मिरविणें. To vaunt perfect purity from a vice to which one is thoroughly addicted.

**नाकावर माशी बसूं न देणें**—चिडीस जाणें. ( नाकावर माशी बसली असतां ती हांकींपर्यंत माणसाला चैन पडत नाहीं ही प्रत्येकाच्या अनुभवाची गोष्ट आहे. ) To be very touchy and irritable.

**नाकाशीं सूत धरणें**—मनुष्य जिवंत आहे कीं नाहीं, श्वास चालला

आहे कीं नाहीं, हें सूक्ष्म दृष्टीनें पाहण्यासाठीं नाकापाशीं सूत धरतात. जर श्वासोच्छ्वास चालला असला तर तें सूत हालतें, आणि त्यावरून मनुष्य जिवंत आहे असें कळतें. यावरून या सं०चा अर्थ मनुष्य बहुतेक मृत्युपंथाला लागलेला असणें असा झाला. To be on the point of death.

नाकासमोर— अगदीं समोर व सरळ. Straight in the direction of one's nose.

नाकास चुना लावणें— आपल्या कार्याला आड येणाऱ्या माणसाचें कांहीं चालूं न देतां आपलें कार्य साधणें. To do a thing in open defiance of.

नाकापेक्षां मोतीं जड होणें— मोतीं हें नाकाला शोभा आणण्यासाठीं आहे; ह्मणजे नाक ही मुख्य वस्तु व मोतीं ही गौण वस्तु आहे. मोतीं जड झालें तर नाक तुटण्याचा संभव असतो. यावरून एखाद्या गौण वस्तूला मुख्य वस्तूपेक्षां अधिक महत्त्व प्राप्त होणें, एखादा नोकर मालकाला डोईजड होणें, हा अर्थ. To receive undue prominence or importance.

नाकावर असणें—अगदीं तयार असणें.

राग कसा त्याच्या अगदीं नाकावर आहे. ( ह्म० तो लेव्हांच रागावतो— चिडतो. )

नाकीं नऊ ( नळ ) येणें—फार त्रास होणें; मोठी दगदग करावी लागणें. ( नऊ=आपल्या शरीराचीं नऊ द्वारें. यांच्या सगळ्यांच्या शक्ति एका केंद्रांत ह्म० नाकांत उतरणें इ. ) To be wearied out.

आपल्याइकडे कारागीर लोकांची तब्येत संभाळणें ह्मणजे नाकीं नऊ येतात.
— वि० ज्ञा० वि०

नाड्या ओढूं लागणें—मनुष्य आसन्नमरण झाला ह्मणजे त्याच्या नाड्या आकुंचित होऊं लागतात. यावरून नाशाचा काळ येऊन ठेपणें हा अर्थ. Approaching one's end.

पंख फुटणें—पक्ष्याच्या पिलांना पंख फुटले ह्मणजे तीं मग आपल्या आईबापांजवळ राहत नाहींत, उडून जातात. यावरून उडून जाणें; लबाडीनें पळून जाणें हा अर्थ. To decamp.

**पठाडी गोम**–मोठीच गोम ( दोष ). ज्या घोड्याच्या पाठीवर केंसाची गोमीसारखी ओळ असते तो घोडा वाईट, यावरून मोठा दोष हा अर्थ.

**पराचा कावळा करणें**–अतिशयोक्ति करणें; एखादें पर असलें तर कावळा होता असें फुगवून सांगणें *cf.* राईचा डोंगर करणें; रजाचा गज करणें; To exaggerate.

**पाठची बहीण** } – आपल्या पाठीवर ( मागाहून लागलेंच ) झालेलें जें
**,, चा भाऊ** } भावंड तें. A younger brother or sister

**पाठ थोपटणें–थापटणें**–शाबासकी देणें; उत्तेजनार्थ पाठीवर हळू हात मारणें. To encourage; to applaud.

राजा संतोषांनि पोटीं । आप्तभावें थापटी पाठी ।
ह्मणे मित्रा माझी गोटी । न मोडावी सर्वथा ॥

**पाठ थोपटून घेणें**–दुसऱ्याकडून वाहवा मिळविणें. To get one's self applauded.

लोकाग्रणींनीं लोकांची मर्जी संपादण्यासाठीं अथवा त्यांजकडून आपली पाठ थोपटून घेण्यासाठीं त्यांच्या दोषांचें ...... मंडन करणें अत्यंत लज्जास्पद आहे.

–आगरकर.

**पाठ ( पृष्ट ) दाखविणें**–समोरून पळून जाणें. To take to one'e heels.

तुजसीं युद्ध घडो हें स्वप्नींहि न चिंतिलें परांनीं कीं ।
तो तूं भीमा मजला पृष्ठ कसें दाविसी परानीकीं ॥

–मोरोपंत.

**पाठ देणें**–शत्रूस भिऊन पळ काढणें.

तो बहु निंद्य क्षत्रिय देउनि जो पाठ जडतम रणातें ।
पावे सदा गदार्दित होउनि रडवीत रडत मरणातें ॥

–मोरोपंत.

**पाठ देणें**–मुकाट्यानें सहन करणें. उदा०–आल्या प्रसंगाला पाठ दिली पाहिजे. *cf.* वार [illegible]ईल तशी पाठ दिली पाहिजे.

झंझावात मला रे धके मारी कितीक ताड्यानें ।
देवोनि पाठ त्याला सर्वहि मी सोशितों मुकाट्यानें ॥

–कृ. ना. आठल्ये.

**पाठ देणें**–पाठ फिरविणें, न ऐकणें. To turn away from.

नाहीं संतकीर्ति श्रवणीं आली । नाहीं साधुसेवा घडियेली ॥
पितृवचनासी पाठ दिधली । तीर्थें व्रतें असोनि त्यागिलीं ॥
–एकनाथ.

**पाठीचें धिरडें करणें–काढणें**–धिरडें हा एक खाण्याचा पदार्थ आहे. स्पंजासारखीं याला मधून मधून छिद्रें असतात. यावरून पाठीच्या चिंधड्या करणें, फार मारणें हा अर्थ. To make the back discoloured through a beating.

आई, ही माझी पाठ पहा. हें पाठीचें धिरडें तुझ्या जामदारानें करविलें.
–संभाजी.

**पाठ पुरविणें**– एकसारखें मागें लागणें. To be persistently after.

'हं चल वाच, लाजायला काय झालें?' असें म्हणून तिनें माझी अगदीं पाठ पुरविली.
–पण लक्षां०

सखि! माझ्या हृत्सदनीं रात्रिंदिवस होचि आठवण वागे ।
ताप मनाची पुरवी, कक्षाची जेंवि पाठ वणवा गे ॥ –मोरोपंत.

**पाठ मऊ करणें**– मारणें.

माझी पाठ मऊ करणें आपणाला नेहमीं हवें असतें. –गुप्तमंजूष.

**पाठीचें साल जाणें**– १ नुकसान लागणें. २ मार खाणें.

**पाठीं ना पोटीं**– पाठीं (भाऊ) नाहीं व पोटीं (मुलगा) नाहीं.

**पाठीला तेल लावून ठेव**– मार खाण्याची तयारी करून ठेव.

**पाठीवर पाय देऊन येणें**– मागोमाग जन्मास येणें.

**पाठीवर मारा, पोटावर मारूं नका**– शारीरिक शिक्षा करा, पण पोटापाण्यांतलें कमी करूं नका. Whip the back, don't clip the belly.

**पाठीस पोट लागणें**– अतिशय कृश होणें.

**पांढऱ्या पायाची**– अशुभ; कुळाला कलंक लावणारी.

पावसानें डोळे उघडणें– पाऊस पडण्याची आशा नष्ट होणें. To clear off. ( said of the clouds ).

पाय घेणें– प्रवृत्ति होणें. उदा० जाण्याला माझे पाय घेत नाहींत ( जावेंसें वाटत नाहीं ). To feel inclined to.

पाय धरणें– आश्रय करणें. To supplicate humbly.

पाय पसरणें– एखाद्या प्रदेशांत अल्प प्रवेश झाला असतां हळू हळू सगळा प्रदेश व्यापीत जाणें. To establish one's power far and wide.

भटास दिली ओसरी, भट हातपाय पसरी.

पायपोस गेला– ( पायपोस–जोडा )–कांहीं परवा नाहीं. It matters not a straw.

'धोंड्, पायपोस गेला, नाहीं ही तुझी बायको झाली तर!' –पण लक्ष्यांत०

पायबंद घालणें–घोड्यानें लाथ झाडूं नये किंवा पळून जाऊं नये म्हणून त्याचे पाय दोरीनें खुंट्यांशीं बांधतात, त्याला पायबंद घालणें म्हणतात. त्यावरून स्वतंत्रतेला आळा घालणें, अडकवून टाकणें हा अर्थ. To fetter a person.

रामभाऊ अमेरिकेस जाणार होते, पण त्यांच्या वडिलांनीं बायकोचा पायबंद घातल्यामुळें त्यांना जातां आलें नाहीं.

—वर पाय येणें–कोणत्याही गोष्टीस प्रतिबंध होणें. 'माझ्या पोटावर पाय आला' म्हणजे माझ्या चरितार्थाचीं साधनें नाहींशीं झालीं.

...अशी खटपट करण्यापासून स्वतःचे अन्नावरच पाय येत असेल तर ती करावी कीं नाहीं असें कित्येक विचारतात. —आगरकर.

पायरीला पाय लावणें–चिरकाल चालत आलेल्या मर्यादेचें उल्लंघन करणें; बरोबरी करणें. To assert equality with.

पायांखालची वाट–नेहमीं ज्या वाटेनें जाणें येणें आहे अशी वाट. A road well-trodden and well-known.

पायाची आग मस्तकास जाणें– अतिशय क्रोध चढणें. To be filled with fury.

पायावर धोंडा पाडून घेणें– आपल्या हातांनीं स्वतःवर संकट आणणें. To be the author of one's own trouble.

पायास भिंगरी असणें / पायाला भोंवरा असणें – नेहमीं फिरण्याचें काम करणें. To be a run-about.

पोट जाळणें - दुसऱ्याचे द्रव्याचा अपहार करून स्वार्थ साधणें. To serve one's self to the detriment of others.

पोट धरधरून हंसणें–अतिशय हंसणें. To laugh holding one's sides.

पोट पाठीस लागणें– पोट भरण्याची काळजी वहावी लागणें. To have a belly to fill.

पोट बांधून चाकरी करण– पोटाला न खातां चाकरी करणें. To serve with restraint of belly.

पोट बाहेर पडणें– जेवणाचा खर्च परभारा निभणें. To have one's board out.

पोटभर अन्न, अंगभर वस्त्र– माणसाच्या निर्वाहाला अवश्यक अशा वस्तु. Food and raiment; the necessaries of life.

पोट सुटणें– दोंद वाढणें.

पोटाची आग– भूक.

एखादीनें पोटाच्या आगीमुळें अंत केलें तर अतो मेलें ! –फाल्गुनराव.

पोटांत आग पेटणें– अतिशय भूक लागणें.

पोटांत कालवणें– पोटांत गडबड होणें. To feel qualmish.

पोटांत कावळे कोकावणें ( ओरडूं लागणें )– भुकेनें जीव व्याकुळ होणें. To be hungry.

अपराध किंवा चूक पोटांत घालणें– ( त्याची ) क्षमा करणें.

पोटीं घालावा त्वां जोडा माझ्या नसोचि अपराधा ।
त्वत्सम तूंचि प्रभु बा ! त्वद्भिन्न अमृतें म्हणेल न पराधा ॥ –मोरोपंत.

पोटांत ठेवणें– गुप्त ठेवणें. To conceal.

**पोटांत धोंडा उभा राहणें**— भीति उभी रहाणें. (धोंडा=जिवावरलें दडपण.)

तिला पहातांच माझ्या पोटांत एवढा थोरला धोंडा उभा राहिला. दुर्गीच्या नव-
ऱ्याचेंच कांहीं तरी बरें वाईट झालें असावें अशी मनाची खात्री झाली.
—पण लक्षांत•

**पोटांत ब्रह्मराक्षस उठणें**— खा खा सुटणें. (ब्रह्मराक्षसाची भूक प्रसिद्ध आहे.) To have a wolf in one's belly.

**पोटांत शिरणें**— मर्जी संपादन करणें. To creep into one's favour.

**पोटांतून कळवळा येणें**— मायेचा पाझर फुटणें. To yearn.

**पोटावर पाय देणें**— उदरनिर्वाहाचें साधन काढून घेणें; प्राप्तींत कमी करणें. To take away one's livelihood.

**पोटावारी रहाणें**— फुकट जेवण हेंच वेतन समजून चाकरीत रहाणें. To do service receiving food only in return.

**पोटास चिव्वे (चिव्वे) बाळगणें** }
**पोटास चिमटा घेणें.** } — पोटाला न खातां राहणें. To pinch the belly.

**फुंकून पाय टाकणें**— दूरवर विचार करून कोणतेंही कृत्य करणें. (रस्त्यानें जातांना कांटे वगैरे असल्यास ते बाजूला सारून जाणें चांगलें असतें, त्याप्रमाणें पुढच्या अडचणी लक्षांत घेऊन वागणें चांगलें हा अर्थ.)

**फुटका डोळा काजळानें साजरा करणें**— कांहीं युक्तीनें अवगुण झांकणें. To trick out a defect.

**फुटक्या कपाळाची**— खडतर नशिबाची. दुर्दैवी. Unfortunate.

**बालंबाल खात्री**— पक्की खात्री. बाल म्हणजे केंस. शंका घेण्यास केंसभरही जागा नाहीं इतकी खात्री. Firm conviction.

'नारायणरावास मारण्याच्या कामीं राघोबाचें अंग होतें, याबद्दल रामशास्त्री प्रभुणे यांची एकंदर पुराव्यावरून बालंबाल खात्री झाली होती.'

**बेंबीच उखळ करणें-होणें**— मनाला विवंचना नसतां चमचमीत भोजन मिळत गेलें म्हणजे शरीर पुष्ट होऊन बेंबी खोल जाते. तेव्हां या संप्रदाया उपयोग करतात. To grow fat and plump.

हे कोण नायकोंचे साले । तुपावेगळा ग्रास न गिळे ।
तांदुळ रांधावे मोकळे । केलें बेंबीचें उखळ ॥ —अनंतराय.

बेंबीच्या देंठापासून— अगदीं अंतःकरणापासून. From the bottom of one's heart.

बोकांडीस बसणें— ( बोकांड=मानगुटी ) मानगुटीस बसणें. to compel one to do a thing.

बोट शिरकणें— चंचुप्रवेश होणें. To get a slight footing.

बोटावर नाचविणें— हवें तसें खेळविणें; पूर्णपणें ताब्यांत ठेवणें. To have a perfect ascendency over.

बोटें मोडणें— ज्याचेविषयीं राग येतो त्याला शिक्षा करण्याची आपली असमर्थता लक्षांत येऊन मनुष्य जागचे जागीं चरफडतो त्यास बोटें मोडणें ह्मणतात. To chafe at.

तापविती अतिदुःसह पतिसुतशोकार्क आंत बाहेर ।
विधिवरि बोटें मोडुनि कोपें खातात दांत बा ! हेर ॥ —मोरोपंत.

बोबडी वळणें— भयानें जीभ आंखडल्यामुळें तोंडांतून स्पष्टोच्चार न निघणें. To stammer in great fright.

भरल्या पोटीं— जेवण झाल्यावर. With full belly.

मढ्याच्या टाळूवरचें ( ताळव्याचें ) लोणी खाणारा— मढें ( प्रेत ) अमंगळ, त्याच्या ताळव्याला लावलेलें लोणी चाटणारा मनुष्य अतिशय लोभी आणि नीच असला पाहिजे हें उघड आहे. यावरून थोडक्याशा लाभासाठीं अतिशय नीचपणाचें आणि राक्षसी कृत्य करणारा लोभी मनुष्य हा अर्थ. A sordidly covetous person.

मनगटास केंस येणें— हातांतला जोर नाहींसा होणें. To lose strength.

मधाचें बोट लावणें— एखाद्या वस्तूला मधाचें बोट लावून ठेविलें ह्मणजे मध खाण्यास मिळेल या आशेनें पुष्कळ माशा जमा होतात. यावरून एखाद्या गोष्टीविषयीं आशा दाखविणें हा अर्थ. To offer an allurement.

मध्यें तोंड घालणें– चाललेल्या संभाषणांत ज्याचा संबंध नाहीं अशा माणसानें मध्यें बोलूं लागणें. To join forwardly in a conversation.

मांजराचे पाय कुत्र्यावर करणें– कांहीं तरी लटपट किंवा गडबड करणें.

मारामारीची फियाद घरीं आली ह्मणजे मांजराचा पाय कुत्र्यावर करून चिमाजीआपा व बाजीराव हे ऐकमेकांस हिकमतीनें सोडवून बापाचा मार चुकवीत.
—बाजीराव.

मांडी देणें– मरणास टेंकलेल्या माणसाचें डोकें मांडीवर घेणें.

मी चुकलें असेन—अपराध केले असतील—ते आतां विसरा. आणखी मला मांडी द्या, ह्मणजे मी सुखाची मरेन. —पण लक्षांत०

मांडीवर घेणें– दत्तक घेणें. (दत्तविधानाचे वेळीं मुलाला किंवा मुलीला मांडीवर घेण्याची चाल आहे.) To adopt one as a son or daughter.

मांडीवर मांडी टाकून बसणें– निरुद्योगी बसणें, स्वस्थ बसणें. To sit idle or without employment.

मांडीस मांडी टेंकून बसणें– बरोबरीनें बसणें. To claim equality with.

मातीचे कुल्ले– ओढून ताणून बळें लावलेलें नातें किंवा जोडलेला संबंध किंवा उसनें आणलेलें प्रेम अथवा अवसान. An affected love.

मान कापणें– मोठी हानि करणें.

माझी कापुनि मान आजि हरिलें या तावकोरें तुला।
वाई! जा धनकाचिया करनलीं सोडोनियां मत्कुला॥ —लेंभे.

मानेवर सुरी ठेवणें– मारण्याचा धाक घालून एखादें कार्य करावयास लावणें. To intimidate a person into.

मिशांवर ताव देणें– सूड घेण्याच्या विचाराचें निदर्शक ह्मणून मिशांवरून हात फिरविणें.

मिशांस पीळ भरणें– ऐट मिरविणें; धमक दाखविणें.

गंगे! स्मरतो तुज जो जन, शुचिकर्मांचि होय पत्करि तो।
कलिमोह तुझ्या भक्तीं लवतो; उरतीं मिशांसि पिळ भरितो॥ —मोरो०

मिशी खालीं होणें } –मानखंडना होणें. To be disgraced.
,, उतरणें }

मुखरस पाघळणें– वेड्यासारखें कांहीं तरी बोलणें.

मुंगीच्या पावलानें– मुंगीच्या गतीनें; अगदीं हळू हळू. At a very slow pace.

लोकांस असें वाटत असेल, कीं मुंगीच्या पावलानें सुधारणा होत जावी.
–केसरी.

मुठींत असणें–ठेवणें– आपल्या मुठींत असलेली वस्तु सर्वथा आपल्या ताब्यांत असते. यावरून आपल्या कह्यांत असणें हा अर्थ. To be under the thumb of.

श्रोत्यांच्या साऱ्या मनोवृत्ति या वक्त्याच्या जशा काय मुठींत होत्या. –नि० मा०

मुलगी गळ्याशीं लागली– उपवर झाली; विवाह लांबणीवर टाकतां येत नाहीं अशी स्थिति आली.

मुसक्या बांधणें– हात मागें आंवळून बांधणें. To pinion one's arms behind one's back.

मूठ भरणें किंवा दाबणें– लांच देतांना हळूच दुसऱ्याचा हात धरून त्याच्या मुठींत वस्तु देऊन तो झांकतात. यावरून लांच देणें हा अर्थ. To bribe.

राजाचा खजिना स्वाधीन असल्यामुळें आपल्याविरुद्ध जो भांडायला उठेल त्याची मूठ गच्च भरून दिवाणसाहेबांनीं त्यास खालीं बसवून टाकावें. –नि० मा०

मूठमाती देणें– प्रेताला पुरण्याची जी अंत्यक्रिया ती करणें. (प्रेताला पुरतांना मुख्य उपाध्या व मृताचे आप्तसंबंधी मूठ मूठ माती प्रथम खड्ड्यांत टाकतात व मग बाकीची माती इतर लोक लोटतात. यावरून हा संप्रदाय निघाला असावा.) To bury the dead.

युद्धास तोंड लागणें– युद्ध सुरू होणें.

रक्त आटविणें } – उरस्फोड करणें; फार मेहनत करणें. To
रक्ताचें पाणी करणें } weaken one's self by toil, exertion, earnest care &c.

लहान तोंडीं मोठा घांस घेणें– आपणांस न शोभेल असें वरिष्ठांशीं फटकळपणानें बोलणें.

**लाथ मारणें**— झिडकारणें. To kick off.

देव झाला पाठींपोटीं । तया नाहीं आटाआटी ।
संसारासी मारुनी लाथा । केला तत्त्वतां देशोधडीं । —एकनाथ.

सूर्याचा प्रकाश ही एक सृष्टींतील ...... देणगी आहे आणि तिचा अव्हेर करणें ह्मणजे संपत्तीवर लाथ मारणें असाच अर्थ होईल. —ग. ज. आगाशे.

**लाळ घोटणें**— मला ही वस्तु मिळावी असा अभिलाष धरून बसणें. To have one's mouth watering in expectation of some thing nice.

**वर नाक करून वागणें**— ताठ्यानें वागणें, तोरा मिरविणें.

**वांकडें पाऊल पडणें**— दुर्वर्तन घडणें. To go astray.

तरुण विधवांच्या हातून वांकडें पाऊल पडण्याचा संभव असतो, असें ह्मणणारांनीं त्या गोष्टीच्या प्रतिबंधार्थ विचारास युक्त असें काय केलें आहे ?

**वांकड्या नजरेनें पाहणें**— वाईट दृष्टीनें, वाईट हेतु धरून पाहणें. To look at with an evil intention.

**वाघाचा डोळा**— वाघाचा डोळा वाटोळा गरगरीत आणि तेजस्वी असतो. रुपयाही तसाच असतो, त्यावरून रुपयाला ही संज्ञा देतात.

उगाच नाहीं आंत प्रवेश झाला ! वाघाचा एक डोळा दाखविल्याबरोबर मुकाट्यानें आंत जाऊं दिलें !

**शिंगें असणें**— उदा०—दहा वाजण्याला कांहीं शिंगें आहेत काय ? ह्म०-चाकी आहे काय ? दहा वाजलेच हा अर्थ. ( मनुष्य आणि पशुजाति यांच्यांत भेद करणारें ठळक लक्षण शिंगें हें असल्यामुळें शिंगें असणें ह्म० भेद असणें असा अर्थ झाला असावा. )

**शिंगें मोडून वांसरांत शिरणें**— वांसरांना शिंगें आलेलीं नसतात; मोठ्या गाईह्मशींना तीं असतात. यावरून आपण प्रौढ आहों हें विसरून, वळेंच अज्ञपणाचें ढोंग करणें हा अर्थ. To feign ignorance.

**शिरा ताणणें**— जोरानें—मोठ्यानें बोलणें—वाद करणें. To cry out at the top of one's voice.

**शेंडीला गांठ देणें**— वरचष्मा करणें; सरशी करणें; शेरास सवाशेर भेटणें. To prove more than a match.

बाबू महाशय आपल्याशीं म्हणतातः 'अरे, हा दक्षिणचा हुप्या मोठा वस्ताद खरा. पण याच्याही शेंडीला गांठ देईन तर मी नांवाचा मृत्तिकाभूषण चट्टोपाध्याय!'
—जग हें असें०

शेंडीला फुलें बांधणें— दुसऱ्याला त्याच्या दृष्टीनें सुंदर बनवून व खुष करून, आपला मतलब साधणें. (बायका बुचड्यांत फुलें घालतात तशीं शेंडीला फुलें बांधण्यानें आपण चांगले दिसूं अशी एखाद्याची वेडी समजूत असते. ती पुरवून आपलें कार्य साधणें.) To win a person over to one's own purpose.

शेंपूट घालणें— भिऊन माघार घेणें. (कुत्रें भिऊन पळूं लागलें ह्मणजे दोन पायांच्या मध्यें शेंपूट घालून पळतें हें सुप्रसिद्धच आहे.)

चांगले शिकले सवरलेले लोक प्रसंग आला असतां शेंपूट घालून मागें सरतात हें अत्यंत शोचनीय होय. —केसरी.

श्रीमुख— मूळचा अर्थ ज्या मुद्रेवर श्री (लक्ष्मी) चें तेज आहे अशी मुद्रा. यावरून पुढें नुसतें तोंड असा अर्थ.

हें त्यानें धोंड्याच्या मानेस हात घातल्याबरोबर त्यानें एक जोरानें हैबत्याच्या श्रीमुखांत फडकाविली. — मधुरा.

तुका ह्मणे लागली भूक। तुझें पहावया श्रीमुख॥ (यांत श्री० शब्दाचा मूळ अर्थ कायम आहे )

हत्तीचें मढें— फार मोठें, आंवरण्यास कठिण, असें प्रकरण.

हलक्या कानाचा— कोणीं कसेंही खरें खोटें सांगितलें तरी तें खरें मानणारा. Easy of belief; credulous.

त्याच मकाजीनें व रामजीनें मिळून माझ्या भावाच्या नाहीं नाहीं त्या चहाड्या सांगण्यास आरंभ केला आणि भाऊसाहेब किती हलक्या कानाचे आहेत, याचा अनुभव तुला आहेच. —मधुरा.

हंसत हंसत दांत पाडणें— गोड गोड बोलून फजिती करणें. To confute one by smiling.

हाडाचीं काडें (पाणी) करणें— काड म्हणजे धान्य काढून घेतल्यावर राहिलेलें धान्याचें ताट. यावरून एखाद्या कामासाठीं हाडें झिजविणें, अति श्रम करणें हा अर्थ. To work so very hard as to reduce one's flesh.

हाडांचीं काडें करून परीक्षा दिल्या तरी पुढें चरितार्थ कसा चालवावयाचा ही विवंचना आहेच !

हाडें उजाविणें–भाजणें– लग्न करून देणें. ( लग्न झालेल्या माणसाच्या प्रेताला अविवाहित माणसापेक्षां एक संस्कार अधिक सांगितला आहे. )

स्वतःच्याच हौसेनें आपल्या लाडक्या मुलांचीं हाडें भाजून आमचे लोककल्याणेच्छु सर्वांस सांगूं लागतील...... –नि० मा०

हाडें खिळाखिळीं करणें–घुसळणें– त्रास देणें. To worry and weary greatly.

हात आंखडणें– देण्यासाठीं पुढें केलेली वस्तु एकाएकीं मागें घेणें. To draw in the hand.

आपली संस्था उत्तम प्रकारें चालली असतां; पण आयत्या वेळीं सगळ्या आश्रयदात्यांनीं हात आंखडल्यामुळें ती बंद करावी लागली.

हात कापून देणें– लेखी करार करून देणें.

हातघाईवर येणें– हात चालविण्याची घाई ह्मणजे मारामारी, तेथपर्यंत मजल जाणें. To come to blows or to come to loggerheads.

हातचा मळ– हातावरचा मळ सहज प्राप्य असतो. नुसते हातावर हात चोळल्यानें तो निघतो. त्यावरून सहज घडणारी गोष्ट. A work quite easy in performance.

सरळ, सोपी आणि बालिकाबोध भाषा कशी वापरावी हें म्हणजे माझ्या हातचा मळ आहे. –कीच०

हात चालणें– हातांत सत्ता किंवा संपत्ति असणें; सामर्थ्य असणें; पैका मिळणें.

हातचें सोडून पळत्याच्या पाठीस लागूं नये– जें खात्रीनें आपलें आहे ( आपणास मिळणारच ) तें सोडून जें अनिश्चित आहे ( मिळेलच अशी खात्री नाहीं ) तें मिळविण्याच्या नादीं लागूं नये. A bird in hand is worth two in the bush.

हातच्या हातीं<br>हातोहातीं } – तावडतोब; लवकर. Swiftly.

हात टाकणें– मारणें. To assault.

हात टेंकणें– मत्यास येणें. To be at one's last resource

आमचे आजोबा म्हणजे कसले भांडणारे वस्ताद ! पण त्यांनींसुद्धां हात टेंकले
–पण लक्षांत०

हात दाखविणें– हातांत जोर किंवा सामर्थ्य किती आहे तें दाखविणें, अर्थात् चोप देणें. To punish; to make one's hand felt.

हात देणें– मदत देणें. To lend help or render assistance.

ज्यासह घडतें देवें सहजपथीं चालणें पदें सात।
त्या मित्र साधु म्हणती देतीच व्यसनसागरीं हात ॥
–श्री० बाळासाहेब कुरुंदवाडकर.

हात धरणें– वरचढ करणें. To excel.

हात धुवून पाठीस लागणें– एखाद्याचा नाश करण्याविषयीं आग्रहानें प्रवृत्त होणें; चिकाटी धरून पाठलाग करणें. ( यांत ' हात धुवून ' या शब्दाचा अर्थ जेवण्याच्या वेळेखेरीज दुसरा खंड न पडूं देतां असा दिसतो. जेवणांत जो काय वेळ जाईल तेवढाच खंड. हात धुतले कीं पुनः पाठीस लागलच असा अर्थ. ) To pursue with a determined and deadly purpose.

हातपाय गाळणें– धीर सोडणें. To lose courage.

हात पोंचणें– कृतकृत्य होणें. ( जें कांहीं साध्य करावयाचें त्याला हात पोंचणें म्ह० तें मिळणें. )

अजून चाकरी लागायची आहे तोंच तूं इतकी उन्मत्त झालीस, माजलीस; तुला असं वाटायला लागलं आहे कीं माझे हात पोंचले.

हात मारणें– ताव देणें. To lay rapacious or violent hands upon.

हात राखून खर्च करणें– काटकसरीनें खर्च करणें. To spend sparingly.

हात वाहणें– धजणें.

हें दुष्टपणाचें नीच कृत्य करण्यास माझा हात वाहत नाहीं.

हातांत कंकण बांधणें– यज्ञयाग करते वेळीं मंत्रून हातांत दोरा बांधीत आणि यज्ञ पुरा झाल्याशिवाय तो सोडीत नसत. त्याला कंकण म्हणत. त्यावरून एखादी गोष्ट आपण करूंच करूं अशी प्रतिज्ञा करणें हा अर्थ. To solemnly undertake; to profess to do.

हातांत नारळाची आई ( नरोटी ) देणें— भिक्षा मागावयास लावणें.

'तुझ्या हातांत नरोटी देईन ...... तरच नांवाची होईन.' —रंगराव०

हातातोंडाशीं गांठ पडणें— जेमतेम खाण्यास मिळणें.

जॉन्सननें एवढा इकडचा डोंगर इकडे केला, पण पुनः हातातोंडाशीं गांठ आहे ती आहेच. —निबंधमाला.

हातातोंडास येणें—तारुण्यावस्था प्राप्त होणें; फल देण्याच्या स्थितीला येणें. To become capable of yielding proper fruit or good.

हाताबोटांवर येणें— आतां होईल, घटकाभरानें होईल, अशा स्थितीला येणें.

हाताला हात लावणें— पति व पत्नी पुण्याहवाचनाला बसतात तेव्हां पतीच्या हाताला स्त्रीनें नुसता हात लाविला म्हणजे तें धर्मकृत्य उभयतां मिळून केलें असें होतें. त्यावरून स्वतः कांहीं न करतां दुसऱ्यानें केलेल्या कामाच्या फलांत मात्र वांटेकरी होणें हा अर्थ. To be a sleeping partner.

हातावर तुरी देणें— हातावर हात देऊन—उघडपणें—देखत देखत—फसवून पळून जाणें.

सुभद्रा काबीज करण्यासाठीं श्रीकृष्ण परमात्म्याच्या मदतीनें अर्जुनानें बलिरामाच्या हातावर ज्या तुरी दिल्या...... तें पाहून तरी आम्हांस कधीं विवाद झाला आहे काय ? —आगरकर.

हातावर पाणी पडणें— भोजनोत्तर अंचवणें.

हातावर पाणी पडलें तों धांवपळ दुर्गीकडे असें व्रत होतें तें मीं आतां सोडलें.

हातावर शीर घेऊन— जिवाची पर्वा न करतां. At the risk of one's life.

हातावर हात देऊन पळणें— देखत देखत पळणें.

हातावर संसार करणें— वृत्ति, जहागिरी वगैरे कायमचें उत्पन्न नसतां नौकरी, भिक्षा वगैरे मार्गांनीं हातावर मिळवून हातावर खर्च करून संसार करणें. To live by the labour of one's hands.

हातास हात लागणें— एखाद्यापासून दक्षिणा वगैरे द्रव्य मिळणें.

हातीं पायीं उतरणें— मोकळा होणें—सुटणें—म्हणजे संकटांतून मुक्त होणें.

हातीं भोंपळा घेणें— भीक मागूं लागणें.

हातीं भोंपळा येणें— भिकेस लागणें.

---

# प्रकरण सहावें.

## धर्म, नीति व शास्त्रें यांवरून झालेले संप्रदाय.

उदक सोडणें– त्याग करणें. ब्राह्मणभोजनाचे वेळीं यजमान पात्रें प्रोक्षण करून उदक सोडतो, ह्मणजे ब्राह्मणांकरितां शिजवून तयार केलेल्या अन्नावरचा आपला हक्क सोडून तें त्यांस अर्पण करतो. यावरून एखाद्या वस्तूवरचा हक्क सोडणें हा अर्थ. To relinquish; to give over.

उदरीं शनि येणें– जन्मराशीला शनि येणें. जन्मराशीला शनिग्रह येणें हें फलज्योतिषांत श्रीमंती प्राप्त होण्याचें लक्षण सांगितलें आहे. त्यावरून संपत्तीचा लाभ होणें; चलचलाट होणें. To have a good or fine time of it; to have a run of good luck.

उधे उधे करणें (उदे उदे किंवा उदो उदो करणें)– उधे (दे) यांत मूळ शब्द उदय=अंबाबाईचे भक्त देवीपुढें करतात तो मंगल शब्द. त्यावरून जयजयकार करणें हा अर्थ. उपरोधिक रीतीनें दिग्विजय करणें असाही अर्थ होतो. To praise one to the skies.

एका माळेचे मणी–जपाच्या माळेंतले सगळे मणी एकसारख्या आकाराचे, रंगाचे व रूपाचे असावे लागतात. यावरून सगळे एकसारखे अशा अर्थानें या म्हणीचा निंदापर उपयोग होतो. Birds of the same feather.

ओढून चंद्रबळ आणणें– फलज्योतिषांत चंद्रबळ म्ह० एखाद्याच्या राशीस चंद्राची अनुकूलता असणें. यावरून एखादी गोष्ट इष्ट वाटत असतांही वरपांगीं तिच्याविषयींची अनिच्छा दाखविणें असा अर्थ. To pretend aversion towards a thing desired.

मला कोणी पहायला आलें होतें.…आजीनें मला हांका मारल्या. मीं बराच वेळ ऊं ऊं करून ओढून चंद्रबळ आणिलें…… शेवटीं दुर्गीनें मला ओढून नेलें.

—पण लक्षांत०

ओ ह्मणतां टो येईना– मुलाला धुळाक्षरें शिकविण्याच्या अगोदर 'ॐ नमःसिद्धाय' हें शिकवीत असतात. 'ओ' ह्मणजे अर्थात् अगदीं पहिलें अक्षर. तें देखील येईना ह्म० तो अक्षरशत्रु आहे. 'ठो' हें अक्षर केवळ 'ओ'

ऱ्या नादसादृश्यासाठीं योजिलें आहे. त्याला कांहीं अर्थ नाहीं. To be a blockhead.

ओली भिक्षा– शिजविलेल्या अन्नाची भिक्षा; माधुकरी. Alms of cooked articles of food.

कपिलाषष्टीचा योग– फारच दुर्मिळ, पुष्कळ काळानें येणारी संधि. ज्योतिषशास्त्राच्या मतें भाद्रपद मास, कृष्णपक्ष, हस्तनक्षत्र, व्यतिपात, मंगळवार, रोहिणी, इतक्या गोष्टी जमतात, तेव्हां कपिलाषष्ठीचा योग होतो. A very rare opportunity.

करणी करणें– १ लग्नांत वराला वस्त्रं, भूषणें इ० देणें. २ कोणास उद्देशून जारणमारणादि प्रयोग करणें. ३ अचाट कृत्य.

१ बाबूच्या सासऱ्यानें हुंडा थोडा दिला, पण करणी चांगली केली. ( देणगी ).
२ कर्मे नक्षत्रासारखें पोर होतें, पण कोणी चांडाळणीनें करणी करून मारून टाकिलें ! ( जारणमारणादि प्रयोग ).
३ 'नर करणी करे तो नरका नारायण होय.' ( अचाट कृत्य ).

कल्पांत करणें– ब्रह्मदेवाच्या दिवसाचा जो अंतसमय, जेव्हां सर्व सृष्टीभर प्रळय व्हावयाचा, त्याला कल्पांत हें नांव आहे. त्यावरून आकांत किंवा मोठा कल्लोळ करून सोडणें हा अर्थ.

नऊ नाहीं वाजले तोंच भूक लागली म्हणून मुलांनीं कल्पांत करून सोडला.

काडी मोडून देणें– स्त्रीपुरुषांनीं परस्पर तूं माझी नव्हेस आणि मी तुझा नव्हें असें जाहिररीतीनें सांगून विवाहसंबंध तोडणें. या संस्काराचे वेळीं गवताची काडी घेऊन ती मोडतात. To divorce.

कुडबुड्या जोशी– कांहीं तरी पुटपुटत भविष्य सांगण्याचा आव घालणारा.

खडाष्टक– मूळ शब्द षडाष्टक. हा ज्योतिषशास्त्रांतला शब्द आहे. एका माणसाच्या राशीपासून दुसऱ्याची राशि आठवी असली म्हणजे हा योग होतो. हीं षडाष्टकें दोन प्रकारचीं आहेत. प्रीतिषडा० व वैरषडा०. पण बहुधा वैरषडाष्टकाबद्दल खडाष्टक हा शब्द मराठींत योजतात. Hatred.

गंडा बांधणें– गायनादि कला शिकविणारे शिकणाराचे हातास आरंभीं दोरा बांधतात ती क्रिया; शिष्य करणें. To take one as a disciple.

**गर्गाचार्यांचा मुहूर्त**— उषःकालाच्या किंचित् अगोदरची वेळ. ही वेळ प्रयाग वगैरे करण्यास फार शुभ समजतात. ( गर्गाचार्य हे नामांकित ज्योतिःशास्त्रज्ञ व यादवांचे कुलगुरु होते. त्यांच्या सन्मानाखातर प्रातःकाळच्या या मुहूर्ताला त्यांचें नांव दिलें आहे. ) An auspicious moment specially one before the dawn.

**गुळाचा गणपति**— अंगीं थोडासा धनीपणा असून एखाद्या कारभाराविषयीं हें बरें किंवा हें वाईट असें कांहींच न बोलण्याचा ज्याचा स्वभाव तो. गुळाचा केलेला गणपति एका जागीं चिकटून राहतो. त्याला उचलून दुसरीकडे नेतां येत नाहीं. कांहीं कामकाज न करणारा *cf*. शेणाचा पोहो. An acquiescing person.

**गुळाचा गणपति आणि गुळाचाच नैवेद्य**— जेथें दोघेजण दिसावयाला मात्र भिन्न पण वस्तुतः एकच असतात, तेथें ही म्हण लावतात. ( नैवेद्य गुळाचा व नैवेद्य खाणाराही गुळाचाच. तेथें कोण कोणाला खाणार ! असा भावार्थ.) Making a present to one out of one's own gift.

**गोंधळ घालणें**— घरीं लग्न वगैरे मंगलकार्य झालें म्हणजे गोंधळ्यांकडून गोंधळ घालविण्याचा परिपाठ कांहीं घराण्यांतून आहे. हा गोंधळ म्हणजे अशिक्षित अशा गोंधळी लोकांचें कीर्तनच असतें. त्यांत व्यवस्थितपणा नसतो. आणि आरडणें, ओरडणें व ढोलक्याचा जंगी आवाज सारखा चालू असतो, यामुळें त्याला गोंधळ म्हणतात. हा गोंधळ ऐकावयाला फारसें कोणी बसतही नाहींत. गोंधळ्यांकडे तो सोंपविला असतो. यावरून स्वच्छंदानें व अव्यवस्थितपणें वागणें हा अर्थ.

एखादा चुलतभाऊ जरी असता तरी त्याला घरीं ठेवून मी आपला अलग राहिलों असतों. खर्चापुरतें दिलें असतें फेंकून अन् म्हटलें असतें ' घाला गोंधळ. '

—रंगराव.

**घटका भरणें**— लग्न ज्या मुहूर्तावर असेल तो येईपर्यंत जोशीबुवा पाण्यांत बरोबर घटकेंत भरणारें असें एक तांब्याचें पात्र गंगाळांत टाकून ठरीव घटका संपण्याची वाट पाहत बसतात. त्यावरून घ० म्हणजे आयुष्यमर्यादा संपणें. To have one's hour full; to expire.

सौदामिनी—आली माझ्या सुखाची घटका भरत. —गुप्तमंजूष.

घटकेचें घड्याळ— घटकाभर टिकणारें घड्याळ, अर्थात् क्षणभंगुर देह. This transitory life.

घटपटादि खटपट— ज्यांत कांहीं रस नाहीं अशी व्याकरण किंवा शास्त्रविषयक चर्चा. रुक्ष विषयांचें उद्घाटन. ( न्यायशास्त्रांत घट आणि पट या दोन शब्दांवर बराच खल केलेला आहे. तो सामान्य जनांस समजत नाहीं व त्यामुळें रुक्ष वाटतो. )

प्रस्तुत कवीनें ( मोरोपंतानें ) 'घटपटादि खटपटींत' न पडतां परमार्थसाधनास जेवढा व्युत्पत्तीचा भाग अवश्य तेवढाच संपादन केला. —निबंधमाला.

नलगे व्याकरणाची न्यायाची घटपटादि खटपट ती।
वैकुंठ पेठ मोठी नांवावरि हीन दीन खटपटती ॥

घबाड साधणें— ज्योतिःशास्त्रांत हा एक मुहूर्ताचा योग सांगितला आहे. या मुहूर्तावर कार्याला हात घातल्यास अल्पश्रमानें पुष्कळ लाभ होतो असें ह्मणतात. यावरून एकदम मोठा लाभ होणें हा अर्थ. To have a windfall.

घर करणें— १ गृहिणीशिवाय घर केलें ह्मणत नाहींत, यावरून संसार थाटणें हा अर्थ; २ छिद्र पाडणें ( उदा० कांट्यानें पायांत घर केलें आहे ).

घरीं आलेली— नवरा मेल्यावर मुलगी बहुधा आपल्या बापाच्या घरीं येऊन राहते; यावरून विधवा झालेली हा अर्थ. Widowed.

राधाबाईच्या बहिणीची मुलगी घरीं आलेली होती. तिनें आपल्या मावशीच रात्रंदिवस कष्ट करावे. —रंगराव.

घेवाण देवाण— अहेर, नजराणा, मार वगैरे घेणें आणि प्रसंगविशेषीं दुसऱ्यास देणें. [ बायकांत संक्रांति वगैरेसारख्या दिवशीं एका सवाष्णीनें दुसरीस वाण ( वायन ) देण्याची व दुसरीनें दिलेलें घेण्याची चाल आहे. ] The give-and-take policy.

सार्वजनिक कृत्यांत पडल्यावर लोकांच्या टीकेला भिऊन कसें चालेल ? तेथें घेवाण० असें चालावयाचेंच. ( म्हणजे आपण दुसऱ्यावर टीका करावी व त्यानें उलट आपल्यावर केलेली सोसावी हा प्रकार चालावयाचाच. )

चंबूगबाळें आटोपणें— चंबू ह्मणजे आवळ गळ्याचें पात्र आणि गबाळें ह्मणजे सोंवळें ठेवण्याची पिशवी. दुसऱ्याच्या घरीं जेवल्यानंतर हीं

दोन्ही कासेंत मारून घरीं येण्यास माणसें निघतात. यावरून जाण्याची तयारी करणें हा अर्थ. To pack off.

इतक्या ऐटीनें आलेले औरंगजेबाचे चिरंजीव वृद्ध वडील कंबर बांधून येत आहेत इतकं ऐकतांच चंबूगवाळें आटोपून इराणांत गेले ! —निबंधचंद्रिका.

माझ्यासारख्यानें चंबूगवाळे आटोपून स्वर्गाचा रस्ता धरावा. —गुप्तमंजूष

चांदरात झडणें— ज्या रात्रीं प्रथम चंद्रदर्शन होतें तिला चांदरात म्हणतात. त्यावरून चांदरातीचे चांदरातीस रोजमुरा किंवा पगार मिळणें असा अर्थ. मुसलमान लोकांत चांदरातीचें मोठें महत्त्व समजतात.

चांभाराच्या देवाला खेटरांची पूजा— चांभार हे जनावरांच्या कातडयाचा व्यापार करणारे म्हणून ते दुष्ट. यावरून दुष्टांना योग्य शासनच व्हावयास पाहिजे, त्यांच्यावर दया करणें योग्य नाहीं असा अर्थ; किंवा ज्याचा जो धंदा असेल त्या धंद्यांतला पदार्थ तो देवाच्या चरणीं वाहतो. चांभार देवाच्या चरणीं जोडा वाहणार. यावरून विपरीत अर्थानें जोडयानें बडविणें, अशीही उपपत्ति लावतां येते. ही दुसरी उपपत्ति अधिक ग्राह्य दिसते. The wicked should never be spared.

चुटक्यांचे मांडव— एका बाईनें नवस केला कीं, आपणास मुलगा झाला तर देवापुढें मांडव घालूं. तिला मुलगा झाला, तेव्हां मांडव घातला पाहिजे होता. पण तिला सामर्थ्य नव्हतें. ती मोठी युक्तिवाज होती. तिनें त्या जागीं जाऊन जेथें जेथें मांडवाचे खांब रोंवावयाचे त्या त्या जागीं एकेक चुटकी वाजविली आणि म्हटलें झाला चुटक्यांचा मांडव. माझा नवस फिटला. यावरून पोकळ प्रतिष्ठेचें बोलणें हा अर्थ. Blustering words.

मियासाहेबांनीं चुटक्यांचे मांडव यथास्थित रचून खुद्द बाजिराच्या लेकीवरही आपल्या नाजूक पायाचा प्रयोग योजिला होता. —नि० मा०

चुडेदान देणें— एखाद्या स्त्रीच्या पतीस मारण्याची संधि आली असतां तिच्या सौभाग्याकडे लक्ष देऊन त्याचे प्राण वांचविणें. To spare the life of a woman's husband.

चुलीला अक्षत लागणें— घरांतल्या माणसांना दुसरीकडे जेवावयास जावयाचें असल्यामुळें चुलीनें न पेटतां राहणें. (कोणतेंही धर्मकृत्य संपलें म्हणजे

ब्राह्मण अक्षता टाकून तें संपलें असें सूचित करीत असतात. त्यावरून चु० म्हणजे त्या दिवसापुरतें चुलीचें काम नसणें- तिला सुट्टी देणें. )

जन्माची गांठ- जन्मांत न सुटणारी गांठ-विवाहसंबंध. ( हिंदु लोकांत एकदां झालेला विवाहसंबंध कायमचा-जन्मभर टिकणारा- समजतात. ) Indissoluble tie of marriage.

जपमाळ घेणें- निदिध्यास करणें, एखादी गोष्ट पुनः पुनः सांगत सुटणें. ( देवाचें नामस्मरण करणारा मनुष्य हातीं माळ घेऊन बसतो. त्यावरून एखाद्या गोष्टीचा जप करीत बसणारास 'जपमाळ घेऊन बसला' असें ह्मणतात. ) To reiterate.

आमच्याच देशांतल्या पंडितांनीं आपली कुळकथा विसरून जाऊन............ आह्मी मूर्ख, आह्मी कोडगे अशी सतत हातांत जपमाळ घ्यावी या बहादुरीस काय ह्मणावें तें आह्मांस समजत नाहीं. -निबंधमाला.

जागती ज्योत- खडखडीत दैवत. ( पुष्कळ देवस्थानांतून कांहीं विशिष्ट प्रसंगीं मूर्तीच्या अंगांतून ज्योत बाहेर पडते असें सांगतात व देव जागृत आहे-त्याच्यांतलें देवत्व या कलियुगांत अद्याप नष्ट झालें नाहीं-असें त्यावरून लोक मानतात. ) A deity ever watchful.

जानवें तोडण्यास उठणें- ब्राह्मणाला 'जानवें ह्मणजे अत्यंत पवित्र वस्तु. तें तोडावयास तयार होणें हें कर्म तो अतिशय चिडला असल्याशिवाय त्याचे हातून होणें नाहीं. यावरून अतिशय चिडणें, रागावणें हा अर्थ. To fly into rage.

जुलुमाचा रामराम- ज्याच्याशीं आपलें चांगलें आहे तो भेटला असतां आपण 'रामराम' करतों; पण एखादा अधिकारी आपल्याशीं नीट रीतीनें वागत नसूनही केवळ त्याच्या अधिकाराला भिऊन-जुलूम करील या भीतीनें-आपण त्याला 'रामराम' करतों. यावरून मनापासून न केलेलें-केवळ करावयालाच पाहिजे, नाहीं तर शिक्षा होईल अशा धाकामुळें केलेलें-काम. A work performed under compulsion.

तत्त्वमसीशीं गांठ घालणें— वेदांतशास्त्रांत तत्त्वमसि हें नांव ब्रह्माला आहे. कारण तें सर्वश्रेष्ठ आहे. यावरून व्यवहाराला मुख्यत्वेंकरून लागणारा

जो पैसा तो मिळविणें हा अर्थ. To have an eye to the main chance.

तळी उचलणें— ( तळी भरणें पहा. ) तळी भरल्यानंतर सर्वजण खंडोबाच्या नांवाचा उच्चार करून ती उचलतात, त्याला तळी उचलणें ह्मणतात. यावरून अनेकजणांमिळून युक्तीनें एखाद्याला अधिकारच्युत करणें हा अर्थ. To oust one out of office.

तळी भरणें– खंडोबाचे भक्त सगळेजण मिळून एका ताटांत पानें, सुपारी, भंडार, खोबरें वगैरे भरतात त्याला तळी भरणें ह्मणतात. यावरून सर्वांनीं एक कट करून त्याच्या सिद्धीसाठीं मदत करणें हा अर्थ. To combine together.

तारांबळ होणें–उडणें– ( तारा+बल ) नक्षत्रबळ हा मूळचा अर्थ. नक्षत्रबळ चांगलें नसलें ह्मणजे मनुष्यानें कितीही धडपड केली तरी व्यर्थ होते व त्यामुळें मनुष्याचें मन व्यग्र होतें. यावरून गडबड उडणें हा अर्थ. To have one's mind distracted; to be in distress.

आपलें सैन्य इंग्रजापाशीं चाकरीस ठेवण्याचा तह करण्याविषयीं गव्हर्नराचा नानास आग्रह चालला होता, पण त्यास त्यांनीं मतलब करून एकदर राज्याची जरी तारांबळ झाली होती तरी तो कबूल झाला नाहीं. –निबंधमाला.

तीर्थीं गेल्यावांचून मुंडण होत नाहीं– १ बऱ्या बोलानें कोणी ऐकत नाहीं. २ श्रम केल्यावांचून विद्या येत नाहीं. ३ कांहीं तरी कष्ट केल्यावांचून पुण्यप्राप्ति नाहीं. ( तीर्थाचे ठिकाणीं मुंडण करण्याविषयींचा धर्मशास्त्राचा निर्बंध आहे. ) There is no gain without labour.

तिलांजलि देणें– एखाद्याप्रीत्यर्थ सोडणें; वस्तूवरचा हक्क सोडणें. ( वडिलांचें श्राद्ध किंवा तर्पण करतांना हातांत तीळ घेऊन ते उदकाबरोबर सोडण्याची रीत आहे. ) To relinquish.

जिनें मला जन्म दिला तिला मी नुसता आसवांचा तिलांजलि देऊं नये का ?

–गुप्तमंजूष

तिलांजलि घेऊन उभें रहाणें– एखाद्याच्या मरणाची अपेक्षा करणें–त्याची वाट पाहणें. ( पितरांच्या श्राद्धाचे वेळीं तिलांजलि सोडावी लागते

यावरून वरील अर्थ निघाला.) To be impatiently awaiting the death or ruin of.

तीळ खाऊन व्रत मोडणें– अगदीं क्षुल्लक फायद्यासाठीं अयोग्य कृत्य करणें. (एकादशी, शिवरात्र वगैरे उपवासाला तीळ खाल्ले तर तो उपास मोडतो अशी समजूत आहे.)

तुरुतदान महापुण्य– जें काय द्यावयाचें तें तत्काळ देऊन टाकणें चांगलें. आज देऊं, उद्यां देऊं असें ह्मणून लांबणीवर टाकणें चांगलें नाहीं. (तुरुत हा त्वरित शब्दाचा अपभ्रंश आहे.) Bis dat qui cito dat.

तुळशींत भांग– चांगल्यांच्या समुदायांत चुकून एखादा वाईट माणूसही आढळतो. There is black sheep in every fold.

त्राहि भगवन् करणें– 'त्राहि भगवन्' (ह्मणजे 'हे परमेश्वरा! आमचें रक्षण कर') असें ह्मणण्याइतका त्रास देणें. To tease one to the extreme.

थेक ह्मणतां ब्रह्महत्या– थेक हा गुरें हांकण्याचा शब्द आहे. गुरें हांकतां हांकतां एखाद्या गाईनें पुढें चाललेल्या ब्राह्मणाला धक्का दिला तर ब्राह्मण मरेल ही भीति. यावरून आपल्या कृत्याचा अकल्पित असा परिणाम होण्याची भीति असा अर्थ.

जाऊं दे रे बुवा, त्याला लाडू खाण्याचा आग्रह करूं नकोस, थेक ह्मणतां ब्रह्महत्या व्हावयाची! (त्याचें पोट फुगलं म्हणजे उगाच पंचाईत!)

दरिद्रनाम संवत्सरे– सबंध वर्षांत दरिद्राशिवाय दुसरें कांहीं नाहीं; अर्थात् अतिशय दारिद्र्य.

दर्भ्या– मृताची उत्तरक्रिया सांगणारा ब्राह्मण (कार्टा) हातांत दर्भ घेऊन उभा असतो. त्यावरून अपेशी, दरिद्री असा अर्थ. A wight or luckless person.

दिवस करणें– मृताच्या आत्म्यास मुक्ति मिळावी ह्मणून धर्मशास्त्राप्रमाणें त्याचें क्रियाकर्मांतर करणें.

खरें तुरुंग भ्रम नेऊन कोठें आटपणें? दुसरे किंवा तिसरे दिवशीं राख गोळा करण्यास गेलें पाहिजे व दिवसही तेथेंच केले पाहिजेत. —आगरकर.

दिवे ओवाळणें– मूळ अर्थ आरती करणें. पुढें उपरोधिक अर्थ–कुच किंमतीचा समजणें. To be considered worthless.

मी ह्मणे प्रीतीमुळें मूढ झालों! जसें कांहीं कोणी ह्मणेल खरेंच! अहाहा! दिवे ओवाळावे त्या प्रीतीवर. –वाटिका.

देव (भगवंत) पावला– मनाजोगी गोष्ट घडली. (पावणें– प्रसन्न होऊन इच्छित वर देणें.)

विप्रा सुरवरकन्या पाहुनि हर्षें मनीं ह्मणे बलहा।
भगवंत पावला; या दोघींत प्रथम लावितों कलहा॥ –मोरोपंत.

देवापुढचा देव– शंख. A superlative blockhead.

देवाज्ञा होणें– मरण येणें.

देव देव्हाऱ्यांत नसणें– जी वस्तु ज्या ठिकाणीं असली पाहिजे तेथें ती नसणें; मनाच्या अस्वस्थतेलाही हा संप्र॰ लावतात.

बाजीरावसाहेब पळून गेल्यावर इंग्रजांनीं पुणें घेतलें, यांत कांहीं नवल नाहीं. आपला देव जर देव्हाऱ्यांत नाहीं तर दुसऱ्यास दोष देण्यांत अर्थ काय?

द्राविडी प्राणायाम– प्राणायाम करतांना उजव्या हातानें नाकपुडी धरावयाची असते. त्यासाठीं सरळ समोरून हात न नेतां डोक्याच्या मागच्या बाजूनें हात नेऊन, तो पुढें आणून नाकपुडी धरणें ह्या लांबणीच्या आणि त्रासयुक्त प्रकाराला द्रा॰ ह्मणतात. A round about and tedious way of doing things. *cf.* बकबंधनन्याय.

'वेताळपंचविशी' हा ग्रंथ मूळचा संस्कृत; त्या भाषेंतून याचा तर्जुमा फारशी भाषेंत झाला; तींतून इंग्रजींत; इंग्रजींतून मराठींत! केवढा द्राविडी प्राणायाम हा!! –निबंधमाला.

धरमधक्का मिळणें– कार्य न होतां व्यर्थ येरझारा करण्याचे श्रम पडणें. To get unprofitable kicks and knocks.

धर्म करतां कर्म उभें रहाणें किंवा पाठीस लागणें– एखाद्याचें बरें करावयाला जात असतां संकट प्राप्त होणें. To bring upon one's self troubles and evils in striving to do good.

धर्मास येणें– उचित वाटणें. To approve as fit to be done.

मला जें सांगावयाचें होतें तें मीं सांगितलें, आतां तुमच्या धर्मास येईल तें तुह्मी करा.

धर्मावर सोमवार सोडणें– कित्येकांनीं सोमवारीं एकच वेळ भोजन करण्याचा नेम धरलेला असतो. पण तें एका वेळेचें जेवणसुद्धां घरीं न जेवतां परभारें दुसऱ्याकडे ( धर्मावारीं ) जेवणें. ह्म० परभारें गोष्टी भागविणें; स्वतः कांहीं झीज न सोसणें हा अर्थ.

धोंडभट्टी करणें– खरोखर स्नान न करतां स्नान केलें असें दिसावें ह्मणून भस्म, गंध वगैरे लावणें. ( दुसऱ्याला फसविण्याची ही युक्ति प्रथम धोंडभट्ट नांवाच्या कोणा ब्राह्मणानें केली, त्यावरून ही ह्मण प्रचारांत आली असावी.)

नरहरदेवाची पालखी– ज्यावर कोणा एकाची सत्ता नाहीं किंवा एकावर जबाबदारी नाहीं, पण सगळ्यांनीं हातभार लावला तरच जें होण्यासारखें असें काम. असें काम अर्थात् वेळीं अवेळीं केव्हां तरी व कसें तरी व्हावयाचें. ह्मणजे अव्यवस्थित रीतीनें केवळ लोकांच्या मर्जीनुरूप घडणारे कामाला ही संज्ञा देतात. No-body's work.

नक्षत्र पडणें– नक्षत्राचा वर्तनावर परिणाम होणें. जसें, हातावर नक्षत्र प० ह्मणजे चोरी करणें; पायावर नक्षत्र प० = निरंतर चालणें; तोंडावर नक्षत्र प० = एकसारखी बडबड करणें इ०.

हा पाहिलांत कां तुमचा सुपनस्कन्या! याच्या तोंडावर नक्षत्रच पडलें आहे जसें! हा भेला काय पाहिजे नसलें अभद्र बडबडतो. —अतिपीडचरित.

नागेश्वराला नागवून सोमेश्वराला वात लावणें!– एकाला लुबाडून आणलेल्या पैशानें दुसऱ्याला खूष करणें. I rob Peter to pay Paul.

निर्वाणीचा बाण– निर्वाण = मुक्ति; अखेर. यावरून अखेरचा उपाय ह्मणून सोडलेला बाण. An arrow considered as one's last hope. *cf.* निर्वाणीचें अस्त्र.

पट्टीचा वैदिक– विद्वान् विद्वान् वैदिक ब्राम्हणांना एका पट्टीला ( रांगेला ) बसवितात व इतरांना निराळ्या रांगेला. यावरून विद्वान् असा अर्थ. A competent reciter of the Vedas.

पाट लावणें– विधवेनें पुनः लग्न करणें. To take a second husband.

**पाणी सोडणें-देणें-घालणें**- ब्राह्मणाला दिलेल्या वस्तूवर पाणी सोडलें म्हणजे त्या दानाची सांगता होते, तोंपर्यंत नाहीं. पाणी सोडल्यानंतर दिलेल्या वस्तूवर दात्याचा हक्क राहत नाहीं. यावरून त्याग करणें; हक्क सोडणें हा अर्थ. To relinquish; to resign.

मागें एक पुढें एक । दोनी मिळुनि विठ्ठल देख ।
ऐसी होतांचि मिळणी । दिलें संसारासि पाणी ॥

-एकनाथ.

ज्या वेळीं आपला सारा देश यवनाक्रांत झाला होता व आपल्या आर्यजननीस तिच्या सुपुत्रांवर पाणी सोडण्याची वेळ आली होती, त्या वेळीं श्रीशिवाजीसारखे पुरुष निर्माण झाले. -नि० चं०.

ऐसें ह्मणुनि रडे कीं गुरुहि सुशीलासि सोडवी पाणी ।
प्रभु अश्रुबिंदु तीचे न गळों दे, क्षिप्र ओढवी पाणी ॥

-मोरोपंत.

**पाण्याचे पितर**- पापी लोक पितरांस अन्नपाणी पोंचवीत नाहींत म्हणून त्यांचे पितर शरीरानें रोड असतात; त्यावरून रोड असा अर्थ. A starveling.

**पारणें फेडणें-फिटणें**- उपवासानंतर पुनः अन्न ग्रहण करणें; अन्नानें जिवाचें समाधान करणें; यावरून नुसतें समाधान करणें हा अर्थ.

डोळियांचीं धणी फिटलीं पारणीं ।
नाचतों कीर्तनीं संतांपुढें ॥ -एकनाथ.

**पिंगळा जोशी**- डमरू वाजवून भीक मागत फिरणारा व नेहमीं भरभराट होईल असें सांगणारा ज्योतिषी. A fortune-teller always predicting good.

**पितर उद्धरणें**- उद्धरणें शब्दाचा खरा अर्थ निकृष्ट स्थितींतून काढून स्वर्गादि उत्कृष्ट लोकीं नेणें. त्यावरून पुढें विपरीत लक्षणेनें पितरांवरून शिव्या देणें या अर्थी प्रयोग करतात. To rail at or abuse one's ancestors.

**प्रश्न पहाणें**- ज्या भूतभविष्यादि गोष्टींचें प्रत्यक्ष ज्ञान होऊं शकत नाहीं त्यांची फलज्योतिष, रमल इ० शास्त्रांच्या ज्ञानानें माहिती करून घेणें. To consider a matter by the rules of astrology.

**प्राणप्रतिष्ठा करणें**– धातु, काष्ट, इत्यादिकांच्या मूर्तींवर मंत्राचा वगैरे संस्कार करून त्यांचे अंगीं देवत्व आणितात त्याला प्राणप्रतिष्ठा ह्मणतात. मंदिरांत मूर्तींची स्थापना करण्याचे वेळचा हा संस्कार आहे. यावरून स्थापना करणें हा अर्थ. To found.

दक्षिणेंत मराठी राज्याची प्राणप्रतिष्ठा करणाऱ्या शिवाजी राजाचें व अमेरिकेंत स्वातंत्र्यदेवतेची प्राणप्रतिष्ठा करणारा वॉशिंग्टन याचें अनेक गोष्टींत अतिशय साम्य होतें.

**बांगड्या वाढणें–वाढवणें**– बांगड्या फुटणें (बांगड्या फुटणें हे शब्द अशुभ समजून त्याबद्दल बांगड्या वाढवणें असें ह्मणतात).

मीं धूम टोकली तीं इतक्या झपाट्यानें कीं, जातां जातां जिन्यांत पडून माझ्या एका हातांतल्या बांगड्या वाढवल्या.

**बारशास जेवणें**– मुलाच्या अथवा मुलीच्या जन्मदिवसापासून जो बारावा दिवस त्यास बारसें ह्मणतात. त्या दिवशीं इष्टमित्रांना मिष्टान्नभोजन घालतात. एखाद्याच्या बारशाच्या दिवशीं जेवलेला मनुष्य त्याच्यापेक्षां अर्थात् वयानें अधिक असला पाहिजे. यावरून जास्त अनुभव असणें, अधिक वस्तादगिरी करण्याचें सामर्थ्य असणें.

**बाहेरची बाधा**– पिशाचाचा उपद्रव. Demoniac possession.

**बेलभंडार उचलणें**– शपथ घेणें (शपथ घेतांना देवावरील बेल, भंडार वगैरे उचलण्याचा एक प्रघात आहे). To swear by God.

**मंत्रतंत्र लटपटणें**– भुतें वगैरे घालविण्यासाठीं मंत्रतंत्राचा उपयोग करतात. तो करूनही इष्ट हेतु सिद्धीस न जाणें, ह्मणजे केलेले बेत फसणें. To have one's plans baffled; to be utterly foiled.

**मधून विस्तव न जाणें**– वितुष्ट असणें. (दोघेजण दोन बाजूंस बसले असतां मधून विस्तव नेऊं नये. नेला असतां उभयतांचा तंटा लागतो अशी बायकी समजूत आहे. यावरून हा संप्रदाय निघाला.)

धारकर पवार व गायकवाड या दोघांमधून पूर्वीं विस्तव जात नव्हता. त्यांचीं यांचीं नेहमीं युद्धें होत.
—चार्जी०

**मात्रा न चालणें**– कोणाच्याही मतास मान न मिळणें. एकाच्या चातुर्यामुळें दुसऱ्याचें चातुर्य फुकट जाणें. वैद्यानें दिलेली मात्रा एखाद्या रोगावर

लागू पडली नाहीं म्हणजे 'त्या रोगावर ती मात्रा चालली नाहीं' असें म्हणतात. To have no effect.

'औरंगजेबापुढें कोणाची मात्रा चालत नसे.'

पेशव्यांच्या सैन्यापुढें आपली मात्रा चालत नाहीं हें पाहून... हैदर पिसाळलेल्या वाघाप्रमाणें चवताळला. —परशुरामभाऊंचे पराक्रम.

**माळ दुसऱ्याच्या गळ्यांत घालणें**— एखादें काम कोणत्याही माणसाकडे सर्वस्वी सोंपवून देणें. वधू वराच्या गळ्यांत माळ घालते, ह्मणजे आपलें सर्वस्व त्यास अर्पण करते. To elect one as—

मराठी काव्याचें काम करण्यास दुसरा कोणी पुरुष तयार असता तर त्यांनीं त्याची माळ आनंदानें त्याच्या गळ्यांत घातली असती.

**यंत्रमंत्र ( जंतरमंतर ) करणें**— एखाद्याचे विरुद्ध मसलती करणें. ( एखाद्याचें नुकसान व्हावें म्हणून पंचाक्षरी लोक कागदावर कांहीं आकृति काढून व मंत्र म्हणून तो कागद एखाद्याचे गळ्यांत बांधतात, किंवा पुरून टाकतात. यावरून सामान्यतः दुसऱ्याच्या नाशाच्या युक्त्या करणें हा अर्थ.) To make machinations against.

**राम म्हणणें**— मरतांना माणसाचे तोंडांत रामाचें नांव यावें अशी हिंदूंची समजूत आहे. यावरून मरणें हा अर्थ. To die.

**राशीस लागणें**— ग्रह क्रमाक्रमानें निरनिराळ्या राशींस येतात. त्यावरून वैरभाव धरणें हा अर्थ. To stand in inimical attitude against.

तारा०—नाहीं तरी सुभद्रा सुनंदेच्या फारच राशीला लागल्यासारखें करते.

—गुप्तमंजूष.

**राहूसारखा मागें लागणें**— राहू चंद्राच्या मागें लागतो व प्रसंग साधून त्याला ग्रासतो. त्याप्रमाणें एकसारखें एखाद्याचे मागें लागून त्याला ग्रासण्यास पहाणें हा अर्थ. To press upon and worry greatly.

**वाहिली ती गंगा राहिलें तें तीर्थ**— म्हणजे पैसे दानधर्मांकडे लागले तर पुण्यसंचय होईल, आपल्याजवळ राहिले तर आपल्याच उपयोगीं पडतील, मिळून कोणत्याही बाजूनें फायदाच. Said of liberal largesses or expenditure; because both the money spent and the money saved will profit.

वाळीत घालणें– बहिष्कार घालणें. To eject from the caste or society.

विकत श्राद्ध घेऊन सव्यापसव्य करणें– ( विकत कलागत, विकत खरूज, विकत खोकला इ० संप्रदायांत विकत शब्दाचा अर्थ आपल्या हातानें ओढवून आणिलेलें असा आहे. ) श्राद्धाचे वेळीं जानव्याचे सव्यअपसव्य करावें लागतें म्ह० यातायात करावी लागते. यावरून नसतीं लचांडें मागें लावून घेऊन यातायात करणें हा अर्थ. To trouble oneself with the requirements of an unnecessary engagement.

विधिनिषेध नसणें– विधि = कोणतें कार्य कसें करावें याविषयीं नियम; निषेध = कोणतें कार्य करूं नये याविषयीं नियम. यावरून कोणतें कार्य करावें किंवा न करावें याविषयीं विचार किंवा धरबंध नसणें हा अर्थ. To rise superior to all laws ; to have no scruples about.

एका जनार्दनीं छंद । हृदयीं तथा गोविंद ।
नाहीं विधि आणि निषेध । कृष्णावांचूनि दुसरा ॥ १ ॥ –एकनाथ.

व्यतिपात– सत्तावीस योगांतील सत्रावा योग. हा भावी संकटाचा सूचक असतो. यावरून संकटें आणणाऱ्या खोडकर मुलाला ही संज्ञा देतात.

शकुनगांठ बांधणें– एखाद्या कार्याला निघालें असतां प्रारंभीं जें मंगलवस्तूचें दर्शन घडतें त्यास शकुन ह्मणतात. त्या शकुनाच्या स्मरणार्थ पदराला गांठ बांधतात ती शकुनगांठ. पुढें आपलें कार्य यशस्वी होण्याच्या खात्रीची निदर्शक ही गांठ असते. यावरून खात्री वाटणें हा अर्थ.

इकडे हीं नियंजणें वाघोबाच्या तडाक्यांतून कसचीं पार पडतात, अशी त्यानें शकुनगांठ बांधून टेविली. –संभाजी.

शनीचा फेरा– ( साडेसाती शब्द पहा. )

शास्त्रार्थ करणें– किंचित् ( नांवाला ) करणें.

संक्रांत बसणें– सूर्य एका राशींतून दुसऱ्या राशींत जातो त्याला संक्रांत ह्मणतात. ज्या राशींत सूर्य जातो तिकडे ऊन जास्त कडक होतें. यावरून ज्यावर संक्रांत बसते त्या पदार्थांचें दुर्भिक्ष होणें, किंवा त्याचा नाश होणें हा अर्थ. किंवा संक्रांत नांवाची जी देवता मानतात ती ज्यावर बसते त्याचा नाश होतो अशी समजूत आहे. त्यावरून नाश होणें हा अर्थ झाला असावा. ही दुसरी उपपत्ति अधिक ग्राह्य दिसते.

सटवाईचीं अक्षरें– नशिबीं लिहिलें असेल तें. (माणसाच्या आयुष्यांत त्याला कोणकोणतीं सुखदुःखें भोगावीं लागतील तें सटवाई लिहून ठेवीत असते अशी समजूत आहे.) Destiny; web of the fates.

सतीचें वाण– एकवार अंगीकार केला असतां सर्वस्वापहार होवो किंवा जीव जावो, पण सोडतां येत नाहीं असा निश्चय. (वाण = वायन ह्मणजे सतीच्या ओटींत भरलेलीं फळें, तांदूळ, सुपाऱ्या वगैरे. एकदां सती जाण्याचा निश्चय करून ओटी भरली ह्मणजे तिला आपला निश्चय फिरवितां येत नाहीं. त्यावरून जिवावरल्या संकटांनाही न जुमानणारा निश्चय हा अर्थ.)

समिध शेकणें– ज्यांचे घरीं अग्निहोत्र आहे त्यांना कोठें गांवाला वगैरे जाणें झालें व त्यामुळें नित्यनेमांत व्यत्यय येण्यासारखा असला तर ते आपद्धर्म म्हणून रोज अग्नीची पूजा करण्याचे ऐवजीं एकदां नुसती समिध शेकून ठेवतात. त्यावरून स० ह्मणजे शास्त्रार्थ करणें–नुसतें नांवाला करणें, विधिनिषेध न पाळणें हा अर्थ.

लग्नकार्यांतून तर सोंवळ्याओंवळ्याची समिधच शेकलेली असते. –आगरकर.

समीकरण बसविणें– समी० हा गणितशास्त्रांतला एक भाग आहे. यांत उदाहरणाच्या दोन्ही बाजू समान असल्या पाहिजेत. यावरून सांगड घालणें, दोन्ही गोष्टींची एकवाक्यता आहे असें सिद्ध करणें हा अर्थ. To reconcile two apparently inconsistent things or facts.

सखीचा [सतीचा] लाल–उत्तम आईचा उत्तम मुलगा. A worthy son of worthy parents.

सगळीं सोंगें येतात पण पैशाचें सोंग आणतां येत नाहीं– (सारीं सोंगें येतात० ही ह्मण पहा.)

'तरतुदीला पैसा पाहिजेना? तो कोठें आहे? सगळीं सोंगें०–' –संभाजी.

सत्त्व घेणें– कसून परीक्षा घेणें. To try the mettle of.

सत्त्वास जागणें– सत्त्व राखणें. To keep one's virtue intact.

समुद्राचें अर्घ्य समुद्राला– ज्याच्याकडून देणगी मिळाली असेल त्यालाच ती परत करणें. ( अर्घ्य म्ह० ओंजळींत पाणी घेऊन देवाचें नांव घेऊन पुनः सोडतात तें. समुद्रांत उभें राहून सूर्याला अर्घ्य द्यावयासाठीं समुद्रांतलें पाणी घेतात व तें समुद्रांतच सोडतात. यावरून हा संप्र० निघाला.)

सव्यापसव्य करणें–श्राद्धपक्षाचे वेळीं ब्राह्मण यज्ञोपवीत डाव्यावरून उजव्या व उजव्यावरून डाव्या खांद्यावर टाकतात त्याला सव्यापसव्य म्हणतात. त्यावरून यातायात करणें हा अर्थ.

सुपारी देणें– नेमणूक करणें. ( ब्राह्मणाला अनुष्ठानाला बसविलें किंवा वाजंत्र्यांनीं लग्नाचे वेळीं वाजविण्याचें ठरलें म्हणजे करार झाला, नेमणूक झाली, आतां फिरणार नाहीं, असें सूचित करण्यासाठीं यजमानानें त्यांना सुपारी द्यावी अशी चाल आहे. ) To appoint.

सूप फडफडणें–वाजणें– विवाहादि समारंभाची समाप्ति होणें. (विवाहसमारंभ आटपला व मांडवपरतणें होऊन व्याही मंडळी परतली ह्मणजे सूप घेऊन फडफड वाजविण्याची चाल कांहीं जातींत आहे, त्यावरून हा संप्र० निघाला आहे. )

सोनें होणें–मृत्यूनंतर सुखधामाला जाणें, उत्तम गति प्राप्त होणें. To attain unto a happy state after death.

रामभाऊची आई सवाष्ण वारली, सोनें झालें.

सोमवती घालणें– सोमवारीं अमावास्या आली ह्मणजे तिला सोमवती अमावास्या ह्मणतात. त्या दिवशीं वाचका फळें वगैरेंची सोमवती घालतात ह्मणजे १०८ फळें ब्राह्मणांना देतात. यावरून पुष्कळ संख्या असणें हा अर्थ.

तुला दोन टोप्या अगोदरच आहेत. आणखी एक कशाला घेतलीस ? टोप्यांची काय सोमवती घालावयाची आहे ?

सोक्षमोक्ष होणें–निकालाला लागणें. Final settlement of a pending matter.

स्वतः मेल्यावांचून स्वर्ग दिसत नाहीं– स्वतः अनुभवल्यावांचून एकाद्या गोष्टीची पूर्ण कल्पना येत नाहीं; किंवा अगोदर झीज सोसल्याशिवाय–कष्ट भोगल्याशिवाय–सुखाचा लाभ होत नाहीं. असाही अर्थ कित्येक करतात.

स्वर (सूर) वाहणें—कित्येक लोक कोणतेही कार्यास हात घालतांना कोणत्या नाकपुडींतून स्वर वाहतो व तो कार्यास अनुकूल आहे कां प्रतिकूल आहे हें पहात असतात. यावरून अनुकूल मत होणें हा अर्थ. To incline or lean unto.

स्वर्गास हात पोंचणें—कृतकृत्यता वाटणें—(स्वर्ग हातीं आल्यावर मग आणखी मिळवावयाचें तें काय राहिलें ?) To attain some superlative good.

स्वर्गीं ध्वज लावणें—महत्कृत्य करणें. To perform a mighty exploit.

स्वाहा करणें—यज्ञांत-होमकुंडांत आहुति टाकतांना मंत्र म्हणतात त्यांत देवतेचें नांव असून शेवटीं 'स्वाहा' अशीं अक्षरें असतात. त्यावरून स्वाहा करणें म्ह० घशांत टाकणें, गिळंकृत करणें. To swallow; to gulp down.

समुद्रांत जाऊन कोरडा—१. श्रीमंतींत किंवा अनुकूल परिस्थितींत राहून ज्यानें स्वतःचा कांहींच फायदा करून घेतला नाहीं असा दुर्दैवी प्राणी; २. अन्याय केला असून आपण निर्दोषी व निरपराधी आहों असें म्हणणारा.

संन्याशाची पुडी—संन्याशानें पुडीसारखा अल्पाहार करावा असें शास्त्र सांगतें. त्यावरून संन्याशाचें जेवण. The meal of a Sanyasi.

सरूपता मुक्ति मिळणें—चतुर्विध मुक्तींपैकीं सरूपता म्हणजे ईश्वरसदृशरूप प्राप्त होणें ही एक मुक्ति सांगितली आहे. यावरून तद्रूप होणें हा अर्थ. To be assimilated.

इंग्रेजीच्या सहवासानें मराठी भाषेला सरूपता मुक्तिच मिळाल्यावर तिचा आधींचा देह कोठें राहिला ? —निबंधमाला.

सांगून येणें—मुलगी करतां कां असें विचारणें. To be offered in marriage.

साडेसाती—दुर्दैवाचा फेरा, वाईट वेळ. शनीची पीडा साडेसात वर्षें असते व तेवढ्या वेळांत फार दुःखें भोगावीं लागतात, अशी समजूत आहे. त्यावरून 'साडेसाती' म्हणजे वाईट वेळ असा अर्थ प्रचारांत आला आहे.

साप ह्मणून दोरखंड झोडपणें—एखाद्यावर निष्कारण आळ घेऊन शिक्षा करणें. *cf*. साप म्हणून भुई धोपटणें-वडविणें.

पण उगीच साप ह्मणून दोरखंड झोडपण्यांत काय अर्थ! —फाल्गुनराव.

सुतानें स्वर्गास जाणें—स्वर्ग ह्मणजे अतिशय उंच जागा आणि सूत अगदीं बारीक, पण युक्तीच्या माणसाला तें सुद्धां स्वर्गास जाण्याचें साधन बनवितां येतें. यावरून एखाद्या विषयाचा यत्किंचित् अंश समजला म्हणजे बुद्धिमान् मनुष्य आपल्या बुद्धिबलानें तो सारा विषय समजून घेतो हा अर्थ. *cf*. ता ह्म॰ ताकभात ओळखणें. To tell the tune upon hearing a string sounded.

हळकुंडासाठीं लग्न मोडणें— हळकुंड ह्मणजे अगदीं क्षुद्र किंमतीचा पदार्थ. यावरून थोड्यासाठीं लग्नाचा करार मोडणें, अर्थात् थोडक्यासाठीं मोठाले बेत फिसकविणें.

हळद लागणें—विवाहसंस्काराचे वेळीं वधू आणि वर या दोघांस प्रथम हळद लावून अभ्यंगस्नान घालतात. यावरून विवाह होणें असा अर्थ.

हायदोस घालणें – मुसलमान लोक मोहरमाचे दिवसांत ताबुताचे पुढें 'हायदोस्त दुल्ला' असें म्हणून दुःखोद्गार काढून नाचत असतात. त्यावरून नाचणें, ओरडणें हा अर्थ. To raise an uproar.

होळीचे होळकर— शिमग्याचे दिवसांत उत्साहानें खेळणारे गडी; घाणेरडे आणि अव्यवस्थित लोक. सटरफटर छंदी लोक. Dirty and disorderly fellows.

होळी होणें—करणें— जाळून टाकणें; नाश करणें.

'सदा राम रामनामावळी। पापतापां होय होळी।
नामासरसी वाजे टाळी। महापाप होय होळी॥'

—एकनाथ.

———

# प्रकरण सातवें.

## खेळांसंबंधाचे संप्रदाय.

अळीमिळी गूपचिळी– गुप्तपणानें केलेलें एखादें काम. ( सर्वांनीं गुपचिप बसावें असें जेव्हां वाटतें तेव्हां मुलें आपापसांत 'अळी०' ह्मणून गप बसण्याबद्दलची प्रतिज्ञा करतात व जो ती मोडील त्याची छीः थू होते. ) Dead silence.

आखाड्यांत उतरणें– मल्लांची कुस्ती करण्याची जी जागा तो आखाडा. त्यावरून आ० ह्मणजे लढण्यास किंवा वादविवादास तयार होणें हा अर्थ. To enter the lists.

इरेस घालणें– बुद्धिबळाचे खेळांत राजास दुसऱ्याच्या मोहऱ्याचा शह न लागूं पडावा ह्मणून मध्येंच आपलें एक मोहरें अथवा प्यादें देणें; किल्ल्याचा वगैरे दरवाजा फोडतांना त्याला असलले लांब लांब खिळे हत्तीच्या धडकेबरोबर त्याच्या कपाळांत शिरूं नये ह्मणून प्रथम रोडकासा उंट मध्यें घालीत, त्यासही इ० ह्मणत. To sacrifice one in order to extricate oneself from some difficulty.

इरेस पडणें– ( इरेस घालणें पहा ) पुढें होणें.

संभाजीराव मिशींत पीळ भरून आपल्या लोकांस दम देत देत पुढें चालला...याप्रमाणें इरेस पडून संभाजीराव पुढें सरकण्याबरोबर त्याच्या फौजेस नवी ईर्षा उत्पन्न झाली. – संभाजी.

उखाळ्यापाखाळ्या काढणें– एकमेकांचीं बरींवाईट कृत्यें बोलून दाखविणें; एकमेकांशीं छिद्रान्वेषीपणा करणें. To hold up one's foibles to ridicule; to rake up old animosities.

उचलबांगडी करणें– यांत बांगडी हा शब्द 'पांगडी' शब्दाचा अपभ्रंश आहे. पांगडी ह्मणजे कोळ्याचें मासे धरण्याचें जाळें. कोळी जाळें पसरून मासे आंत आले ह्मणजे तें उचलतो. हें जाळें मोठें असलें ह्मणजे तें

दोघे चौघे मिळून सर्व बाजूंनीं एकदम उचलतात; किंवा एखाद्या मुलाच्या मनांत जावयाचें नसलें ह्मणजे बाकीचीं मुलें कांहीं डोक्याकडे व कांहीं पायांकडे होऊन एकदम त्याला उचलतात. त्यावरून पुष्कळजण मिळून बलात्कारानें एखाद्याला त्याच्या स्थलावरून काढणें अशा अर्थी त्याचा उपयोग करूं लागले. To turn out forcibly.

**कळसूत्री बाहुलें**— बाहुल्यांचे अवयव जसे पाहिजेत तसे फिरावे म्हणून युक्तीनें त्यांच्या अंगांत तारा नेलेल्या असतात, त्या तारांच्या योगानें त्या बाहुल्यांला हवें तसें नाचवितां येतें. यावरून दुसऱ्याच्या हुकुमानुरूप बाहुल्याप्रमाणें वागणारीं माणसें हा अर्थ. Puppets.

त्यांनीं नुसता हुकूम केला कीं पुरे ! कळसूत्री बाहुल्यांप्रमाणें आह्मी ते सांगतील तें सर्व करतों. —पण लक्षांत०

**कागदी घोडे नाचविणें**— मुलें रात्रीं पडद्यावर प्रकाश पाडून त्यावर नाचणाऱ्या कागदी घोड्याची सावली पाडण्याचा खेळ दाखवीत असतात. त्यावरून कागदोपत्रीं हव्या तशा गोष्टी लिहावयाच्या, पण प्रत्यक्ष मात्र कांहीं करावयाचें नाहीं अशा करण्याला हा सं० लावतात.

कोणतीही नवीन घटना करावयाची जबाबदारी व अधिकार सर्व इंग्रज मंत्रिमंडळाकडेच असल्यानें आयरिश लोकांनीं संघटनेचे कागदी घोडे नाचवून तरी काय उपयोग ? —आयर्लंदचा इतिहास.

**कुरघोडी करणें**— कुरघोडी हा मुलांचा एक खेळ आहे. यांत ज्याच्यावर डाव येतो तो दुसऱ्यास पाठीवर घेण्यासाठीं वांकतो व मग दुसरा त्याच्या पाठीवर स्वार होतो. यावरून दुसऱ्यावर आपलें वर्चस्व स्थापित करणें हा अर्थ. To assert one's ascendency over.

**खो घालणें**— खोखोच्या खेळांत धांवणाऱ्या मुलाच्या मनांतून ज्याला उठवावयाचें असेल त्याला तो 'खो' म्हणून उठवितो. त्यावरून एखाद्याला अधिकारापासून भ्रष्ट करणें, एखादे कामांत विघ्न करणें असा अर्थ. To turn out; to put an obstacle in the way of.

रावांच्या मनांत आलें तर धाडतील, पण माईसाहेबांनीं मात्र खो घालूं नये ह्मणजे झालं. —पण लक्षांत०

**गडी फू करणें**—( मुलांच्या मनांतून एखाद्याशीं मैत्री ठेवावयाची नसली ह्मणजे तीं त्या मुलाचें नांव घेऊन फू फू फू असें तीनदां उच्चारतात. त्यावरून मैत्री तोडणें हा अर्थ. To dissolve friendship.

येम, तुझें मी मोतीं ओंवून द्यायचा नाहीं, आणखी गडी फू करीन बरं का !

—पण लक्षांत.

**गणेशटोपी घालणें**— मुलें खेळतांना अमक्यानें मारलें असें न कळावें म्हणून एखाद्या मुलाच्या डोक्यावर आच्छादन घालतात व मग धोतराचा कोडगा करून बडवतात ती क्रिया.

**गुलदस्तांत ठेवणें**— राखून ठेवणें. ( गंजिफाच्या खेळांतला हा संप्रदाय आहे. )

**चीत करणें**— कुस्तींत पराभव करून उताणा पाडणें. To defeat a combatant.

**छक्केपंजे ओळखणें**— छक्के आणि पंजे ह्मणजे पत्त्याच्या डावांतलीं सहा व पांच ठिपके असलेलीं पानें. यावरून पत्त्याच्या खेळांतल्या युक्त्या व पुढें सामान्यत्वेंकरून युक्त्या असा अर्थ. Artifices ; devices.

नशांतून सदाशिव पडला गरीब. त्याला तुमचे छक्केपंजे कसे ओळखतां यावेत ?

**झक मारणें**— झक (झष=मासा); ते मारणें = मासे मारणें; रिकामटेंकडा उद्योग करणें; यावरून मूर्खपणा करणें. To act like a fool.

**झक मारीत करणें**— इच्छा असो नसो करणें. To do a thing willy-nilly.

**टिवल्याबाव्हल्या करणें**— बाहुलीसारखें नटणें, मुरडणें, डोळ मिरविणें, उनाडकी करणें वगैरे. To act wildly and loosely.

**डाव साधणें**— जिंकणें. To win in the contest.

**तिरगी मिरगीवर येणें**— अरे तुरे करूं लागणें, मारामारीवर येणें. To begin to thee and thou.

**धुमश्चक्री घालणें-करणें**— धुमश्चक्री म्हणजे खिचड. ती घालणें म्हणजे गर्दी करून एकमेकांस मारणें, गोंधळ करणें, दांडगाई करणें. To be at one's romps.

**पगडा बसविणें**— सोंगट्यांच्या खेळांत कांहीं विवक्षित दान पडलें म्हणजे एक नरद पटावर बसविण्याचा हक्क मिळतो. त्याला पगडें बसणें असें म्हणतात. पगडें बसलें म्हणजे विरुद्ध पक्षावर आपला जोर अधिक चालतो; यावरून छाप पाडणें, प्रतिष्ठा मिळविणें हा अर्थ. To establish one's influence over.

इंग्रजीसारख्या प्रबल परभाषेचा मराठीवर अगदीं पगडा बसून तिचें स्वत्व नष्ट होण्याच्या बेतांत आहे. —निबंधमाला.

**पिंगा घालणें**— हा मुलींचा एक खेळ आहे. यांत गरगर फिरावयाचें असतें. यावरून फिरत रहाणें हा अर्थ.

नका घालूं पिंगा गे। तुम्ही रामरंगीं रंगा गे॥ —एकनाथ.

गंगानदीपलीकडे त्या लुंगाहीन कंगालांनीं...पिंगा घालून... चंगळ मांडली होती. —हिंदुस्थानकथारस.

मी बायल्या होऊन मुंग्याप्रमाणें तिच्या भोंवतीं पिंगा घालायला लागलों. —फाल्गुनराव.

**पेंचांत धरणें**— कुस्तीच्या खेळांत दुसऱ्याला पाडण्याच्या ज्या युक्त्या असतात त्यांना पेंच म्हणतात. त्यावरून पें० म्हणजे निसटतां येऊं नये अशा रीतीनें एखाद्याला अडचणींत धरणें. To hold one in a fix or scrape.

**पोबारा किंवा पववारा करणें**— (पव = एक) तिफाशी खेळांत दोन फाशांवर प्रत्येकीं सहा सहा ठिपके व एकावर एक ठिपका असें दान पडलें म्हणजे त्याला पोबारा म्हणतात. या दानानें नरद दूर जाते. यावरून पोबारा करणें म्ह० पळून जाणें हा अर्थ. To make off; to run away.

**फासा टाकून पहाणें**— (फाशाच्या खेळांतला हा संप्रदाय आहे.) धाडस करून पहाणें. To make an adventure; to try one's luck.

**फासा सोंईचा पडणें**— (फाशानें आपणांस पाहिजे तें दान पडणें) अनुकूल गोष्ट घडणें; याच्या उलट फासा उलटा पडणें— प्रतिकूल गोष्ट घडणें.

**भाकरीचा खेळ**— मुलांचा एक खेळ आहे. यांत दगडाच्या चिपा पाण्याच्या पृष्ठभागावरून अशा रीतीनें फेंकतात कीं, त्या कांहीं ठिकाणीं

पाण्याला स्पर्श करितात व कांहीं ठिकाणीं स्पर्श न करतां जातात. जितक्या ठिकाणीं स्पर्श केला असेल तितक्या भाकरी खाल्ल्या म्हणतात. यावरून उधळपट्टीचा खर्च असा अर्थ निघतो. Playing Ducks and Drakes.

**मात करणें**–बुद्धिबळाच्या खेळांत शत्रूच्या हातीं घोडा वगैरेंनीं राजाचा प्रतिबंध केला असतां डाव होतो ती मात. यावरून, एखादें अचाट कृत्य करणें हा अर्थ. To make a wonderful achievement.

**मागून आलेलें लोण पुढें पोंचविणें**–आट्यापाट्याच्या खेळांत एखादा गडी सगळ्या पाट्यांतून पार जाऊन परत येण्यास निघाला ह्मणजे तो लोण घेऊन येऊं लागला असें म्हणतात. यावरून मागून आलेली चाल पुढें चालविणें हा अर्थ.

जे आपले आचारविचारांच्या कसोटीला लावीत नाहींत...... ते गाढ विश्वासशृंखलांनीं निगडित झाल्यामुळें मागून आलेलें लोण डोळे मिटून पुढें पोंचविणें एवढेंच आपलें कर्तव्य समजतात. –आगरकर.

**शह देणें**–बुद्धिबळाच्या खेळांत ज्या पगापासून आपल्या गतीनें राजावर उडी पडावी त्या पगीं दुसऱ्याचें मोहरें ( प्यादें ) आलें असतां त्याचा जो वेध राजास लागतो त्याला शह ह्मणतात. यावरून एखादा लाभ करून घेण्यासाठीं संधान लावून वसणें हा अर्थ. To await one's opportunity.

**सूर्याचीं पिलें दाखविणें**–एखाद्याच्या दोन्ही कानशिलांवर हातांनीं जोरानें दाबून तसेंच त्याला उचलणें; तसें केल्यानें उचललेल्या माणसाच्या डोळ्यासमोर काजवे ( सूर्याचीं पिलें ह्मणजे लहान लहान सूर्य ) दिसूं लागतात. To show London.

**हमरीतुमरीवर येणें–करणें**–भांडण करूं लागणें, एकेरीवर येणें. To thee and thou.

आपलें कार्य जर साधून घ्यावयाचें असेल तर त्या कार्यसाधकाशीं सलोख्यानें वागणें यांत शहाणपणा आहे कीं, त्याशीं नेहमीं हमरीतुमरी करणें हा शहाणपणाचा मार्ग आहे ? –नि० मा०

**हुतुतु घालणें**–हुतुतु हा मुलांचा एक खेळ आहे. त्यांत हुतुतु असें तोंडानें ओरडत जावयाचें असतें. त्यावरून आरडणेंओरडणें व दांडगाई करणें हा अर्थ. To be boisterous.

# प्रकरण आठवें.

## व्यापारधंदा वगैरेसंबंधाचे संप्रदाय.

अन्नास लावणें— उदरनिर्वाहाचें साधन मिळवून देणें—नोकरीला लावणें. To provide for ; to employ.

अव्यापारेषु व्यापार करणें— आपला ज्यांत संबंध नाहीं अशा भानगडी करीत बसणें. To meddle with affairs not one's own.

सरकारी शाळांची कशी काय व्यवस्था असते व तेथील विद्याभ्यासाच्या मानानें कोणत्या तऱ्हेचीं पुस्तकें तेथें चालणें जरूर आहे याविषयीं या पुस्तकांत उठाठेव करणें म्हणजे 'अव्यापरेषु व्यापार' होणार. —नि० मा०

आंतबट्ट्याचा व्यापार— सारखा तोटा सोसून करावा लागणारा व्यापार.

हिराचंदाच्या बाहेरच्या भपक्यामुळें त्याची पत व्यापारी लोकांत अद्याप कायम होती. पण असला आंतबट्ट्याचा व्यापार किती दिवस चालणार ? लवकरच भ्रमाचा भोंपळा फुटला !

आंधळा कारभार— अंदाधुंदीचा कारभार.

इंगा फिरणें— कातडें घोटावयाचें चांभाराचें एक हत्यार असतें त्याला इंगा ह्मणतात. यावरून इंगा फिरणें म्हणजे गर्वाचा परिहार होण्याजोग्या एखाद्या अडचणींत सांपडणें हा अर्थ. To be humbled and subdued by adversities.

इमानास जागणें— इमान कायम ठेवणें.

इळा ( विळा ) मोडून खिळा करणें— खिळ्यापेक्षां विळ्याला अधिक किंमत पडते यावरून अधिक किंमतीचा जिन्नस थोडक्याशा लाभाकरितां हातचा घालवून नुकसान करून घेणें असा अर्थ. To be penny-wise and pound-foolish.

उभ्या बाजारांत— सर्व बाजारांत; सर्वांदेखत. Before the whole public.

**ओलीकोरडी भाकर**– ओली किंवा कोरडी–मिळेल तशी–भाकर.

प्रामाणिकपणानें मिळविलेल्या ओल्याकोरड्या भाकरीला जी रुचि असते ती दुसऱ्याचे मिंधे होऊन मिळविलेल्या पक्वान्नाला नसते. –नि० चं०

**कलम करणें**– छाटून टाकणें. कोणत्याही झाडाचें कलम करतांना त्याची एक फांदी छाटावी लागते. त्यावरून ही म्हण प्रचारांत आली आहे. कलम हा शब्द फारशी आहे.

हें (गणपत कृष्णाजीचें) पंचांग वर्तविणारे (शिंपी जातीचे) ज्योतिषी व त्याचे पुरस्कर्ते यांचे आमच्या कर्मठ राजांचे कारकीर्दींत खचित हात कलम केले असते. –वि० ज्ञा० वि०

**कसास लागणें**– कस म्ह० सोन्याच्या ठायीं रंगरूप जो गुण असतो त्याची परीक्षा करणें. यावरून एखाद्याची परीक्षा होणें हा अर्थ. To stand a test.

**खातेंपोतें बरोबर होणें–रमारमी होणें**– उत्पन्न व खर्च सारखां होणें. देणें घेणें सारखें असणें. ( खातें = दुसऱ्याचें देणें घेणें. पोतें = खजिना. ) A well-balanced account.

**खुशीचा सवदा**– वाटल्यास करावें, न वाटल्यास न करावें, असें काम.

अमक्याला इतकें जास्त कां आणि मला इतकें कमी कां हें तूं कोण विचारणार ? त्याला जास्त देऊं किंवा कमी देऊं. तो आमच्या खुशीचा सवदा आहे.

**गेला बाजार तरी**– बाजार होऊन गेल्यावर विकला तरी; किमानपक्ष. At the lowest.

**घागरगडचा सुभा**– सुभा म्हणजे जिल्हाधिकारी. घागरगड हें नांव विनोदानें पाणी वहाण्याच्या घागरीला दिलेलें आहे. त्यावरून पाणी भरण्याचें काम असा अर्थ.

**चांदी उडणें**– त्रेधा होणें.

अलीकडे माझ्या पाठीमागें असे लोक लागले आहेत कीं त्यांच्यामुळें माझी चांदीच उडत आहे. –विकारवि०

**चालता बोलता**– मूर्तिमंत.

टके शेर– टका या शब्दाचा अर्थ संदर्भाप्रमाणें कोठें पैसा, कोठें आणा, आणि कोठें रुपया असाही होतो. येथें पैसा असा आहे. टके शेर= पैसा शेर; फार स्वस्त. 'टके शेर भाज्या, टके शेर खाजा' (म्ह० मिठाई). सर्व जिनसांचा एकच भाव. भेदाभेद नसणें.

टाकी चालविणें– क्रम चालविणें; पुनः पुनः तीच ती गोष्ट करणें.

रशियानें राष्ट्रविस्ताराची व प्रांतविस्ताराची सारखी टाकी चालविली आहे. –के०

डल्ला मारणें– एखाद्याच्या द्रव्यावर हात मारणें. To lay hands upon the property of.

तरतें कूळ– ज्याला कर्ज दिलें असतां तें बुडणार नाहीं अशी खात्री असते असें कूळ.

तुंबडी भरणें– तुंबडी म्ह० लहानसा भोंपळा. भिक्षापात्र; तुंबडी भरून भिक्षा मिळाली म्हणजे पुष्कळ होते. यावरून स्वतःचा फायदा करून घेणें हा अर्थ. To fill one's coffers.

मुक्या जनावराच्या तोंडांतलें काढून तूं आपली तुंबडी भरलीस, त्याचें पातक कोठें रे फेडशील? –रंगराव.

तोलास तोल देणें– बरोबरी करणें. To vie with; to emulate.

तोळामासा प्रकृति– अगदीं थोडा फरक झाला असतां जी बिघडते अशी प्रकृति. An extremely delicate constitution.

दौलतीचा खांब– ज्याच्या दैवानें सर्वांस दौलत भोगावयास सांपडते असा पुरुष.

धार काढणें– गाई म्हशींचें दूध काढणें. To milk.

धारवाडी कांटा– बरोबर तोलाचा कांटा. A correct or accurate balance.

टीकाकाराच्या हातांत नेहमीं धारवाडी कांटा असला पाहिजे. –नि० मा०

नीळ नासणें– निळीचा रंग बिघडला असतां खोटी बातमी उठवावी म्हणजे रंग चांगला होतो अशी लोकांची समजूत आहे. यावरून नीळ नासणें म्हणजे खोटी बातमी उठविणें हा अर्थ.

पगडी फिरविणें— करार मोडणें. सामोपचार सोडून विरोधास प्रवृत्त होणें. To recede from an engagement; to turn upon angrily.

पडता काळ— वाईट वेळ; आपत्तीची वेळ. कोणत्याही कार्यांत यश येतें नाहींसें झालें म्हणजे त्याचा 'पडता काळ' आहे असें म्हणतात. (याच्या उलट

चालता काळ— चांगली वेळ. भरभराटीचा काळ. हातीं घेतलेल्या कामांत सारखें यश येत गेलें ह्मणजे त्याचा 'चालता काळ' आहे असें म्हणतात.
"वा! तुझा चालता काळ। खायाला मिळती सकळ॥" —अमृतराय.)

पदरमोड करणें— पूर्वीं मिळवून ठेवलेल्यापैकीं खर्च करणें. To live upon one's previous stock or resources.

पदरीं माप घालणें— खात्री करून देणें. To force conviction upon.

(दुसऱ्याचें) पागोटें घेणें— स्वतः न फसतां दुसऱ्यास फसविणें.

पायलीचे पंधरा— फार स्वस्त; ज्याला फारशी किंमत (महत्त्व) नाहीं असें; क्षुद्र. Insignificant.

पारडें फिरणें किंवा फिरविणें— तराजूच्या दोन पारड्यांपैकीं ज्यांत जास्त वजन असतें तें खालीं बसतें. पारडें फिरणें म्ह० खालीं असेल तें वर जाणें व वरचें खालीं येणें. यावरून सगळी स्थिति विपरीत होणें हा अर्थ. To turn the scales.

आतां नाहीं ही आपली बोलण्याची सोय! आतां हें सगळें पारडें आपल्यावर फिरलें. —पण लक्षांत०

पासंगास न पुरणें—न लागणें— तराजू, कांटा इत्यादिकांच्या दोन पारड्यांत विषमपणा असल्यास तो घालवून तीं सम करण्यासाठीं हलक्या पारड्यांत जें वजन घालतात तें. त्यालासुद्धां न पुरणें म्ह० फारच कमी—हलकें—असणें. To be incomparably inferior to.

मोट बांधणें— एखाद्याच्या इच्छेविरुद्ध एखाद्या कार्यास प्रवृत्त करणें. To compel a person willy-nilly.

रुपेरी बिडी— नोकरी, चाकरी. चाकरी करणाऱ्या माणसाचें स्वातंत्र्य मर्यादित केलेलें असतें तें त्याच्या पगाराच्या शृंखलेनें, हा अर्थ. The fetters of service.

लेखणीचा धड— कलमबहादुर; कुशल लेखक. A superexcellent writer.

वकीलपत्र घेणें— एखाद्याच्या बाजूनें किंवा त्याच्या पक्षाचीं अनुकूल प्रमाणें देऊन वाद करणें.

वाऱ्याची मोट बांधणें— चारी दिशांचा वारा गोळा करून त्याची एक मोट बांधण्याचें काम जसें कठीण तसेंच जें ताब्यांत आणण्यास कठिण अशा कार्याला प्रवृत्त होणें हा अर्थ. To attempt to confine that which spurns control.

विल्हेस किंवा विल्हेवाट लावणें— निकालांत काढणें. To dispose of.

हजीर तो वजीर— जो वेळेवर हजर राहील त्याचा फायदा होईल. First come, first served.

---

# प्रकरण नववें.

## भांडणादि व्यापारांवरून झालेले संप्रदाय.

**आग लावणें**– भांडण लावून देणें. To set persons by the ears.

'या कारटीनेंच आग लावून दिली असेल. ही मोठी चोमडी आहे' असे आजोबांच्या तोंडचे शब्द माझ्या कानीं पडले. –पण लक्षांत॰

**आग्यावेताळ**– ही एक पिशाचाची जात आहे. याचें सगळें शरीर आगीच्या रूपाचें असतें. यावरून स्वभावानें तापट मनुष्य हा अर्थ.

रामकृष्णपंतदादा ह्मणजे नुसते आग्यावेताळ आहेत. त्यांना मुलाचे हे चाळे खपावयाचे नाहींत.

**आगींत तेल ओतणें**– बोलून किंवा कृतीनें अगोदर झालेल्या भांडणांत भर टाकणें. To add fuel to the fire.

**उभा दावा**– अतिशय व कायमचें वैर. A standing feud.

**कणीक तिंबणें**– पोळ्या करण्यासाठीं अगोदर कणीक चांगली मुठीचा जोर लावून मळावी लागते त्याला तिंबणें ह्मणतात. यावरून मार देणें हा अर्थ. To beat soundly; to drub.

तुझी कणीक चांगली तिंबून काढीन. –गुप्तमंजूष.

**कळ लावणें**– [ कळ = कलि ( कलह ) ] भांडण लावणें हा अर्थ. To set people by the ears.

तिनें घरांतल्या घरांत बारीक कळ लावण्यास अगोदरच प्रारंभ केला होता. –रंगराव.

**कांट्यानें कांटा काढणें**– एका दुष्टाच्या हातून परभारें दुसऱ्या दुष्टाचें शासन होईल असें करणें. To employ one hateful person to destroy another.

**कुभांड रचणें**– निर्मूळ किंवा रचलेली गोष्ट अथवा घेतलेला आळ तें कुभांड. To bring a false accusation.

त्यानें निराळेंच कुभांड रचून बादशहाचे मनांत भरवून दिलें. –उषःकाल

खरवड काढणें— भांड्यांत दूध तापवितांना त्याच्याखालीं अधिक जाळ लागला असतां त्या दुधाचा कांहीं अंश (जळ) भांड्याच्या बुडाला चिकटून बसतो त्याला खरवड ह्मणतात. ती खरडून काढावी लागते. यावरून खर० ह्म० कटु भाषणानें एखाद्याचा समाचार घेणें. To abuse and scold one coarsely.

खाजवून खरूज काढणें— बळेंच भांडण उत्पन्न करणें. To provoke a quarrel.

रखमाबाईला उमाबाईशीं खाजवून खरूज काढून भांडत बसण्यावांचून कांहीं अडलें होतें ?

खुंटी पिरगाळणें— वीणा लावून ठेविली असतां मध्येंच एखाद्यानें खुंटी पिरगाळली ह्मणजे विण्याचा आवाज बेसुर होतो. त्यावरून कोणा एखाद्याचें काय दुसऱ्याचे हातून होत असतां मध्यें जाऊन त्यांत विघ्न करणें अथवा त्या दोघांत कलह लावून देणें असा अर्थ. एखाद्याचें मन वळवून आपणांस त्याची अनुकूलता मिळविणें असाही अर्थ होतो. To mar one's prospects; to win over.

खोड मोडणें— एखाद्यास लागलेली वाईट संवय जाईल असें एखाद्या तीव्र उपायानें करणें. To chastise; to take the vice out of.

गचांडी देणें— (अर्धचंद्र देणें याखालीं पहा.)

गमजे (गमजा) चालविणें— मर्यादा सोडून वर्तन करणें; चेष्टा किंवा खेळ करणें.

समजावेंचि, परि न त्या यमधर्मवरीचे तत्व तें समजे।
सज्ज्ञानी सत्करुणेवांचुनि मनिंचे न चालती गमजे ॥

—मोरोपंत.

गुण्यागोविंदानें— शांततेनें, न भांडतां सबरतां. Amicably, peacefully.

जिव्हाळीं लागणें— मर्माचा भेद करणें; जिवाला लागून रहाणें. To touch one to the quick.

तिरपीट उडणें— त्रेधा उडणें, गोंधळून जाणें. (तिरपीट=त्रिपथ. वामनावतारीं बळीनें त्रिपाद्भूमि दिल्याचें उदक सोडल्यावर वामनरूपी विष्णूनें

तिन्ही लोकांना व्यापून टाकणारें विराटस्वरूप दाखविलें तेव्हां बली घाबरला या कथेशीं या सं०चा संबंध आहे. ) To be bewildered.

'तूं खरं सांगितलंस तर बरं, नाहीं तर मी तुला पोलिसांत गुदरून देईन ' इतकें दरडावल्यावर मग काय विचारतां ? पंड्याजीची तिरपीटच उडाली. —जग हें०

तिळपापड होणें— अंगाचा संताप होणें.

हें त्याचें चहाटळपणाचें बोलणें ऐकून माझ्या अंगाचा तर असा तिळपापड झाला कीं कांहीं पुसूं नये. —पण लक्ष्यांत०

तुटून पडणें— १ बेफामपणानें एखाद्याच्या अंगावर चालून जाणें; २ जोरानें कामास लागणें. 1 To attack; 2 To set to work with determination and vigour.

मराठ्यांची फौज निजामाच्या लष्करावर इतकी निकरानें तुटून पडली कीं, मोगल फौजेस ताबडतोब औरंगाबादेकडे पळ काढावा लागला.

धूळ चारणें— (धुळीस तोंड लागेल अशा रीतीनें एखाद्यास चीत करणें.) पूर्ण पराभव किंवा मानभंग करणें. To make one kiss the dust.

नांगी टाकणें— विंचवाचें जेव्हां कांहीं चालेनासें होतें तेव्हां तो नांगी खालीं करतो. यावरून हतवीर्य होणें, हातपाय गाळणें हा अर्थ. To lower one's crest.

अगोदरच्या त्याच्या फुशारक्या केवढ्या ! जसें कांहीं कोणी ह्मणेल कीं राजा याच्या मुठींत आहे ! पण दरबारला नुसतें बोलावणें येतांच आतां आपली धडगत नाहीं असें पाहून त्यानें नांगी टाकली. —नाट्यकथार्णव.

निमित्तास टेंकणें— एखादें काम बिघडावें ह्मणून निमित्त ( स्वल्प कारण ) शोधणें. To seek an occasion.

हं हं ! त्याच्याशीं अगदीं बोलूं नका ! स्वारी काय अगदीं निमित्ताला टेंकली आहे. तुह्मी एखादा शब्द बोलल्याबरोबर लागलींच वाजंत्री सुरू होतील.

पड घेणें— माघार घेणें; हार खाणें. To withdraw from a contest.

कालच्या भांडणांत गोविंदरावांनीं पड घेतली नसती तर शेवटीं मोठा अनर्थ झाला असता.

पाणी पाजणें— पराजित करणें. To outwit; to overcome.

**पाण्यांत पहाणें**– अति द्वेष करणें. (अतिशय द्वेष्य पुरुष आपणांस जलीं, स्थलीं सर्वत्र दिसूं लागतो. यावरून हा सं० निघाला.) To hate one bitterly.

नारेला तिची सावत्र आई नित्य पाण्यांत पहात असे. –निबंधमाला.

**पालथा घालणें**– १ धुंडाळणें, शोधणें.

२ पराजित करणें. (उदा० त्यानें शत्रूला चांगला पालथा घातला.)

आपण शोधीत असलेली वस्तु जवळच कोठें अचानक सांपडली म्हणजे आपलें आपणालाच आश्चर्य वाटूं लागतें कीं, इतकी जवळ असून विनाकारण सारा गांव पालथा घातला! –पण लक्षांत०

**पाळतीवर असणें**– एखाद्याला न कळूं देतां त्याच्या हालचालीवर बारीक रीतीनें गुप्तपणें नजर ठेवणें. To watch one's movements.

ते ह्मणाले:–अहमद, तूं माझ्या पाळतीवर आहेस कीं काय? –उषःकाल.

**पित्त उसळणें–खवळणें**– संताप होणें.

सत्पात्रीं त्याग याचा अगुण नुरवि हें नेणती मूढचित्त।
व्यर्थ क्लेशीच होती ह्मणुनि उसळतें सज्जनाचेंहि पित्त॥

–मोरोपंत.

**बांगड्या भरणें**– पुरुषांनीं स्त्रियांसारखा नामर्दपणा दाखविणें. To show weakness or effeminacy; to put on a petticoat.

कायरे! शत्रु धडधडीत तुमच्या छातीवर पाय देऊन उभा असतां तुह्मी नुसते एकमेकांच्या तोंडाकडे पहात उभे आहां. तेव्हां तुह्मी आज बांगड्या भरून आलां आहां कीं काय तें एकदांचें कळूं द्या. –नाट्यकथा०

**बार उडविणें**– बंदुकींत दारूगोळी घालून ती उडविली ह्मणजे कार्यभाग संपला. कारण, गोळी लागून मनुष्य मरावयाचाच. यावरून कार्यभाग करून टाकणें हा अर्थ. To accomplish.

आयत्या वेळीं तो आला तर वाहवा, नाहींतर आह्मीच टेवूं देवक, आणखी टाकूं बार उडवून! –पण लक्षांत०

**बिब्बा घालणें**– काम बिघडविणें. To spoil; to obstruct *cf*. फुली घालणें.

अरे! हा काय प्रकार सांगतोस तूं! खचित कोणीं तरी दुष्टानें मध्यें बिब्बा घातला आहे! –अतिपीडचरित.

**मांग शिरणें**– मांगाला फांशीं देण्याचें काम करावयाचें असनें. त्यामुळें त्याचे अंगीं स्वाभाविकपणें निष्ठुरता असते. यावरून अंगांत मां० ह्मणजे निष्ठुर होणें, रागावणें असा अर्थ.

**मिरच्या लागणें–झोंबणें**– चरफडणें. To take a thing to heart.

त्या मोहरांचें नांव काढतांच स्वारीच्या अंगाला कशा मिरच्या लागल्या!

**मूग गिळणें**– कोणीं आपला अपराध अथवा अपमान केला तरी कांहीं न बोलतां मुकाट्यानें बसणें. To bear patiently; to pocket an insult.

जो कोणी पुढाकार घेईल त्याला...कोणी कांहीं बोललें तरी मूग गिळावे लागतात. –पण लक्षांत०

**मोडशी जिरविणें**– मोडशी=अजीर्ण, अजीर्ण जिरविण्यास त्या माणसाकडून खूप मेहनत करून घ्यावी लागते. त्यावरून एखाद्याची चांगली खोड मोडणें हा अर्थ. To take the conceit out of; to humble.

हल्लींच्या काळीं एखादा फडक्यासारखा वेडा पीर जर कांहीं गडबड करण्यास आरंभ करील तर सरकार त्याची मोडशी एका क्षणांत जिरवील. –नि० चं०

**रग जिरविणें**– खोडकी जिरविणें; खोड मोडणें. To take the conceit out of; to humble.

**रंगणांत येणें**– घोडे फिरविण्याच्या वर्तुलाकृति जागेला रंगण ह्मणतात. यावरून रंग० म्हणजे प्रतिपक्ष्याशीं सामना करण्यास पुढें सरसावणें. To come forward boldly. To enter the arena.

**रंजक पिणें**– बंदूक, तोफ वगैरे उडविण्याचे वेळीं त्याच्या कान्यावर थोडीशी दारू घालावी लागते. तिला रंजक ह्मणतात. ती दारू पेटून बार झाला नाहीं तर बंदूक किंवा तोफ रंजक प्याली असें म्हणतात. To fail to blow up.

रडकुंडीस येणें
रडीस येणें } – आतां हा रडेल अशा स्थितीस येणें. To seem ready to burst into tears.

ती आजोबाजवळ गेली आणि अगदीं रडकुंडीस येऊन ह्मणते कीं, "लोक आतां तोंड नाहीं काढूं देत बरं का !" –पण लक्षांत०

राळ करणें– ( राळ = फटफजिती ) राळ ह्मणून डिंकासारखा पदार्थ असतो. हा फार हलका असतो. त्याची पूड करून पेटविलेल्या काकड्यावर उडविली ह्मणजे त्याच्या ज्वाळा उंच वर जातात व दुसऱ्याला घाबरवून सोडतात. यावरून घाबरवून सोडणें, फटफजिती करणें हा अर्थ.

प्रतिनिधि गोवळकोंड्याच्या किल्ल्यांत शिरले, पण तो किल्ला शिद्दीनें छापा घालून घेतला. अशी त्यानें श्रीपतराव प्रतिनिधींची राळ करून टाकली. –संभाजी.

रेंच उतरणें– पाठीच्या शिरा मोडून ती हलकी करणें हा मूळ अर्थ. त्यावरून खोड मोडणें; गर्व परिहार करणें हा अर्थ. To take the conceit out of ; to humble.

लष्करच्या भाकरी भाजणारा–निष्कारण दुसऱ्याच्या उठाठेवी करणारा. ( पूर्वी सैन्य एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं जाई त्या वेळीं त्या त्या ठिकाणच्या लोकांना शिपायांच्या भाकरी भाजण्यासाठीं लावीत. यावरून हा सं० निघाला आहे. ) To forwardly meddle with other's affairs.

पत्र धाडणारा खरोखरच जानकीबाईच्या कळवळ्याचा होता कीं......लष्करच्या भाकरी भाजणारा होता ? –रंगराव.

लांडे कारभार करणें– दुसऱ्याच्या घरच्या निष्कारण उठाठेवी करणें. An officious intermeddling with affairs not one's own.

आह्मी आपसांत भांडूं, एकमेकांच्या उरावर बसूं, पण शेजारचे कोणी शेकोजी आमच्या घरांत येऊन लांडे कारभार करावयाला लागले, कीं तें आह्मांला खपावयाचें नाहीं. –निबंधमाला.

लावालावी करणें– इकडचें तिकडे व तिकडचें इकडे सांगून कळ लावणें; कलागत उत्पन्न करणें. To excite a quarrel by means of misrepresentations.

लाही होऊन जाणें– संतापणें. To be heated or hot with rage.

लेंड्या टाकणें–गाळणें– भीतीनें गाळण उडणें. To falter; to funk.

वचपा काढणें– न्यूनाधिक भरून काढणें. To supply the deficiency or make amends for the excess.

वडाची साल पिंपळाला लावणें– एका गोष्टीचा नसता खोटा संबंध दुसऱ्या गोष्टीशीं लावणें; खऱ्याचें खोटें व खोट्याचें खरें करून सांगणें; लटपटी करणें. To lie extravagantly.

वड्याचें तेल वांग्यावर काढणें– एकावरचा राग दुसऱ्यावर काढणें. (वडे तेलांत तळीत असतात. वडे तळण्याकरितां तापविलेलें तेल आयते वेळीं बेत फिरला तर वांग्यांच्या भाजीवर फोडणी देण्याला उपयोगीं पडतें. यावरून ही ह्मण निघाली असावी.) Anger excited by one object is poured out on to another.

वणवण करीत हिंडणें– फार श्रम करीत हिंडणें. To trudge; to plod one's weary way.

वर्दळ घालणें– भांडत बसणें.

जबरदस्त परक्या सरकारच्या हातापायां पडून किंवा त्यांशीं थोडीबहुत वर्दळ घालून जेवढें प्राप्त होईल त्यांत समाधान मानलें पाहिजे. –आगरकर

वर्दळीवर येणें– हमरीतुमरीवर येणें, हातघाईवर येणें, भांडणास प्रारंभ करणें. To rise into angry extravagance.

ते दोघे बोलतां बोलतां एकदम वर्दळीवर आले.

वाट मारणें– वाटेंत गांठून लुटणें. To waylay and rob.

वाट होणें– गत किंवा परिणाम होणें. To become of.

वाटेवर येणें– योग्य मार्गाला येणें; शुद्धीवर येणें. To get into the right way.

वाटेस जाणें– खोड्या करणें. (एकजण जात आहे त्याच वाटेनें व त्याच्या बरोबरीनें दुसरा चालूं लागल्यानें एकमेकांचा धक्का एकमेकांस

लागण्याचा किंवा अन्य रीतींनीं प्रतिबंध होण्याचा संभव असतो.) To play mischief.

दौलतरावाच्या मनांत संभाजीरावाविषयीं विशेष चुरस नसती तर तो हट्टानें त्याच्या घाटेस जाता ना. —संभाजी.

वाटाण्याची अक्षत लावणें– साफ नाकारणें. To refuse; to decline.

वाटोळें होणें–करणें– सर्वस्वीं नाश होणें–करणें. (वाटोळें = शून्य. यावरून शून्यवत्–होता कीं नव्हता असा.) To be ruined–to ruin.

कलियुगाचे मुळें । झालें धर्माचें वाटोळें ॥ —नामदेव.

वाऱ्याशीं भांडणें– भांडण्याला दुसरा कोणी तरी पक्ष लागत असतो. तो नसला ह्मणजे वारा हाच त्या पक्षाचे जागीं कल्पून भांडणें, ह्म० निमित्त नसतां कांहीं तरी कारण लावून हवें त्याच्याशीं भांडणें हा अर्थ. To be exceedingly quarrelsome.

प्रति०– (एकीकडे) हा वाऱ्याशीं भांडणारा मूर्ख पट्टूचें कौशल्य दाखविण्याकरितांच माझा प्राण घेईल. —गुप्तमंजूष.

विभु रचणें– (व्यूह रचणें पहा.) To form plans.

मेकॉलेनें असें दर्शविलें आहे कीं 'बर्कनें वॉरन हेस्टिंग्जवर जो एवढा विभु रचला, तो केवळ त्याच्या राक्षसी कृत्यांचा अतिशय संताप येऊन गेल्यामुळेंच.' —निबंधमाला.

विरजण घालणें– दुधाचें दहीं व्हावें ह्मणून त्यांत जें आंबट घालतात त्याला विरजण ह्मणतात. यावरून एखादा मनुष्य उत्साहानें एखाद्या कार्याला प्रवृत्त होत असतां त्याला निरुत्साह करणें हा अर्थ. To throw cold water on.

विळ्याभोंपळ्याइतकें उजू– विळा आणि भोंपळा यांच्यांत शत्रुत्वाचा संबंध आहे. (कारण विळ्यानें भोंपळा चिरतात.) यावरून पक्का शत्रु असा अर्थ. Being at enmity with; not to be on good terms with.

आजोबांचें व त्यांचें विळ्याभोंपळ्याइतकें उजू! प्रत्यक्ष बाप पण आपलें एकदें नदे! —पण लक्षांत.

व्यूह ढांसळून टाकणें– केलेले बेत फुकट जातील असें करणें. To baffle one's deep plots.

या माझ्या मूर्ख मुलांना कांहीं सांगितलें नाहीं, तर हा माझा व्यूह ढांसळून टाकील. —गुप्तमंजूष.

व्यूह रचणें– एखाद्याच्या विरुद्ध मसलत तयार करणें. To make machinations against.

शंख करणें– ओरड करणें; बोंब मारणें. To cry bitterly against.

एवं वदोनि वंदुनि, घालुनि कुरुगुरु रणांगणीं उजवा ।
सात्यकि निघे, ह्मणे, 'कुरुभटहो ! ह्रं शंख करुनि मुख सुजवा' ॥
— मोरोपंत.

शिंतोडा टाकणें-उडविणें– कलंक लावणें; दूषित करणें. ( घाणेरड्या पाण्याच्या डबक्यांत दगड टाकला ह्मणजे थोडेंसें पाणी वर उसळून येऊन जवळ उभें राहणाराच्या अंगावर उडून त्याचें अंग व कपडे मळतात, यावरून हा अर्थ झाला. ) To involve one in a bad affair.

शिष्टाई करणें– मध्यस्थी करून भांडण मिटविणें. To mediate.

करूं जातां शिष्टाई । तरी रावण न मानील कालत्रयीं ॥

शोभा करणें– शोभा शब्दाचा मूळ अर्थ तेज; पण विपरीत लक्षणेनें फजिती करणें असा अर्थ. To disgrace.

जोंपर्यंत आपण कोणाच्या वरगुती वगैरे गोष्टी न काढतां केवळ लौकिकासंबंधानें बोलत आहों, तोंवर त्याची हवी तशी शोभा केल्यास कांहीं गुन्हा होत नाहीं.
—निबंधमाला.

शोभा होणें– विपरीत लक्षणेनें फजिती होणें हा अर्थ. To be disgraced or dishonored.

बऱ्या बोलानें चल माझ्याबरोबर, नाहींतर मी आरडाओरड करीन आणि तुझी फुकट शोभा होईल. —नाट्यकथार्णव.

संगनमत करणें– दुसऱ्यास कपटानें फसविण्याकरितां तूं असें बोल, मी असें बोलेन, अशा प्रकारें परस्परांशीं संकेत करणें. To form a league or clique against.

समाचार घेणें– १ बरें वाईट वर्तमान पुसणें. २ मारणें. 1 To inquire after the health of ; 2 To belabour.

सळो कां पळोसें करणें– अतिशय त्रासवून सोडणें. To tease.

असा भांडणाचा अनर्थ झाला कीं साऱ्या मंडळीस सळो कां पळोसें झालें.
—पण लक्षांत॰

सूं करणें– सूंबाल्या करणें– पळून जाणें. To run away.

सूत असणें– स्नेहसंबंध असणें, जुळतें असणें. To be on good terms with.

आज पांच चार दिवस पाहतां तों रंभाजी आणि येसाजी यांचें कांहीं विलक्षणच सूत असलेलें दिसत आहे.

सूंबाल्या हांकणें– पळून जाणें.

इकडे त्यांची अशी त्रेधा पाहून ... येसाजीनें त्यांना न सांगतां सूंबाल्या हांकला आणि झाडावर चढून बसला. —संभाजी.

साप साप ह्मणून भुई धोपटणें किंवा बडविणें– खरोखर साप नसतां त्याच्या अस्तित्वाचा खोटा आरोप करून त्याला मारण्याच्या मिषानें भुई बडविणें. यावरून निवळ खोटा आरोप स्थापित करून चोपणें हा अर्थ. To lay wrong imputations against.

सोनारानें कान टोंचणें– तिऱ्हाइतानें कानउघाडणी करणें. ( लहान मुलांच्या कानांत बाळ्या, डुल वगैरे घालण्यासाठीं त्यांचे कान टोंचावे लागतात. तीं घरच्या माणसांना कान टोंचूं देत नाहींत, पण सोनारापुढें बसविलें ह्मणजे मुकाट्यानें टोंचूं देतात. यावरून हा सं॰ निघाला. )

सोडवून ठेवणें– पळायचाला वाट ठेवणें. To leave open a loop-hole.

हट्ट जिरणें– हट्ट जाऊन मनाच्या शुद्ध स्थितीला येणें. To recover from one's fit of sulks.

हट्टास पेटणें– काय होईल तें होवो, पण मी हें करीन किंवा करणारच नाहीं असा आग्रह धरणें. To take sulks.

हबेलंडी उडणें– त्रेधा उडणें. ( मूळ शब्द हल+बे+लंडी असा आहे. ) To be in a plight.

'आह्मीं यंव केलें, त्यंव केलें, मराठ्यांची अशी हवेलंडी उडविली' वगैरे खोट्यानाट्या गप्पा सांगून खानानें त्यांस चार शिव्याही हांसडल्या. —बाजीराव.

**हरवऱ्याचे झाडावर चढणें–चढविणें**– स्तुतीला भुलणें. To tickle and exhilarate a person by flattery.

हा कोणी विलक्षणच मनुष्य दिसतो. याला एखादे वेळीं तूं फार चांगला साधा माणूस दिसतोस असें कोणीं ह्मटलें असेल, तेवढ्यावरच स्वारी हरबऱ्याच्या झाडावर चढली आहे ! —अतिपीड०

**हंसून गोड करणें**– दुसऱ्याच्या मनाला वाटणारा विषाद शेवटीं चार गोड शब्द बोलून घालविण्याचा यत्न करणें.

**हांका मारणें**– ओरड करीत बसणें, अमक्यानें माझें असें केलें आणि तसें केलं, असें ह्मणून त्याच्या नांवाचा बभ्रा करणें. To make loud complaints against.

मीं एवढ्या युक्तीनें जुळवून आणलेला डाव तूं आपल्या मूर्खपणानें फुकट घालविलास आणि आतां माझ्या नांवानें हांका मारीत बसतोस, तुला काय म्हणावें ?

**हाय खाणें–घेणें**– धास्ती घेणें. ('हाय !' हा भीतीनें किंवा दुःखानें तोंडांतून निघणारा शब्द आहे.) To take alarm at.

**हार खाणें**– आपण कमी प्रतीचे आहों हें कबूल करणें. To acknowledge one's own inferiority.

त्यानें त्यांचा यथायोग्य समाचार घेऊन त्यांस हार खावयास लाविलें.

—नाना आणि महादजी.

**हार जाणें**– मागें राहणें–पडणें; जिंकले जाणें. To allow one to surpass.

चलाखपणांत आह्मी कोणत्याही लोकांस हार जाणार नाहीं अशी आमची खात्री आहे. – निबंध०

**होळी करणें**– नाश करणें. To ruin.

साधु बिभीषणगृह संरक्षी, लंकेची करी होळी।
घोळी बहुकटकें हरि, अरि तो 'हाय' म्हणे, कर चोळी ॥

—मोरोपंत.

# प्रकरण दहावें.

## इतर भाषांमधून आलेले संप्रदाय व वाक्यें.

### संस्कृत.

अजापुत्रं बलिं दद्यात्‌–गरीबाचा वाली कोणी नाहीं, ज्यानें उठावें त्यानें त्याची खोडी करावी अशा अर्थाची ही ह्मण आहे. [अजापुत्र= बोकड; यज्ञांत बळी ह्मणून एखादा वाघ किंवा लांडगा असा हिंस्र पशु मारीत नाहींत; गरीब बिचारा बोकड मारतात.]

अतिपरिचयादवज्ञा–मूळ संस्कृत श्लोक असा आहेः–अतिपरिचया-दवज्ञा संततगमनादनादरो भवति। मलये भिल्लपुरन्ध्री चंदनतरुकाष्ठ-मिन्धनं कुरुते।

[अर्थः–अतिपरिचय झाला ह्मणजे अवज्ञा होते; (दाट ओळखीच्या माणसाचा मानसन्मान कोणी ठेवीत नाहींत;) वारंवार जाणें येणें ठेवल्यानें अनादर होतो; याला उदाहरण, मलय पर्वतांत राहणाऱ्या भिल्ल स्त्रिया चंदनाचें लांकूड सर्पण ह्मणून जाळतात!]

अति सर्वत्र वर्जयेत्‌–कोणतीच गोष्ट मर्यादेबाहेर केलेली वाईट. Extremes are always to be avoided.

अथपासून इतिपर्यंत–आरंभापासून समाप्तीपर्यंत. (अथ व इति हे दोन्ही शब्द संस्कृत आहेत.) From beginning to end.

अधिकस्याधिकं फलम्‌–ज्या प्रमाणानें जी गोष्ट करावी, त्या प्रमाणानें तिचें फळ मिळावयाचें; साखर जितकी अधिक घालावी, तितका पदार्थ अधिक गोड होतो.

अप्रियस्य च पथ्यस्य श्रोता वक्ता च दुर्लभः–न आवडण्यासारखें पण हितकर असें भाषण ऐकणाराही दुर्मिळ आणि तें करणाराही दुर्मिळ हा या वाक्याचा अर्थ आहे. ह्मणजे तोंडापुरतें गोड गोड बोलणारे (मग

परिणाम कांहींही होवो ) पुष्कळ असतात आणि अशांचें भाषण ऐकून ज्यांना बरें वाटतें असे श्रोतेही पुष्कळ असतात; पण अप्रिय असलें तरी हितकर असें भाषण करणाराची व तें ऐकणाराची दोघांची जगांत दुर्मिळता असते.

अव्यवस्थितचित्तानां प्रसादोऽपि भयंकरः– अव्यवस्थित चित्ताच्या (म्हणजे ज्याची चित्तवृत्ति घटकोघटकीं पालटते अशा) माणसाची कृपा सुद्धां भयावह होते.

अव्यापारेषु व्यापारः– हें वाक्य ज्या गोष्टीवरून प्रचारांत आलें, ती मूळ गोष्ट पंचतंत्र नांवाच्या संस्कृत पुस्तकांत अशी आहेः– एका रानांत सुतार लांकूड कापीत असतां दुपारची वेळ झाली म्हणून कापले त्या जागीं एक खुंटी बसवून ते जेवावयास गेले. मागें एक वानर येऊन त्या अर्धवट कापलेल्या लांकडावर बसला. वानराच्या हातीं पायीं खोड्या असतातच, त्याप्रमाणें तो ती खुंटी हालवूं लागला. बऱ्याच प्रयत्नानें त्यानें ती खुंटी उपटून वर काढली. पण परिणाम काय झाला? त्याची शेपटी त्या चिरलेल्या लांकडाच्या फटींत अडकली होती, ती खुंटी काढल्याबरोबर त्या फटींत दाबली जाऊन त्याची प्राणांतिक अवस्था झाली. वास्तविक पाहतां त्या वानराला खुंटीशीं कांहीं करावयाचें नव्हतें. यावरून ज्याच्याशीं एखाद्याला कांहीं करावयाचें नसतें, त्या गोष्टींत तो ढवळाढवळ करूं लागला म्हणजे या वाक्याचा उपयोग करतात.

अरसिकेषु कवित्वनिवेदनम्– एकजण ब्रह्मदेवाची प्रार्थना करून ह्मणतो– 'इतरपापफलानि यथेच्छया विलिखितानि सहे चतुरानन । अरसिकेषु कवित्वनिवेदनं शिरसि मा लिख मा लिख मा लिख ॥' म्ह० 'हे ब्रह्मदेवा, इतर पापांचीं माझ्या नशिबीं लिहिलेलीं हवीं तेवढीं फळें भोगण्यास मी तयार आहें; पण अरसिकांच्या पुढें कवित्वाचें निरूपण करणें येवढें एक पाप मात्र माझ्या कपाळीं लिहूं नकोस, अशी तुला माझी त्रिवार प्रार्थना आहे.' ज्याच्या अंगीं रसिकपणा नाहीं त्याच्यापुढें कवित्वनिरूपण करण्याचा प्रसंग येणें याहून सडतर असें दुसरें दुर्दैव नाहीं असा अर्थ. *cf* 'गाढवापुढें वाचली गीता.'

अहोरूपमहोध्वनिः- परस्परांनीं परस्परांची स्तुति करणें. संस्कृत सुभाषितांत हा संबंध श्लोक असा आहेः 'उष्ट्राणांच गृहे लग्नं गर्दभाः शांतिपाठकाः । परस्परं प्रशंसन्ति 'अहोरूपमहोध्वनिः' ॥ उंटाच्या घरीं लग्न उभें राहिलें असतां मंगळाष्टकें ह्मणण्याच्या कामीं गर्दभाचार्यांची योजना झाली. मग उंट व गाढव एकमेकांची स्तुति करतातः-'काय हो मनोहर रूप!' 'कंठ तरी किती गोड हो!' Mutual adulation.

आरंभशूराः खलु दाक्षिणात्याः- दक्षिणी लोक कोणतेंही कृत्य आरंभण्यांत तेवढे शूर असतात, तडीस नेण्याची कुवत त्यांच्या अंगीं नसते असा अर्थ.

इतो भ्रष्टस्ततो भ्रष्टः- दोन्हीकडे फजीती होणें. दोहोंपैकीं एकाही ठिकाणीं कार्यभाग न होतां, उलट अपेश येणें.

असें केल्यामुळें रामभाऊंस बढती तर मिळाली नाहींच, पण मूळची नोकरी होती ती जाऊन वर आणखी साहेबाचें आणि यांचें वांकडें आलें! इतो भ्रष्टस्ततो भ्रष्टः अशी त्यांची स्थिति झाली.

ऋणं कृत्वा घृतं पिबेत्- प्रसिद्ध नास्तिकाग्रणी चार्वाक यांच्या नांवानें प्रसिद्ध असलेल्या पुढील श्लोकांत हा चरण आहे. संबंध श्लोक असा आहेः- 'यावज्जीवं सुखं जीवेदृणं कृत्वा घृतं पिबेत् । भस्मीभूतस्य देहस्य पुनरागमनं कुतः ।' या श्लोकाचा इत्यर्थ हा आहे कीं, जिवांत जीव आहे तोंपर्यंत खुशाल ऋण काढून सण करावा. कारण, या देहाचा काय भरंवसा आहे!

एरंडोऽपि द्रुमायते- ज्या ठिकाणीं मुळींच झाड नाहीं, अशा प्रदेशांत एरंड जरी असला तरी तो मोठा वृक्ष गणला जातो. cf. गांवढ्या गांवांत गाढवी नवाप्ण.

औषधं जान्हवीतोयम्- एखाद्या औषधांत कांहीं धर्मबाह्य पदार्थ आहे अशी शंका आली, पण औषध तर घेतलें पाहिजे, त्यावांचून गत्यंतर नाहीं, अशी स्थिति असली ह्मणजे जुन्या समजुतीचे लोक देखील वरील वाक्य उच्चारून तें घेतात. औषध हें गंगोदकासारखें पवित्र आहे, त्यांत काय काय आहे याची चिकित्सा करूं नये अशी ते आपल्या मनाची समजूत घालतात.

**कर्तुमकर्तुमन्यथाकर्तुं शक्ति**— हवें तें करण्याची शक्ति. Absolute power.

**कोटस्य कीटायते**— हें वाक्य अशुद्ध आहे. कुठलें काय ? पत्तासुद्धां लागावयाचा नाहीं असा अर्थ. ( कोठच्या गांवचा पाला ! )

**कर्मणो गहना गतिः**— दैवाची गति गहन आहे—अगम्य आहे. एखादी वाईट गोष्ट अकल्पित तऱ्हेनें घडली म्हणजे दैववादी माणसाच्या तोंडून वरील वाक्य निघतें. Decrees of fate are inscrutable.

अहो, दिल्लीदरबाराचे वेळीं मोटमोठ्या राजेरजवाड्यांची दाद लागेना, मग आम्ही तर काय ' कोटस्य कीटायते ' आम्हांला कोण विचारतो !

**' क्वचित् काणः भवेत्साधुः '**— म्हणजे एका डोळ्यानें ज्यास व.कडें दिसतें किंवा ज्याची नजर तिरवी आहे असा मनुष्य साधु ( सुस्वभावाचा ) क्वचितच आढळतो.

**खटाटोपो भयंकरः**— हा संप्रदाय मूळ संस्कृतांतल्या ' फटाटोपो भयंकरः ' यावरून अपभ्रंश होऊन मराठींत आला आहे. मूळ श्लोक असाः— निर्विषेणापि सर्पेण कर्तव्या महती फणा । विषमस्तु न वा लोके फटाटोपो भयंकरः । ' म्हणजे विष नसलेल्या सापानें नुसता फटाटोप केला ( फणेचा विस्तार केला ) तरी तो लोकांना भयप्रद होतो. यावरून या सं० चा अर्थ सर्व बाजूंनीं जिवापाड केलेली खटपट असा झाला. कार्य थोडें आणि खटपटीचें अवडंबर मोठें असतें अशा ठिकाणीं या सं० चा उपयोग करतात. Strenuous exertion.

**खल्वाटो निर्धनः क्वचित्**— टक्कल असलेला मनुष्य निर्धन क्वचितच आढळतो.

**गतं न शोचयेत्**— ' गेल्याचा शोक वृथा न करावा. '

**चक्षुर्वै सत्यम्**— जें डोळ्यानें पाहिलें तें खरें, विश्वास ठेवण्यास पात्र असतें. *cf.* ' कानांत व डोळ्यांत चार बोटांचें अंतर असतें. '

**चंचुप्रवेशे मुसलप्रवेशः**— चोंच खुपसण्याइतकी जागा मिळाली पुरे, कीं हळू हळू मुसळ जाण्याइतकी मोठी जागा करतां येते. अल्पावकाश जरी

मिळाला तरी आरंभीं तो पुरेसा असतो, कालांतरानें हातपाय पसरतां येतात. *cf.* ' भटाला दिली ओसरी, भट हातपाय पसरी. '

जीवश्च कंठश्च- जीव आणि कंठ यांच्यासारखी दाट मैत्री. अतिशय सख्य. Exceedingly warm and close friendship.

दूरतः पर्वता रम्याः- दुरून डोंगर साजरे—लांबून पाहिलें असतां डोंगर हिरवेगार आणि रमणीय दिसतात, पण जवळ गेले कीं तोच प्रदेश रुक्ष व भयाण दिसूं लागतो. पुष्कळ गोष्टी दुरून दिसावयाला चांगल्या दिसतात; पण जवळ जाऊन बारकाईनें पाहिलें म्हणजे पुष्कळच दोष दिसतात व त्या गोष्टींचा कंटाळा येतो. Distance lends enchantment to the view.

देहं वा पातयेत् अर्थं वा साधयेत्- मरून तरी जावें, नाहीं तर कार्य तरी साधावें. One should lose one's life or gain one's object.

द्रव्येण सर्वे वशाः- द्रव्यानें हवा तो मनुष्य वश होतो. हा चरण ज्यांत आहे तो सबंध श्लोक असा आहे:—' माता निंदति नाभिनंदति पिता भ्राता न संभाषते । भृत्यः कुप्यति नानुगच्छति सुतः कांता च नालिंग्यते ॥ अर्थप्रार्थनशंकया न कुरुते संभाषणं वै सुहृत् । तस्माद्द्रव्यमुपार्जय शृणु सखे द्रव्येण सर्वे वशाः ॥१॥ ' सारांश, द्रव्यानें सगळीं माणसें वश होतात. All bow to money; every one has his price.

धर्मस्य तत्त्वं निहितं गुहायाम् – या वाक्याचा खरा अर्थ असा आहे कीं, धर्माचें खरें तत्त्व गहन आहे. तें जाणावयाचें असेल तर ह्या संसाराचा त्याग करून गिरिकंदरांत जाऊन राहिलें पाहिजे आणि तेथें चित्त स्थिर करून विचार केला पाहिजे. पण या खऱ्या अर्थाकडे न पाहतां ' धर्माचें तत्त्व गुहेंत दडून बसलें आहे, तें कोणाला कळतें आहे? तें अगम्य आहे ' असा या वाक्याचा लौकिकी अर्थ झाला आहे.

धर्मस्य त्वरिता गतिः—धर्म करणें तो मनांत आल्याबरोबर करून टाकावा, विलंब लावूं नये.

**न देवाय न धर्माय**– देवाच्या कार्यी लागलें नाहीं आणि दानधर्माचें कार्यही झालें नाहीं म्हणजे कोणत्याच चांगल्या कार्याला लागलें नाहीं. पैसा किंवा श्रम यांचा व्यर्थ व्यय झाला हा अर्थ.

**न भूतो न भविष्यति**– पूर्वी कधीं झाली नाहीं व पुढेंही कधीं होणार नाहीं अशी अपूर्व गोष्ट.

तुझिया ऐसा पक्षपाती । आतां न भूतो न भविष्यति । पुराणमुखें राहेल कीर्ति । ऐसें कांहीं मज सांगे ॥ –मुक्तेश्वर.

**न हिंदुर्न यवनः**– त्रिशंकूसारखी अवस्था होणें, इतो भ्रष्टस्ततो भ्रष्टः होणें. हेंही नाहीं आणि तेंही नाहीं, अशी स्थिति होणें. दोहींकडे अंतरणें. मूळ श्लोक असा आहेः— न संध्यां संधत्ते नियमितनिमाजान्न कुरुते । न वा मौंजीबंधं कलयति न वा सौनताविधिम् । न रोजान् जानीते व्रतमपि हरेर्नैव कुरुते । न काशी मक्का वा शिव शिव न हिंदुर्न यवनः ॥

**निरंकुशाः कवयः**– कवींस कोणत्याही प्रकारचा–भाषेचा, व्याकरणाचा वगैरे प्रतिबंध नसतो . Poets know no restraint.

**नानारत्ना ( बहुरत्ना ) वसुंधरा**– पृथ्वीच्या पाठीवर किती तरी नाना-प्रकारचीं रत्नें आहेत ! सबंध श्लोक असा आहेः– ‘ पिंडे पिंडे मतिर्भिन्ना तुंडे तुंडे सरस्वती । देशे देशे विभाषा स्यान्नानारत्ना वसुंधरा ॥ ’

**निर्वीरमुर्वीतलम्**– पृथ्वीतलावर कोणी सामना करणारा वीर–प्रति-स्पर्धी–राहिला नाहीं अशी स्थिति.

७२ साल आटोपत आलें तरी परशुराम कोठें हूं का चूं करीना, तेव्हां जोती-साहेबांस ‘ निर्वीरमुर्वीतलम् ’ झालें. –नि. मा.

**निःस्पृहस्य तृणं जगत्**– जो निःस्पृह आहे ह्मणजे ज्याला लोभ नाहीं तो काडीइतकी देखील जगाची पर्वा करीत नाहीं. तो जग तृणा-प्रमाणें मानतो.

**परोपदेशे पांडित्यम्**– दुसऱ्याला उपदेश करण्याचे वेळीं मात्र पंडित–जीभ चुरचुरु चालविणारे बृहस्पति, पण स्वतः कृति करतांना त्याच्या अगदीं उलट ! *cf* ‘ लोकां सांगे ब्रह्मज्ञान. ’ One profuse of advice for others.

पुराणमित्येव न साधु सर्वम्– एखादी गोष्ट केवळ जुनी आहे येवढ्याच कारणामुळें ती चांगली होते असें नाहीं असें ह्मणावयाचें असतां हें वाक्य योजतात. Antiquity is not always a mark of verity.

प्रथमग्रासे मक्षिकापातः– इच्छित गोष्ट सिद्ध होण्याच्या समयीं विघ्न होऊन सिद्धि नाहींशी होणें. ( जेवावयास बसले असतां पहिल्याच घासाबरोबर माशी गेल्यास बाकीचें जेवण जागचेजागीं रहातें. ) Failure at the first attempt or outset of business.

पिंडे पिंडे मतिर्भिन्ना– प्रत्येक माणसाची बुद्धि निरनिराळी असते.

बालादपि सुभाषितं ग्राह्यम्– चांगलें भाषण असलें–मग तें लहान मुलाच्या तोंडांतून निघालें असलें तरी–तें ग्रहण करावें.

बुद्धिः कर्मानुसारिणी– जसें दैवीं लिहिलें असेल तशी बुद्धि होते. हें वाक्य दैववादी लोकांच्या तोंडीं नेहमीं येतें.

भवति न भवति– ( भवति = होतें ; न भवति = होत नाहीं. ) वाद, चर्चा, A discussion.

पुष्कळ भवति न भवति होऊन शेवटीं असें ठरलें कीं, गांवकऱ्यांच्या सह्यांचा एक अर्ज सरकारांत पाठवावा.

भिन्नरुचिर्हि लोकः– निरनिराळ्या लोकांची अभिरुचि निरनिराळ्या प्रकारची असते; रुचिपरत्वें निरनिराळ्या लोकांस निरनिराळ्या गोष्टी आवडतात.

मनःपूतं समाचरेत्– मूळ श्लोक – ' दृष्टिपूतं न्यसेत्पादं वस्त्रपूतं जलं पिबेत् । मंत्रपूतं वदेद्वाक्यं मनःपूतं समाचरेत् । ' शेवटच्या चरणाचा मूळ अर्थ मनाला जें पवित्र वाटेल तसें आचरण करावें असा होता. पण पुढें त्याला हीनत्व प्राप्त होऊन स्वैरवर्तन करणें असा अर्थ झाला.

मधु तिष्ठति जिह्वाग्रे हृदये तु हलाहलम्– बोलणें गोड, पण अंतःकरणांत कालकूट विष भरलेलें; *cf.* बोलणें मानभावाचें करणी कसाबाची. Fair in speech, foul in thought.

‘ रामभाऊस कोणत्याही गोष्टीचा विचार मुळींच नसे; ‘ मनःपूतं समाचरेत् ’ असें वर्तन करण्यांत उलट त्यास मोठें भूषण वाटत असे. ’

मनसा चिंतितं कार्यं देवोऽन्यत्र चिंतयेत्— आपलें मन चिंतितें एक, देवाच्या मनांत असतें निराळेंच. Man proposes, God disposes.

महाजनो येन गतः स पन्थाः— ज्या मार्गानें महाजन ह्म० मोठमोठे लोक गेले तोच मार्ग खरा अशा अर्थी या वाक्याचा उपयोग करतात. मूळ श्लोक असा आहेः—श्रुतिर्विभिन्ना स्मृतयश्च भिन्नाः । नैको मुनिर्यस्य वचः प्रमाणम् । धर्मस्य तत्त्वं निहितं गुहायाम् । महाजनो येन गतः स पन्थाः ॥ जेथें निरनिराळे लोक निरनिराळे मार्ग दाखवितात; आणि अमका मार्ग स्वीकारावा कीं तमका स्वीकारावा याविषयीं मनाचा निश्चय होत नाहीं, तेथें वाडवडील किंवा मोठे लोक ज्या मार्गानें गेले त्याच मार्गानें आपणही जावें असें पुष्कळांना वाटतें.

मुखमस्तीति वक्तव्यम्— ‘ तोंड आहे ह्मणून बोलावयाचें ’ अर्थात् कांहीं तरी—ज्याला ताळना तंत्र असें—बोलावयाचें असा अर्थ.

मूले कुठारः— मुळावरच कुऱ्हाड घालणें; एखादें मत निःशेष खोडून काढणें; ज्या मुद्यांवर मताची किंवा सिद्धांताची उभारणी झाली असेल ते मुद्दे सर्वस्वीं खोडून काढणें.

हा केवळ तूर्तातूर्तचा उपाय झाला, पण समूळ गैरसोय दूर करण्यास ‘ मूले० ’ या न्यायाचेंच अवलंबन केलें पाहिजे. —केसरी.

मौनं सर्वार्थसाधनम्— ( मौन = स्तब्धता; सर्वार्थसाधनम् = सर्व गोष्टी प्राप्त करून घेण्याचें साधन. ) मुकाट्यानें बसलें ह्म० सगळ्या गोष्टी साधतात. *cf.* ‘ तुका ह्मणे उगे रहावें । जें जें होईल तें तें पहावें । ’ Silence is golden.

यद्यपि शुद्धं लोकविरुद्धं नाकरणीयं— एखादी गोष्ट विचाराच्या दृष्टीनें निर्दोष असली तथापि ती लोकांना असंमत किंवा लोकाचाराविरुद्ध असेल तर तिचें आचरण करूं नये.

यावत्तैलं तावदाख्यानं— याचा मूळ अर्थ—जोंपर्यंत ( दिव्यांत ) तेल असेल तोंपर्यंत आख्यान ( गोष्ट ) चालावयाचें. यावरून जोंपर्यंत मनु-

ंयाची चलती आहे तोंपर्यंत त्याच्या इच्छेस अनुसरतात, सद्दीचा जोर संपला ह्मणजे आटोपलें असा अर्थ.

यः पलाय ( पलायन ) करणें–' यः पलायति स जीवति ' या ह्मणीचा हा संक्षेप आहे. अर्थ जो पळतो तो वांचतो.

दारांत जातो तों सासरा भेटला त्याबरोबर मग त्यानें यः पलायच केलें.

' चोऱ्या करूनच्या करून पुनः शाळेंत जात नाहीं, हरामखोर '! असें दरडावून रंगूकाकांनीं उग्र स्वरूप धरलें. त्याबरोबर स्वारीनें दप्तर काखेंत मारून यःपलाय केलें. –जग हें०

यावच्चंद्रदिवाकरौ– जोंपर्यंत चंद्र आणि सूर्य ( दिवाकर ) कायम आहेत तोंपर्यंत, अर्थात् केव्हांही. एखाद्या गोष्टीविषयीं बोलणाराच्या मनाची पूर्ण खात्री असली ह्मणजे तिच्या सत्यतेला कधींही बाध यावयाचा नाहीं असें सांगतांना तो या सं०चा उपयोग करतो.

योजकस्तत्रदुर्लभः– कोणत्याही गोष्टीची योग्य स्थळीं किंवा योग्य कार्यांत योजना करण्यास बुद्धि लागते. अशी बुद्धि असणारीं माणसें दुर्मिळ असतात हा अर्थ.

येन केन प्रकारेण– कोणत्याना कोणत्या प्रकारें; कांहींना कांहीं तरी करून; चांगला किंवा वाईट याचा विचार न करतां हव्या त्या उपायानें मूळ श्लोक असाः–' घटं भिन्द्यात् पटं छिन्द्यात् कुर्याद्वा रासभव्वानिम् । येन केन प्रकारेण प्रसिद्धः पुरुषो भवेत् ॥ ' ह्म० भांडें फोडावें, वस्त्र फाडावें, गाढवासारखें ओरडावें, कांहींना कांहीं तरी करून प्रसिद्धीला यावें.

राजा कालस्य कारणम्– बरा वाईट वेळ येण्यास राजा कारण होतो; ह्मणजे राजा ज्याप्रमाणें बरें वाईट वर्तन करील, त्याप्रमाणें देशास बरी वाईट स्थिति प्राप्त होते. रामाचें वर्तन चांगलें होतें ह्मणून त्याच्या राज्यांत अबादानी होती; संभाजीचें वर्तन वाईट होतें ह्मणून त्याला व त्याच्या प्रजेला फार दुःखें भोगावीं लागलीं.

विनाशकाले विपरीतबुद्धिः– विनाशकाळ आला ह्मणजे मनुष्याची बुद्धि फिरते. *cf.* आधीं बुद्धि जाते, मग भांडवल जातें.

वचने किं दरिद्रता– बोलण्यांत कमी कां करा ! हवें तितकें बोलावें, करावयाचें तेवढेंच करावें म्हणजे मोठमोठाल्या गप्पा मात्र माराव्या अशा अर्थानें या सं० चा उपयोग करतात.

वचस्येकं मनस्येकम्– ओठांत एक पोटांत एक म्ह० बोलण्याचा रंग निराळा, पोटांत असतें निराळेंच; अर्थात् ढोंग. Hypocrisy.

वादे वादे जायते तत्त्वबोधः– एखाद्या गोष्टीसंबंधानें वादविवाद करीत राहिल्यानें त्या गोष्टीचें तत्त्व ( मर्म ) कळून येतें.

मूळ सबंध श्लोक असा आहेः– 'मार्गे मार्गे निर्मलं ब्रह्मवृंदं । वृंदे वृंदे तत्त्वचिंतानुवादः । वादे वादे जायते तत्त्वबोधो । बोधे बोधे भासते चंद्रचूडः ॥'

विषादप्यमृतं ग्राह्यम्– जें चांगलें, घेण्यासारखें, शिकण्यासारखें दिसेल तें कोठेंही असलें तरी घ्यावें; त्याचा अनादर करूं नये. अमृत प्रत्यक्ष विषांत जरी असलें तरी तें घेण्यास अनमान करूं नये.

शठे शाठ्यं समाचरेत्– लुच्च्या माणसाशीं लुच्चेगिरीनेंच वागलें पाहिजे.

शफरी फर्फरायते– ( शफरी = मासळी, फर्फरायते = फुरफुरूं लागते. ) अल्प वैभव प्राप्त झाल्यानें जे गर्वानें ताठतात त्यांच्या संबंधानें हा सं० योजितात. सबंध संस्कृत श्लोक असा आहेः– ' अगाधजलसंचारी न गर्वं याति रोहितः । अंगुष्ठोदकमात्रेण शफरी फर्फरायते । ' म्ह० अथांग पाण्यांत राहणारा मासा गर्वानें फुगत नाहीं, पण अंगठा बुडण्याइतक्या थोड्या पाण्यांत राहणारी मासळी तेवढ्या अल्प वैभवानेंच फुरफुरूं लागते.

शापादपि शरादपि– पृ० ४६ वर हा सं० पहा. ज्या श्लोकापासून हा संप्रदाय निघालां तो श्लोक असा आहेः– अग्रतश्चतुरो वेदाः पृष्ठतः सशरं धनुः । इदं ब्राह्ममिदं क्षात्रं शापादपि शरादपि ॥ एखाद्या माणसाचें तेज बोलण्यांत आणि कृतींत दोन्ही रीतींनीं दिसलें म्हणजे हा सं० योजतात.

शिष्यापराधे गुरोर्दंडः– शिष्याच्या अपराधाबद्दल गुरूस शिक्षा.

बॉसवेलच्या ग्रंथाविषयीं लिहिण्याचा जेव्हां प्रसंग आला तेव्हां वरील टीकाकारानें ( मेकॉलेसाहेबानें ) ' शिष्यापराधे गुरोर्दण्डः ' या न्यायाचा विपर्यय करून बिचाऱ्या शिष्यावर आपली लेखणी मनमुक्त झाडून घेतली. –नि. मा.

शुभस्य शीघ्रं– ( ' शुभं च शीघ्रं ' ) चांगलें काम झटपट, लौकर, केलेलेंच बरें.

असलीं ( लग्नासारखीं ) कामें शुभस्य शीघ्रं या न्यायानेंच उडविलीं पाहिजेत. –त्राटिका.

शेषं कोपेन पूरयेत्– पुढें कांहीं बोलतां येईनासें झालें ह्मणजे रागावणें. निरुत्तर झाल्यामुळें आलेला कमीपणा रागानें भरून काढणें.

शिवस्य हृदयं विष्णू विष्णुस्य हृदयं शिवः – अर्थ गट्टी किंवा एकरूपता. शिव आणि विष्णु यांचा अभेद दाखवितांना हा श्लोक ह्मणतात; पण तो अशुद्ध आहे. शिवस्य हृदयं विष्णुर्विष्णोश्च हृदयं शिवः हें वाक्य शुद्ध होय.

शिष्टागमने अनध्यायः– पाहुण्याच्या आदरार्थ अध्ययनाला सुट्टी. A holiday in honour of the visit of a venerable person.

समानशीलव्यसनेषु सख्यम्– ज्यांचा स्वभाव सारखा व ज्यांना सारख्याच वाईट संवयी जडल्या आहेत, अशांच्यामध्यें गट्टी सहज होते. Birds of a feather flock together.

समूलं च विनश्यति– एखाद्या गोष्टीचा समूळ नाश झाला असें सांगावयाचें झालें ह्मणजे हा सं० योजतात. ज्या श्लोकाचा हा एक चरण आहे तो सबंध श्लोक असा आहेः— अन्यायोपार्जितं द्रव्यं दशवर्षाणि तिष्ठति। प्राप्ते चैकादशे वर्षे समूलं च विनश्यति ॥ ' म्ह० अन्यायानें मिळविलेलें द्रव्य दहा वर्षे रहातें, अकराव्या वर्षी तें समूळ नाश पावतें.

सर्वारंभास्तंडुलाःप्रस्थमूलाः– हिंदु लोकांच्या कोणत्याही धर्मकृत्याच्या आरंभीं तांदुळांची जरुरी लागते, या गोष्टीवरून ही ह्मण प्रचारांत आली आहे. कोणत्याही कार्याच्या आरंभीं पैसा हा पाहिजेच; पैशाशिवाय त्या कार्याला प्रारंभ करतां येत नाहीं; असा या ह्मणीचा अर्थ आहे.

सर्वारंभास्तंडुलाः प्रस्थमूलाः हें सगळ्या उद्योगांचें मूळबीज आहे. –विविधज्ञानविस्तार.

सुखंच मे शयनंच मे–चैनींत दिवस घालविणें, सुखानें झोंप घेत रहाणें.

आतां परचक्राची वार्ताही न उरल्यामुळें (आमच्या लोकांना) ' सुखंच मे शयनंच मे ' एवढा काय तो प्रकार उरला आहे. –निबंधमाला.

सूचिप्रवेशे मुसलप्रवेशः– 'चंचुप्रवेश मुसलप्रवेशेः' ही ह्मण पहा.

स्वभावो दुरतिक्रमः– *cf.* स्वभावाला औषध नाहीं. Habit is second nature.

## हिंदुस्थानी.

अजगरका दाता राम– अजगर ही एक सर्पाची जात आहे. अजगर शरिरानें अजस्त्र असून त्याची गति फार मंद असते. अर्थात् त्याला भक्ष्य मिळण्याला पंचाईत पडते. देवच काय त्याच्यावर कृपा करून भक्ष्य आणून देईल तेवढें. यावरून अजगरासारखा मंद व आळशी पुरुष असा अर्थ.

आगे लाथ पीछे बात– कामचुकार, अप्रामाणिक माणसांकडून काम करून घ्यावयाचें ह्मणजे गोड बोलून तें होत नाहीं, तर लाथ मारूनच घेतलें पाहिजे. 'अगोदर लाथ घे, मग बाता (सबबी) सांग' असा अर्थ.

अल्लाची गाय– गाय हें अगादर गरीब जनावर आहे. त्यांतून ती अल्लाची ह्मणजे परमेश्वराची असल्यावर तिच्या अंगीं सात्विक गुणाचा अंश अधिकच असणार. यावरून गरीब, निरुपद्रवी मनुष्य असा अर्थ. A meek, inoffensive man.

आप करे सो काम }
पदरीं होय सो दाम } ह्म० जो मनुष्य दुसऱ्यावर विश्वसून न राहतां स्वतः काम करूं लागतो, त्याच्या हातून तें घडतें; त्याचप्रमाणें रोखीनें जसें काम होतें तसें उधारीनें होत नाहीं.

औंर तर भुर्रर– या ह्मणीच्या उपपत्तीविषयीं एक गोष्ट आहे. कधीं न संपणारी अशी गोष्ट सांगा ह्मणून कांहींजण एका गोष्टी सांगणाराच्या मागें लागले होते. तो गोष्टी सांगणारा चतुर होता. 'बरें आहे' असें ह्मणून त्यानें पुढील गोष्ट सांगण्यास प्रारंभ केला. एका झाडावर कांहीं पक्षी होते, ते आनंदानें गात व उडत बागडत होते. इतक्यांत एका पारध्यानें बंदुकीचा आवाज काढल्यावरोबर एक पक्षी भुर्रर उडाला. गोष्ट ऐकणारे ह्मणाले, 'औंर!' 'म्हणजे बरें पुढें!' गोष्ट सांगणारा म्हणाला 'औंर तर भुर्रर,' म्हणजे आणखी दुसराही भुर्रर उडाला. याप्रमाणें जितके वेळां त्यांनीं 'औंर!' असें विचारावें तितके वेळा यानें 'औंर तर भुर्रर' असें म्हणावें. अशा रीतीनें गोष्ट कधीं संपेचना. जेथें एक मनुष्य दुसऱ्याच्या मनांतलें

काढून घ्यावयाला पाहत असतो, पण दुसरा त्याला दाद न देतां उडवा-उडवी करून त्याला टाळीत असतो तेथें या ह्मणीचा उपयोग होतो.

कफल्लक– अकिंचन, ज्याच्याजवळ अवश्य लागणारा कपडालत्ता व भांडींकुंडीं देखील नाहींत तो. One wretchedly poor.

आतांपर्यंत सहाशें रुपये त्याला खर्चावयाला पाठविले; दोनशें रुपये घराचें भाडें आलें. इतकी सारी रकम त्यानें व्यसनाचे पायीं खर्चून टाकली आणि पुनः कफ़ल्लक होऊन बसला. याला काय ह्मणावें ?

कुच रोटी, कुच लंगोटी– थोडेंसें अन्नवस्त्र. यावरून जेमतेम निर्वाहाची सोय असा अर्थ.

खरा मार्ग ह्मटला ह्मणजे भलत्या सलत्या कल्पना टाकून 'कुच०' या रीतीनें कसा तरी पोराबाळांचा गुजारा करून राहणें होय; याप्रमाणें शेंकडा नव्वद जणांच्या मनाची स्थिति आहे. —केसरी.

खानेकू में और लढनेकू मेरा वडा भाई– ह्म० खायला मी व लढण्याला माझा वडील भाऊ. फायदा घेणार आपण व त्याप्री·यर्थ झगडावें लागलें, प्रयास पडले, तर ते करण्यास दुसरा कोणी तरी पुढें करावयाचा. अशा माणसाविषयीं बोलतांना हें वाक्य योजतात.

घी देखा, पण वडगा नहीं देखा– मांजर तूप खायला टपतें तेव्हां तुपाच्या रक्षणार्थ कोणी बसलें असेल व तें आपणांस मारील हें त्याच्या लक्षांत येत नाहीं. यावरून फायद्याची गोष्ट तेवढी दिसते, पण नुकसानीची गोष्ट दिसत नाहीं असा अर्थ. Honey is sweet; but the bee stings.

दर्यामे ( सागरांत ) खसखस– दर्या = समुद्र. समुद्रांत खसखसीच्या दाण्याएवढी ह्मणजे अगदीं खिजगणतींत नाहीं इतक्या अल्प प्रमाणांत. *cf*. संडींत पावरांत.

होय प्रौढंचि, न मागें पार्थ शराहतहि शतमखसख सरे।
मुनि ह्मणति अर्जुनीं तव शक्ति, जशी सागरांत खसखस रे ॥

—मोरोपंत.

दुनिया झुकती हे, झुकानेवाला चाहिये–लोकांना नादीं लागावयाला कांहीं उशीर लागत नाहीं, नादीं लागणारा मात्र पाहिजे. The world

indeed is ready to bow and submit; but there must be some one capable of commanding its submission.

देखनेमे ढब्बू चलनेमे शिवराई– ढब्बू म्हणजे दोन शिवराईच्या वजनाचा पैसा. यावरून दिसण्यांत पुष्ट पण कामाला निरुपयोगी असा अर्थ. A person of imposing exterior but of little worth.

दौलत ज्यादा होणें– सरकार-दरबारीं प्रतिष्ठा वाढणें. To be advanced to affluence and honour.

धीर सो गंभीर उतावळा सो बावळा– धीर धरणारा मनुष्य आपली वृत्ति शांत ठेवतो; पण जो उतावळा असतो तो हें आधीं करूं कीं तें आधीं करूं या विचारानें गोंधळून बावळ्यासारखा करूं लागतो.

पराय घरपर लक्ष्मीनारायण– दुसऱ्याच्या जिवावर मौजा मारणारा. *cf.* आइजीच्या जिवावर बाइजी उदार.

पानी तेरा रंग कैसा ? जिसमे मिला वैसा– पाण्याला स्वतःचा रंग नाहीं. तें ज्यांत मिसळलें असेल त्याचा रंग त्या पाण्याला येतो. यावरून स्वतःचीं मतें कांहीं एक नसतां भोंवतालची मंडळी जशी असेल त्याप्रमाणें आपलीं मतें बनविणारा किंवा परिस्थित्यनुरूप वर्तनांत फरक करणारा मनुष्य असा अर्थ.

बखत ( वखत ) पडे बाका तो गद्धेकु कहना काका– कठिण काळ आला कीं एरवीं ज्याला आपण तुच्छ मानतों, त्याचे सुद्धां आर्जव करावे लागतात. When times are bad, we must propitiate even a fool.

बंदे गुलाम– हुकुमी नोकर. An obedient or meek slave.
आमचें जबरदस्त शस्त्र म्हणजे त्यांचें आपल्यावरचें प्रेम. त्याच्याच योगानें ते आमचे राजे असतही आमचे बंदेगुलाम बनतात. –त्राटिका.

बापसे बेटा सवाई– बापापेक्षां मुलगा हुषार निघाला, म्हणजे त्याच्या संबंधानें हे शब्द वापरतात.

बाळाजी विश्वनाथ कांहीं कमी पराक्रमी नव्हता, पण त्याचा पुत्र बाजीराव हा ‘ बापसे बेटा सवाई ’ ह्मणतात, त्याप्रमाणें त्याच्याहूनही पराक्रमी निघाला.

बाबूके भाई दरवेशी— कंगाल.

कोश संपून वर्गणीदारांच्या हातीं समग्र जाऊन पडला व साऱ्या राष्ट्राच्या अभिमानास कारण झाला, पण कोशकारांची अवस्था काय? ...... ते नेमकेच पूर्वस्थितीशीं येऊन भिडले; म्हणजे बाबूके भाई दरवेशी ही अवस्था कांहीं चुकली नाहीं. —निबंधमाला.

बुड्ढी घोडी लाल लगाम— ह्मातान्या घोडीला लाल रेशमाची उंची काढणी शोभत नाहीं. यावरून एखादा म्हातारा मनुष्य तरुण माणसासारखा छानछोकीनें राहूं लागला ह्मणजे ही ह्मण योजतात. Your dress and manner must be suitable to your position.

बैठेसे बिगार भली— आळसांत काळ घालविण्यापेक्षां बिगारीचें काम केलेलें बरें. अगदीं रिकामें बसण्यापेक्षां थोडेंबहुत मिळेल तेवढेंच.

बुंदसे गई सो हौदसे नहीं आती— याविषयीं पुढील दंतकथा सांगतात. एकदां निजामाच्या दरबारांत कारकून अत्तर गुलाब देत असतां त्याच्या हातून अत्तराचा एक थेंब बिछायतीवर सांडला व निजामानें तो बोटानें निपटून घेतला. पेशव्यांचे वकिलाचे ध्यानांत ही गोष्ट आली हें पाहून निजाम ओशाळला आणि आपला वडेजाव दाखविण्यासाठीं पुढच्या दरबाराचे दिवशीं मुद्दाम एक हौद अत्तरानें भरवून दरबारास येणारानें प्रथम हौदांतल्या अत्तरानें पाय धुवून मग दरबारच्या दिवाणखान्यांत यावें असा त्यानें हुकूम सोडला. त्याप्रमाणें करून मंडळी आंत आल्यावर निजामानें पेशव्यांच्या वकिलास ऐटीनें विचारलें, ‘ क्यों ! कैसी बात है ? ’ वकिलानें उत्तर केलें, ‘ बुंदसे गई सो हौदसे नहिं आती ’. यावरून थोड्यामुळें एकदां बिघडलेली गोष्ट पुढें कितीही आयास केले तरी सुधारली जात नाहीं हा अर्थ.

मियां मूठभर दाढी हातभर— वाजवीपेक्षां अधिक; विशोभित दिसणारें. मुख्य वस्तूपेक्षां तिचे गौण अंगास विशेष महत्त्व जेथें देण्यांत येतें, तेथें या ह्मणीचा उपयोग करतात. *cf.* नाकापेक्षां मोतीं जड.

सात आठ अक्षरांचा छंद आणि त्यांत पांच सहा अक्षरांवर यमक हा प्रकार म्हटला म्हणजे............'मिया मूठभर दाढी हातभर' यासारखाच होय.

-निबंधमाला.

हाती चालत अपने गतमे, कुतर भुकत उसकू भुकवा दे- एखादा हत्ती रस्त्यानें जाऊं लागला म्हणजे रस्त्यांतलीं कुत्रीं त्याच्या अंगावर भुंकूं लागतात; पण तो तिकडे लक्ष न देतां आपल्या चालीनें चालत असतो. यावरून हलकट लोक आपल्या कृत्यांवर टीका करूं लागले तर त्यांच्या टीकेला भीक न घालतां आपणांस योग्य दिसेल तें करीत रहावयाचें हें थोरांचें लक्षण आहे असा अर्थ.

## गुजराथी.

आगळ बुध वाणिया पाछळ बुध बामणिया- वाण्याची बुद्धि पुढें ब्राह्मणांची मागाहून हा या गुजराथी म्हणीचा शब्दशः अर्थ आहे. वाण्यांना दूरदृष्टि असते, तशी ब्राह्मणांना नसते, असा अर्थ.

विद्येसंबंधीं प्रत्येक गोष्टींत दक्षिणी लोकांचें पाऊल पुढें असून इतरांचें मागें असे, ती स्थिति बदलून आमचे गुजराथी बंधू 'आगळ बुध०......' ही म्हण खरी करूं पाहत आहेत.

-निबंधचंद्रिका.

घीनो दोडियो अने दोडियोनो घी- एक गांवढळ मनुष्य वाण्याच्या दुकानीं पैशाचें तूप आणावयास गेला. तेव्हां वाण्यानें अगोदर पैसा घेऊन तूप दिलें; पण त्या तुपाबद्दल तो पुनः पैसा मागूं लागला. तो म्हणाला, 'तूं पहिल्यांदा पैसा दिलास तो तुपाचा, पण मी पैशाचें तूप दिलें त्याबद्दलचा पैसा कोठें आहे ?' गांवढळ बिचारा घोंटाळ्यांत पडला. यावरून लटपटीचा हिशोब, फसवेगिरी असा अर्थ.

जेनुं काम तेनुं थाय बीजा करे सो गोता खाय- ज्याचें काम त्यालाच साधतें, दुसरा तें करूं म्हणेल तर तो घोंटाळ्यांत पडेल.

---

# प्रकरण अकरावें.

## ठराविक न्याय.

अंधगजन्याय— याविषयींची एक गमतीची गोष्ट आहे. कांहीं आंधळीं माणसें हत्तीचा आकार कसा असतो तें ठरवूं लागलीं. एकानें सोंड चांचपली आणि तो सर्पासारखा असतो असें ठरविलें; दुसरा पाय चांचपीत होता; त्याला वाटलें हत्ती खांबासारखा असतो. तिसऱ्यानें कानाला हात लावून हत्ती सुपासारखा असतो असें निक्षून सांगितलें. सारांश, एखाद्या विषयाचा एखाद दुसरा अंश पाहून त्यावरून सगळ्याविषयींचा भलताच ग्रह कोणी करूं लागला ह्मणजे हा न्याय होतो. The divergence of views held by the ignorant about one and the same thing.

अंधदर्पणन्याय— आंधळ्या माणसाला आरशाचा काय उपयोग ? ज्या वस्तूचा ज्याला कांहीं उपयोग नाहीं त्याला ती देणें इ० प्रसंगीं या न्यायाचा उपयोग होतो.

अरण्यरोदनन्याय— अरण्यांत रोदन (रडणें) केलें तर त्याचा काय उपयोग ? तें कोण ऐकणार व त्याचें कारण नाहींसें कोण करणार ? यावरून निष्फळ ओरड असें दाखविणारा हा न्याय आहे. Crying in the wilderness.

अंधपरंपरान्याय— जेथें माणसें अविचारानें अथवा अंधश्रद्धेनें डोळे मिटून मेंढरांसारखीं दुसऱ्याच्या मागून जातात, आणि प्रसंगविशेषीं खड्डयांत पडतात, तेथें हा न्याय होतो. *cf.* गतानुगतिकन्याय. Following others thoughtlessly and blindly.

आकाशमुष्टिहननन्याय— आकाशाला बुक्क्या मारणें; अर्थात् निष्फल प्रयत्न आहे असें सूचित करणारा हा न्याय आहे. A vain attempt at an impossibility.

उष्ट्रलगुडन्याय–.उंटाला मारण्याची कांठी तो स्वतःच आपल्या पाठीवर वाहून नेत असतो. यावरून ज्याचें त्याच्या हातून शासन करविणें अशा अर्थी या न्यायाचा उपयोग करतात.

काकतालीयन्याय– कर्मधर्मसंयोगानें अकल्पित रीतीनें एखादी गोष्ट घडून आली आणि ती घडवून आणण्याचें कर्तृत्व जर कोणी उगाच आपल्याकडे घेत असला तर हा न्याय होतो. जसें कावळा बसण्याला आणि झाडाची फांदी मोडण्याला एकच गांठ पडणें. ( संस्कृतांत कावळा बसण्याला आणि ताडाचें फळ पडण्याला गांठ पडली असें आहे. ) A startling and purely accidental occurrence.

शकुनादिकांचा कसाही ठोका मिळाला तरी ज्या अर्थी तो नियमानें मिळत नाहीं, त्या अर्थी तसें केवळ काकतालीयन्यायानें घडतें असेंच ह्मटलें पाहिजे. – नि० मा०

कूपमंडूकन्याय– ( कूपमंडूक शब्द पहा. )

कूपयंत्रघटिका न्याय– ( कू० = रहाटगाडगें. ) रहाटगाडग्याचे पोहरे खालून पाण्यानें भरून वर येतात आणि वर आले ह्मणजे रिकामे होऊन पुनः खालीं जातात; तोंपर्यंत वरचे रिकामे झालेले पोहरे पाण्यानें भरून पुनः वर येत असतात. सारांश, उत्कर्ष आणि अपकर्ष यांचा एकामागून एक क्रम दाखविणें असतां हा न्याय होतो. The changes and chances of life.

कैमुतिकन्याय– एखादी दुष्कर गोष्ट जेथें साध्य होते तेथें सुकर गोष्ट होईलच होईल असा अर्थ असला म्ह० त्याला कैमु० म्हणतात. उदा० कुऱ्हाडीनें लांकूड तुटतें, मग गवत सहजच तोडतां येईल.

गतानुगतिकन्याय– एकामागून दुसऱ्यानें विचार न करतां जाणें. ( अंधपरंपरान्याय पहा. )

घुणाक्षरन्याय– ( घुणाक्षर = किड्यानें लांकूड कोरलें म्हणजे सहज एखाद्या अक्षराचें चिन्ह उठतें तें. ) अमक्याचें चित्र काढावयाचें असा संकल्प नसतां एखाद्यासारखें चित्र सहजगत्या निघतें तेव्हां त्यास घु० म्हणतात. The occurrence of something accidental.

चंद्रचकोरन्याय- चंद्र आणि चकोर यांच्यामध्यें एक प्रकारचा विलक्षण प्रेमसंबंध कवींनीं कल्पिलेला आहे, त्यावरून हा न्याय झाला.

चंद्रसमुद्रन्याय- चंद्रोदयानें समुद्रास भरती येते, त्याप्रमाणें.

बॉसवेल यास या महापंडिताचें ( जॉन्सनचें ) वक्तृत्वसेवन करण्याची अतोनात इच्छा होती व इकडे जॉन्सन यासही कोणी भाविक श्रोता मिळाला असतां चंद्रसमुद्रन्यायानें त्याच्या वाणीस मोठें भरतें येई. —नि० मा०

तुषकंडणन्याय- तुष ह्म० धान्यावरचें टरफल. तें कांडणें निष्फळ असतें. यावरून कोणत्याही गोष्टीचा काथ्याकूट करणें निष्फळ आहे असें दाखवावयाचें असलें म्हणजे या न्यायाचा उपयोग करतात.

यांत खरा कोण आणि खोटा कोण याचा विचार करीत बसणें म्हणजे तुषकंडण" न्यायाप्रमाणें व्यर्थ काथ्या कुटणें होय. —नि० चं०

देहलीदीपन्याय- ( देहली = उंबरठा ) उंबरठ्यावर दिवा ठेवला असतां त्याचा उजेड आंत व बाहेर दोहोंकडे पडतो, त्याप्रमाणें भाषणाचा एखादा भाग मागच्या व पुढच्यांना सारखाच लागू पडतो तेव्हां हा न्याय योजितात. Something which fulfils a two-fold purpose.

नारिकेलपाकन्याय- नारळ बाहेरून खडबडीत दिसतो. पण तो फोडण्याचे श्रम घेतल्यावर आंत गोड असें खोबरें सांपडतें. त्याप्रमाणें वरून ओबडधोबड दिसणाऱ्या वस्तूंच्या पोटांत शिरलें म्हणजे आंत माधुर्य आढळतें असें असलें म्हणजे हा न्याय योजतात.

जे गतवृत्तांत अनज्ञ जनांस बाह्यतः केवळ नीरस वाटतात, त्यांच्या आंत नारिकेलपाकन्यायानें अत्यंत आल्हादकारक व उत्साहप्रद असा रससंचय असतो. —नि० मा०

पाषाणेष्टिकान्याय- ( इष्टिका = वीट. ) 'दगडापेक्षां वीट मऊ' ही म्हण पहा. Softening of a difficulty barely surmountable by comparing it with a matter utterly impracticable.

पिष्टपेषणन्याय- (पिष्टपेषण संप्र० पहा.) Fruitless reiteration.

बकबंधनन्याय- सरळ रीतीनें जी गोष्ट करतां येण्यासारखी आहे तिच्यासाठीं मुद्दाम आडव्या तिडव्या मार्गानें जाणें. बक ( सारस )

पक्ष्याला धरावयाचें झालें तर एकदम न धरतां प्रथम त्याच्या डोक्यावर थोडेंसें लोणी टाकावयाचें व तें त्याच्या डोळ्यांत उतरून त्याला दिसेनासें झालें ह्मणजे मग त्याला धरावयाचें; किंवा सापाला मारण्यासाठीं कुऱ्हाड जवळ पडली असतां ती न घेतां काठी शोधीत फिरावयाचें; अशा प्रसंगीं हा न्याय होतो. The absurdity of a round-about way of doing a thing, when it can be done directly.

बीजांकुरन्याय– बीजापासून अंकुर होतो, अंकुरापासून बीज होतें असें परस्परावलंबित्व दाखविणारें उदाहरण. जसें– पावसापासून पाणी, पाण्यापासून पाऊस.

भिक्षुपादप्रसारणन्याय– ' भटाला दिली ओसरी, भट हातपाय पसरी ' ही म्हण पहा.

मंडूकप्लुतिन्याय– ( मंडूकप्लुति हा सं॰ पहा. ) Passing from one thing to another over intervening ones.

रविकुक्कुटन्याय– ह्मातारीनें कोंबडें झांकलें ह्मणून उजाडावयाचें रहात नाहीं.

त्याचें (मुक्तेश्वराचें) काव्य बुडविणें हें एका राजाखेरीज दुसऱ्या कोणासहीशक्य नाहीं. कोणी केवढाही पटाईत खळ असला तरी त्यास फार ह्मटलें ह्मणजे रविकुक्कुटन्यायानें आपल्याजवळच्या किंवा इष्टमित्रांजवळच्या प्रती नष्ट करतां येतील.
–नि॰ मा॰

विषवृक्षन्याय– आपल्या हातानें लावलेल्या वृक्षाला कडू फळें लागलीं तरी तो आपल्या हातानें तोडून टाकणें योग्य नाहीं. ज्याला एकदां आपला म्हटलें तो वाईट निघाला तरी त्याला दूर लोटणें बरें नाहीं.

व्यालनकुलन्याय– व्याल=सर्प, नकुल=मुंगूस. सर्प व मुंगूस यांचा परस्परविरोधी संबंध आहे. यावरून हाडवैराचा संबंध दाखविण्यासाठीं हा न्याय योजतात. Innate antipathy between the two.

समानशीलं व्यसनेषु सख्यम्– सारखा स्वभाव किंवा एकच व्यसन हीं मनुष्याचें मित्रत्व घडवून आणितात. Friendship is with persons of congenial disposition and similar habits.

स्थालीपुलाकन्याय– शितावरून भाताची परीक्षा करणें. एखाद्या मनुष्याचें एक कृत्य पाहून, त्यावरून सामान्यतः त्याच्यासंबंधानें अभिप्राय देणें.

......या गोष्टीवरून सटे यांच्या धारणाशक्तीची स्थालीपुलाकन्यायानें चांगली अटकळ करतां येते. – वि० ज्ञा० वि०

स्नुषातक्रन्याय– कोणी ताक मागावयाला आलें असतां सुनेनें 'नाहीं' ह्मणतां उपयोगाचें नाहीं. तो अधिकार सासूनें आपलेकडेच घेणें. सासूच्या असल्या हास्यास्पद वर्तनाला उद्देशून हा न्याय आहे. ताकाला नाहीं ह्मणावयाचेंच, पण 'तूं कोण ह्मणणार? मी ह्मणेन' असा सासूचा आग्रह.

सिंहावलोकनन्याय– सिंह शिकार मारल्यानंतर एकदां मागें वळून पहात असतो. यावरून एखादें कार्य आटोपल्यानंतर मागच्या काळाकडे ओझरती नजर फेंकणें; वाचलेल्या गोष्टीचें पुनः थोडक्यांत समालोचन करणें. Recapitulation.

हंसक्षीरन्याय– हंस दुधांतलें पाणी टाकून दूध तेवढें पितो. त्याप्रमाणें एखाद्या कृत्यांतील दोषांकडे दुर्लक्ष करून त्यांतील गुणाचें ग्रहण करणें.

क्षीरनीरन्याय– एकांत एक पूर्णपणें मिसळून जाणें. (जसें क्षीरांत ह्म० दुधांत नीर म्ह० पाणी.) *cf.* 'पानी तेरा रंग कैसा? जिसमे मिला वैसा.'



# प्रकरण बारावें.

## विविध संप्रदाय.

**अकलेचा खंदक**– खंदकासारखी खोल ज्याची अक्कल ( बुद्धि ) आहे तो. लाक्षणिक अर्थ मूर्ख असा होतो. A wiseacre.

**अकांडतांडव करणें**– अकांड ह्मणजे अवेळीं केलेलें, आणि तांडव ह्मणजे बुद्धिबलानें केलेलें महत्कार्य. यावरून मोठें गजबजून सोडण्यासारखें कार्य करणें असा अर्थ. या सं० चा उपयोग चांगल्या व वाईट अशा दोन्ही अर्थांनीं होतो.

शिवाजीला त्याच्या बापानें नावडत्या आईबरोबर पुनवडीस ठेविलें असतां दादोजी कोंडदेवानें लहानपणीं जें कांहीं त्यास शिकविलें, तेवढ्याच ज्ञानानें त्यानें पुढें केवढें अकांडतांडव केलें ! –निबंध०

आजेसाबूबाईनीं तर जें काय अकांडतांडव केलें आहे तें कांहीं पुसूंच नये. –पण लक्षांत०

**अकाबाईचा फेरा**– वडील वहिणीला ' अक्का ' म्हणण्याची चाल आहे. लक्ष्मीची वडील बहीण ( अक्का ) ग्रहदशा ही आहे. यावरून अ० चा फेरा म्हणजे वाईट ग्रह येणें–दारिद्र्य प्राप्त होणें. The round of misfortune.

**अंग चोरणें**– अंगांत काम करण्यास बळ असतां चुकवाचुकवी करणें. To spare one's strength.

संत सेवेसी अंग चोरी । दृष्टी न पडो तयावरी ॥

**अंग टाकणें**– १. शरीरानें कृश होणें. To lose flesh; २. निजणें, To lie down.

**अंग धरणें**– १. मांस येणें, लठ्ठ होणें. To grow fat ; २. थंडीनें अंग दुखणें. To have an aching sensation in the body.

अंगाई करणें– लहान मुलांना निजवितांना आया ' अंगाई, बाळाची कंगाई ' असें गाणें म्हणत असतात. त्यावरून निजणें, झोंप घेणें हा अर्थ. To sleep.

अंगावर कांटा उभा रहाणें– कांहीं तरी भयंकर गोष्ट पाहून किंवा ऐकून अंग रोमांचित होणें.

महमद तघलकाचीं क्रूर कृत्यें वाचून अंगावर कांटा उभा रहातो.

अंगावरचें मूल– मातेच्या स्तनाचें पान करणारें अर्थात् लहान अर्भक. An infant, a baby.

अंगावर शेकणें– बरीच मोठी हानि अथवा नुकसान शिक्षा म्हणून भोगावें लागणें. To get one's fingers burnt.

अग्निकाष्टें भक्षण करणें– अग्नींत प्रवेश करणें– स्वतःस जाळून घेणें.

स्त्रिया शत्रुभयानें व पातिव्रत्यरक्षणार्थ अग्निकाष्टें भक्षण करण्याकरितां सतीचीं वाणें घेत. –लोकहितवादी.

अघळपघळ भाषण– मन मोकळें करून केलेलें भाषण. Free talk.

अटकेस झेंडा मिरविणें– नाचविणें. (अटक ही नदी हिंदुस्थान आणि अफगाणिस्थान यांच्यामध्यें आहे. तेथपर्यंत आपली हिंदुस्थानच्या राज्याची सीमा नेऊन पोंचविणें; अर्थात् सगळ्या हिंदुस्थानाचें स्वामित्व मिळविणें. हें मोठें शतकृत्य होतें. यावरून मोठें शतकृत्य करणें हा अर्थ.)

अडकित्त्यांत धरणें– अडचणींत धरणें. To corner a person.

अडणीवरचा शंख– देव्हाऱ्यांत देवापुढें जो शंख ठेवतात, तो धातुमय तिवईसारख्या आधारावर ठेवतात. या आधाराला अडणी ह्मणतात. यावरून उंच स्थानीं (मोठ्या हुद्यावर) असलेला मूर्ख, बिनअकली मनुष्य असा अर्थ.

अडवें येणें– गर्भांतलें बालक सरळपणें बाहेर न येतां वांकडें होऊन प्रसूतिद्वाराशीं अडकून राहणें; प्रतिबंधक होणें.

अडेलतट्टू– एखाद्या तट्टाला सरळ चालतां चालतां मध्येंच एकदम अडखळून उभें राहण्याची खोड असते. कांहीं केल्यानें तें पुढें चालत

नाहीं. त्यावरून एखादा मनस्वी हट्टी पुरुप असा अर्थ. An obstinate person.

अत्तराचे दिवे जाळणें– किंमतीच्या अत्तराचा दिवे जाळण्याकडे उपयोग करणें हें उधळपट्टीचें लक्षण आहे. यावरून उधळपट्टी करणें हा अर्थ. To make ducks and drakes of one's money.

अगोदर अत्तराचे दिवे जाळून मग काय धुळीचे दिवे खात जावयाचें आहे !

अंडींपिल्लीं बाहेर काढणें– पक्षी आपलीं अंडीं व पिलें घरट्यांत अगदीं खोल कोणाला न दिसतील अशा जागीं ठेवतात. यावरून एखाद्याचें गुपित असा अर्थ. तें बाहेर काढणें म्हणजे फोडणें, सर्वांना जाहिर करणें. To reveal one's secrets.

अंत पहाणें– अंत = अखेरची मर्यादा. तेथपर्यंत गोष्टी जाऊं देणें. To try to the last.

किती अंत पाहसी देवा ।

अद्दल घडणें– (अद्दल शब्दाचा मूळ अर्थ न्याय असा आहे. त्यावरून शासन अथवा शिक्षा मिळणें हा अर्थ झाला.) To have had a lesson.

अंधळ्याची काठी– अंधळ्याला मुख्य आधार त्याच्या हातांतल्या काठीचा असतो. यावरून त्याला आधार देणारा मुलगा असा अर्थ.

या अंधावृद्धाची राहों देतास एक जरि यष्टी ।
भीमा मी मानस तरि होऊं देत्यें कशास बहु कष्टी ? ॥
–मोरोपंत.

अन्न अन्न करणें– 'अन्न द्या, अन्न द्या' असें म्हणत फिरणें. To wander about begging for food.

अन्नास मोताद– मोताद = इयत्ता, प्रमाण. यावरून ज्याला अन्न दुष्प्राप्य झालें आहे असा. One having but a pittance of food.

आंवट ओलें– पुरतें कडकडीत न वाळलेलें, किंचित् ओलसर. Rather damp or moist.

अमरपट्टा– पट्टा ह्मणजे जमीन वगैरे कांहीं मुदतीपर्यंत खंडानें घेत-ल्याबद्दलचा दस्तऐवज किंवा करारनामा. यावरून अ० ह्मणजे आपणाला मरण नाहीं अशा प्रकारचें आश्वासन. An order of exemption from death.

अवतार संपणें– मरणें; स्थित्यंतर होणें. To end a career.

अवाक्षर बोलणें– एकही अक्षर तोंडावाटें काढणें. ( याचा उपयोग निषेधार्थींही होतो. )

तूं दुसऱ्या कोणाजवळ अवाक्षर बोललास, तर ठार मेलास ह्मणून समजच.

–उषः काल.

अस्मान ( आकाश ) ठेंगणें होणें– स्वर्ग दोन बोटें उरणें; ताम्र्याचा कळस होणें. To be puffed up with pride.

श्रीमंतीचा ताटा ताटा ह्मणून जो ह्मणतात तो मूर्तिमंत तिच्या अंगीं झुलत होता...... नवऱ्याच्या पगारामुळें तर तिला अगदीं अस्मान ठेंगणें झालें होतें.

–पण लक्षांत०

अळं टाळं करणें– मन घालून झटून काम करावयाचें तें न करतां आळस किंवा हयगय यामुळें चुकवाचुकव करणें. To be dilatory.

अळवावरचें पाणी– अळवाच्या पानावर पाणी टाकलें असतां तें ठरत नाहीं. यावरून क्षणभंगुर असा अर्थ. Transitory like water on a duck's back.

त्यांच्या उपदेशाचा परिणाम अद्यापपर्यंत अळवावरील पाण्यासारखाच झाला आहे.

–केसरी.

अक्षत देणें– बोलावणें; लग्नकार्याचे वेळीं कोणालाही भोजनाला किंवा पानसुपारीला बोलावणें झाल्यास कुंकुममिश्रित अक्षता त्याला देण्याची चाल आहे. To invite.

अक्षता पडणें– विवाह उरकणें. विवाहाचे वेळीं वर व वधू या दोहीं पक्षांकडील मंडळी त्यांच्या मागें उभी राहून ' शुभ मंगल सावधान ' असे शब्द उपाध्यायाच्या तोंडून निघतांच त्या जोडप्याच्या डोक्यावर अक्षता टाकते. यावरून विवाह होणें हा अर्थ. To be married.

आ करणें– तोंड उघडणें–वासणें. To open one's mouth.

आकाशची कुऱ्हाड– देवानें केलेली शिक्षा. देवानें आणिलेला आकस्मिक दुःखप्रसंग. A disaster from heaven; a calamity from nature.

आकाशपाताळ एक करणें– म्हणजे इकडे आकाशापर्यंत आणि तिकडे पाताळापर्यंत पोंचेल एवढ्या मोठ्यानें कल्लोळ करून सोडणें; फार मोठ्यानें ओरड करणें. To make heaven fall down.

बंदुकांच्या बारांनीं, घोड्यांच्या टापांनीं व खेंकाळण्यानें दशदिशा दणाणून गेल्या; आकाशपाताळ एक झालें. –संभाजी.

आग पाखडणें– चहाड्या वगैरे सांगून नाशास कारण होणें. To scatter calumnies about.

आघाडी साधणें– आघाडी म्ह० पुढचा भाग; त्यावरून अगोदरची वेळ साधणें हा अर्थ. To get the start of.

अडवें होणें– निजणें. To lie down for sleep.

आडून गोळी मारणें– एखाद्या कृत्यांत आपण स्वतः पुढाकार न घेतां किंवा आपलें अंग न दाखवितां दुसऱ्यास पुढें करून त्याच्या हातून इष्ट कार्य घडवून आणणें. To move the strings from behind.

आपले आपण }
आपोआप } – स्वयमेव; दुसऱ्यानें प्रेरणा न करतां. Of itself.

आपल्या पोळीवर तूप ओढणें– स्वतःचा साधेल तेवढा फायदा करून घेणें; दुसऱ्याला फायद्याचा वांटा न देतां तो एकट्यानेंच सगळा गिळंकृत करणें.

आभाळ कोसळणें– पराकाष्ठेचा अनर्थ गुदरणें.

आभाळ फाटणें– सर्वच बाजूंनीं संकटें येणें. To be encumbered with calamities.

जेथें आभाळच फाटलें तेथें ठिगळ कोण देईल ?

आयत्या पिठावर रेघा ओढणें– दुसऱ्यापासून आयत्या मिळालेल्या संपत्तीवर चैन करणें.

आला गेला– पहीपाहुणा, आतिथि, अभ्यागत. A guest.

नानासाहेबांचें म्हटलें म्हणजे आल्यागेल्याचें घर. पंक्तीला दहापांच पाहुणे नाहींत असा दिवस जावयाचा नाहीं.

आव घालणें– डौल घालणें, अवसान दाखविणें. To make a show of.

कित्येक थेरडे आठ नऊ वर्षांच्या मुलींशीं लग्न लावून प्रपंचास पुनः आरंभ करण्याचा आव घालीत असतात. –आगरकर.

आवळा देऊन कोहळा ( बेल ) काढणें– आवळा हें लहानसें अल्प किंमतीचें फळ असतें आणि कोहळा हें मोठें असून अधिक किंमतीचें फळ असतें. यावरून स्वल्प देणगी किंवा नजराणा देऊन त्याच्या मोबदल्यांत दुसऱ्यापासून मोठें कार्य करून घेणें हा अर्थ. To throw a spart to catch a whale.

आहारीं असणें– आटोक्यांत असणें. To be within one's power.

आळा घालणें– बंधन, व्यवस्था किंवा नियम लावून देणें. To keep under restraint.

इकडचा डोंगर इकडे करणें– कांहीं तरी प्रचंड उद्योग करणें.

जॉन्सननें ऐवढा इकडचा डोंगर इकडे केला पण पुनः हातातोंडाशीं गांठ आहे आहेच. –निबंधमाला.

इतिश्री करणें– होणें– पोथीचा अध्याय संपला म्हणजे त्याच्या शेवटीं 'इति श्रीमद्भागवत– पुराणे ' इ. अशा प्रकारचें वाक्य असतें. त्यावरून 'इतिश्री ' म्हणजे शेवट, समाप्ति.

इळ्याभोंपळ्याइतकें सूत– इळा ( विळा ) हें भोंपळा फोडण्याचें शस्त्र आहे. सूत = सूत्र, संबंध. यावरून विरोधी संबंध असा अर्थ.

रामभाऊ आणि त्यांचे चिरंजीव यांचें इळ्याभोंपळ्याइतकें सूत आहे.

उकळी फुटणें– आवेशपूर्वक अंतःकरणाची अनुकूल प्रवृत्ति होणें. To be filled with sudden ardour.

युवराजाचें दर्शन होतांच लोकांना आनंदाची उकळी फुटली.

उकिरडा फुंकणें— घरांतला केरकचरा उकिरड्यांत नेऊन टाकिला असतो. त्यांतून आपणांस कांहीं वस्तूचा लाभ होईल अशा आशेनें गरीब लोक तो चिवडीत बसतात. त्यावरून अतिशय दारिद्र्यावस्था येणें हा अर्थ. To be reduced to utter poverty.

उखळ पांढरें होणें— दारिद्र्य नाहींसें होण्याजोगें पुष्कळ द्रव्य मिळणें. To become rich.

उच्छाद आणणें— पराकाष्ठेचा उपद्रव देणें. To harrass.

उजेड पाडणें— मोठें कृत्य करणें. To set the Thames on fire.

फ्रेंच शिकून आतां मोठा उजेड पाडणार आहेत दिसतेंच आहे.

उंटावरचा शहाणा— मूर्खपणाची मसलत देणारा. या म्हणीच्या उपपत्तीविषयीं एक गोष्ट आहे. ती अशी:—एका माणसाचे घराचे अंगणांत पाण्यानें भरलेला एक रांजण होता. एके दिवशीं म्हशीनें पाणी पिण्यासाठीं आंत तोंड घातलें. तोंड कसें तरी आंत गेलें, पण शिंगें आंत अडकल्यामुळें तें बाहेर निघेना. तें बाहेर काढावयाचें कसें, हा मोठा प्रश्न येऊन पडला. दारावरून एक उंटावर बसलेला माणूस चालला होता. तो म्हणाला कीं, मला खालीं उतरावयास न लावतां माझ्या उंटासुद्धां मला आंत घ्याल तर मी उपाय सांगेन. त्याला आंत घेण्यासाठीं दरवाज्याची भिंत पाडावी लागली. तो शहाणा आंत गेल्यावर म्हणाला, ‘ म्हशीची मान कापण्याखेरीज याला दुसरा उपाय नाहीं. ’ रांजणांतून म्हशीचें तोंड तर निघालें पाहिजे म्हणून म्हशीचा मालक त्याही गोष्टीस कबूल झाला. म्हशीची मान कापली; पण तिची मुंडी रांजणांत अडकलेली तशीच राहिली. तेव्हां उंटावरचा शहाणा म्हणाला, ‘ आतां रांजण फोडला म्हणजे झालें. ’ त्याप्रमाणें केलें तेव्हां तें तोंड बाहेर निघालें. पण त्या शहाण्याच्या मसलतीच्या पायीं भिंत पडली, म्हैस मेली आणि रांजणही फुटला ! हाच रांजण अगोदर फोडला असता तर !

उठतां लाथ बसतां बुक्की— सदासर्वदा माराचा धाक.

उडत्या पांखराचीं पिसें मोजणारा– फार हुषार मनुष्य. A very clever fellow.

उणें उत्तर– उर्मटपणाचें किंवा दुसऱ्याचा मानभंग करणारें उत्तर. Saucy or disrespectful words.

उणें पुरें– विवक्षित प्रमाणापेक्षां कांहीं उणें (कमी). More or less.

आपल्या भेटीला उणें पुरें वर्ष होत आलें (म्ह० बहुतेक वर्ष होत आलें).

उंबर फोडून कॅंबरें काढणें– कॅंबरें म्ह० पंख असलेला एक क्षुद्र जंतु उंबराच्या फळांत असतो तो. त्यावरून लहानशा कामाचा अभिमान धरून त्यासाठीं मोठ्या कामाचा विध्वंस केला असतां ही म्हण लावतात. To injure a great cause for a small one.

उंबरठा चढणें– प्रवेश करणें.

चांगला सुतारसुद्धां तुमच्या शाळेचा उंबरठा न चढतां वीस पंचवीस रुपये सहज मिळवितो. –आगरकर.

उंबराचें फूल– उंबराचें फूल इतर झाडांप्रमाणें फळाचे बाहेर नसून आंत असतें. ह्मणून लोकांची अशी समजूत आहे कीं, त्याला फूलच नसतें. त्यावरून या म्हणीचा अर्थ कधीं न घडणारी गोष्ट किंवा न दिसणारी दिव्य मूर्ति असा झाला आहे. An angel-visitor.

उलटी अंबारी– हत्तीवरच्या अंबारीचा आकार असा असतो कीं, ती उलटी केली असतां भिक्षा मागण्याच्या झोळीसारखी दिसते. त्यावरून या ह्मणीचा अर्थ भिक्षेची झोळी असा झाला. A beggar's bag.

माझी कातड्याची पेटी व फराळाचें आणि चार धोतरें एवढें मात्र ...... बचावलें. नाहीं तर आजच उलट्या अंबारीच्या राज्याचा उपभोग घ्यावा लागला असता. –रंगराव.

ऊत येणें– दूध तापत ठेवलें असतां कांहीं वेळानें त्याचा वरचा भाग वाफेच्या योगानें वर उचलला जातो, त्याला ऊत ह्मणतात. यावरून मनोवृत्ति उचंबळणें, तिचा अतिरेक होणें हा अर्थ. Flow, flush, or effervescence.

रूसो-जपानी युद्धाचे वेळीं जपानांतल्या आबालवृद्धांच्या देशाभिमानाला खरोखरीच ऊत आलेला दिसला. –केसरी.

**ऊहापोह करणें**– ( ऊह=तर्करूप ज्ञान; अपोह=विपरीत तर्क. ) चर्चा करणें. To consider the pros and cons of a subject.

**एका पायावर तयार असणें**– फार उत्कंठित होणें.

**एका नावेंत असणें**– एका नावेंत बसलेल्या मंडळींपैकीं एकावर जें संकट तेंच बाकीच्यांवर संकट असतें, ह्मणजे सगळ्यांची सारखी स्थिति असते. यावरून सारख्या स्थितींत असणें हा अर्थ. To be in the same boat with.

हिंदु आणि मुसलमान–आपण सगळे–सध्यां एका नावेंत आहों–आपले हितसंबंध एक आहेत. मग आपण सख्ख्या भावाप्रमाणें प्रेमानें व एकदिलानें कां वागूं नये ?

**एरंडाचें गुऱ्हाळ**– ऊंस आणि एरंड दिसण्यांत सारखे असतात. ह्मणून कोणी एरंड चरकांत घालून त्याचें गुऱ्हाळ लावूं ह्मणेल तर त्यापासून उंसाच्या साखरेसारखी गोड साखर निघणें शक्य नाहीं. यावरून निष्फळ प्रयत्न असा अर्थ. A vain effort.

**ओ का ठो करतां येणें**– ( ' ओ ह्मणतां ठो येईना ' ही ह्मण पहा. )

संस्कृतामध्यें ओ का ठो करतां येत नसतांही हिंदुधर्माविषयीं सव्वा हात गप्पा झोंकणारे...कोणीं पाहिले नाहींत ? –निबंध०

**ओंफस होणें**– एखादी गोष्ट मध्येंच फसणें. ( रबराच्या फुग्याला कोठें भोंक पडल्याबरोबर आंत धरलेली हवा ' फस ' असा आवाज करून निघून जाते व फुगा निरुपयोगी होतो.) डबीस येणें.

मोठ्या थाटानें एखादें अवडंबर रचावें व लवकरच सगळें ओंफस व्हावें अशा प्रकारचीं उदाहरणें ...... अर्वाचीन इतिहासांतून सुद्धां आढळत नाहींत असें नाहीं.

**ओचंटो**– ( ओ ह्मणतां टो करतां येणें ही ह्मण पहा. )

वाचायला येण्याच्या नांवानें ओचं टो म्हटलें तरी चालेल. –पण लक्षांत०

**ओली आग**– जेव्हां पाण्याचे योगानें ( महापूर वगैरे येऊन ) लोकांवर संकट येतें, तेव्हां त्याला ओली आग म्हणतात.

**औषधाला नसणें**– कोणतीही वस्तु औषधाला कितीशी लागणार ? फारच अल्प प्रमाण पुरे होतें. पण तेवढेंही नसणें, अर्थात् अत्यंत अभाव सूचित होतो. ( मुळींच नसणें. ) Be wanting altogether.

तुमच्या चंचींत थोडासा कात असला तर द्या बरें ! छेः हो, अगदीं औषधाला नाहीं.

एकूण क्षेत्रफळ सारखेंच– गणितशास्त्रांत लांबी व रुंदी यांच्या गुणाकाराला क्षेत्रफळ म्हणतात. लांबींत थोडें कमी केलें व रुंदींत तितकें वाढविलें तरी क्षेत्रफळ पूर्वीच्या इतकेंच यावयाचें. यावरून एकीकडे कमी होऊन व दुसरीकडे तितकी वाढ होऊन एंकंदरीनें बरोबरी होणें. It amounts to the same thing.

कच्चींबच्चीं– कच्चीं = अपक्क; बच्चीं = मुलें. यावरून लहान मुलें असा अर्थ. Children.

जाऊं द्या; त्याच्याकडं पाहूं नका; त्याच्या कच्च्याबच्च्यांकडे पाहून त्याच्या अपराधाची क्षमा करा.

कडूं कारलें– कधीं न बदलणारा वाईट स्वभाव. कारलें हें फळ कडूं असतें आणि तें कितीही तुपांत तळलें किंवा साखरेंत घोळलें तरी त्याचा कडूपणा जात नाहीं, हें प्रसिद्धच आहे.

बाळ, तूं विठूची एवढी मनधरणी करूं नकोस. तो अगदीं कडूं कारलें आहे.

कडेलोट– परमावधि, शिकस्त, अतिरेक.

जॉन्सनची भ्रमावस्था स्थाईक होऊन मुळींच बुद्धिभ्रंश होईल कीं काय याची त्यास अतिशय भीति वाटे; पण ...... या कडेलोटावर केव्हांही गोट येऊन टेपली नाहीं.

—नि० मा०

कढी पातळ होणें– दुखणें इ० मुळें जर्जर होणें. To be pulled down.

कथा काय ?– कांहीं महत्त्व नाहीं. It is of no account.

शंभर रुपयेच मागतोना ? द्या फेंकून. मुलाच्या जिवापलीकडे शंभर रुपयांची कथा काय ! ( शंभर रुपये खिजगणतींत नाहींत असा अर्थ. )

करंगळी सुजली ह्मणून डोंगराएवढी होईल काय ?– ( करंगळी = कर + अंगुलि = हाताचें बोट ) हाताचे बोटानें खूप मोठें होण्याचें मनांत आणिलें तरी तें कधींही डोंगराएवढें होणें शक्य नाहीं. प्रत्येकाची वाढ मर्यादितच आहे हा अर्थ.

इंग्रज केवढे, आह्मी केवढे ! चालले आपले त्यांच्याशीं बरोबरी लावायला ! कर०

—केसरी.

**कर न करीचा वसा**– कर म्हणतील तें करावयाचें नाहीं, नको म्हणतील तें मात्र अवश्य करावयाचें असें वर्तन.

आयर्लंद जिंकल्यापासून आजपर्यंत इंग्लंदनें तेथें नुसता 'करनकऱ्याचा वसा' चालविला आहे. –आय० इति०

**करावें तसें भरावें**– जसें बरें वाईट कृत्य करावें तसें त्याचे बरे वाईट परिणाम भोगण्यासही तयार व्हावें. Reap as you sow.

**कलह उकरून काढणें**– भांडण उपस्थित होईल असें पूर्वीचें एखादें कारण शोधून काढून त्याचा उल्लेख करणें. To open old sores.

> धूर्ती द्रुपदसुतेतें मांडीवरि बैस ये म्हणे खल हा।
> खिजवुनि सभेंत काढित होता उकरुनि पुनःपुन्हां कलहा ॥ –मोरोपंत.

**कसपटाप्रमाणें मोजणें**– कसपट म्ह० गवताची काडी. अर्थात् क्षुद्र वस्तु. यावरून क्षुद्र समजणें–लेखणें हा अर्थ.

**कळस होणें**– कोणत्याही बऱ्या वाईट गोष्टीचा अतिरेक होणें. एखाद्या इमारतीवर कळस ठेविला म्ह० ती इमारत पुरी झाली, त्याप्रमाणें 'त्याच्या वैभवाचा कळस झाला' किंवा 'माझ्या दुःखाचा कळस झाला' या वाक्यांत वैभव व दुःख यांचें पूर्णत्व झालें, अतिरेक झाला, असा अर्थ निष्पन्न होतो.

अवरंगजेबाच्या कारकीर्दींत मोगल सत्तेचा अगदीं कळस झाला होता.

**कळी उमलणें**– मुद्रा प्रफुल्लित होणें. To look cheerful.

**काकुळतीस येणें**– करुणा भाकणें. साधुसंतांच्या कवितेंत या शब्दांचा उपयोग वारंवार केलेला आढळतो. To implore passionately.

> किती देवा येऊं तुम्हां काकुळती। काय या संचीतीं लिहिलें माझ्या ॥
> –नामदेव.

> तैसे नव्हों आह्मी विठोबाचे दास। यावें आणिकास काकुळती ॥
> –तुकाराम.

> आशा तृष्णा या सुसरी। बोढिताती या संसारीं ॥
> म्हणोनि येतों काकुळती। एकाजनार्दनीं विनंति ॥
> –एकनाथ.

**कां कूं करणें**– अनमान करणें. To hesitate.

आह्मीं कितीही कां कूं केलें तरी विद्याप्रसार हा होत जाणारच. –आगरकर.

**कांगावा करणें**– थोडें दुःख असतां रडून ओरडून अधिक भासविणें.

जिनें जो एक रट्टा सुंदरीचे पाठींत दिला, त्यानें ती पोर कळवळली, पण तें लक्षांत न घेतां ती आपल्या डोक्याला लागल्याबद्दलच कांगावा करूं लागली.

–पण लक्षांत.

**कांटा काढणें**–शल्य–दुःख देणारी गोष्ट–काढून टाकणें; दुःखाचें कारण अजीबाद नाहींसें करणें.

धर्माच्या हृदयांतिल काढिनतें मी समूळ कांटा हो। –मोरोपंत.

**कांट्याचा नायटा होणें**– कांटा मोडल्यावर वेळींच तो न काढल्यामुळें आंत शिरून त्या ठिकाणीं नायटा ( कातडीचा एक रोग ) होतो. ह्मणजे आरंभीं क्षुद्र दिसणाऱ्या गोष्टींचे पुढें मोठे हानिकारक परिणाम कधीं कधीं होत असतात. Little things sometimes lead to grave consequences.

**काडीनें औषध लावणें**– दुरून दुरून दुसऱ्याचे उपयोगी पडणें; उपयोगी पडण्यांत कुचरपणा करणें.

**काथ्याकूट करणें**– जिच्यापासून कांहीं फल नाहीं अशी व्यर्थ चर्चा करणें. To carry on an unprofitable discussion.

**कापूस महाग करणें**– कृश होणें. To be lean.

**कापूस सवंग ( स्वस्त ) करणें**– शरीरानें पुष्ट होणें. To grow fat or corpulent.

**कामास येणें**– उपयोगी पडणें; बखरींत लढाईंत मरून पडणें असा विशेष अर्थ आढळतो. जसें:– या लढाईंत ५०० माणसें कामास आलीं ( मारलीं गेलीं ).

**कास धरणें**– आश्रय करणें.

भगवंताची कास धरावी।
आणिक आस फशास रे॥

**कांहींच्या बाहींच**– ज्याला धरबंध–मर्यादा–नाहीं असें. Wild.

एकदां जें आमचें भांडण जुंपलें तें कांहींच्या वाहींच. [-पण लक्षांत०

काळीचें उत्पन्न- ( काळी=जमीन. ) जमिनीचा महसूल. Land-revenue.

काळें करणें- देशांतरास जाणें. To make oneself scarce; to abscond.

काळेंपाणी- हद्दपारीच्या शिक्षेचे कैदी जेथें ठेवतात ती जागा. जागा पुष्कळांना अज्ञात असल्यामुळें तेथील हवापाण्यासंबंधानें लोकांच्या विचित्र कल्पना असतात. हें 'काळेंपाणी' या शब्दावरून स्पष्ट दिसतेंच आहे. The place where prisoners condemned to transportation are sent.

किंतु येणें- संशय वाटणें. To have a misgiving.

किल्ली फिरविणें- भाषणादिकांच्या योगानें किंवा कांहीं गुप्त युक्तीनें एखाद्याच्या मनाचा कल पालटविणें. To work upon one's mind by some artful suggestion.

कीस काढणें- बारकाईनें चर्चा करणें. To discuss a subject threadbare.

झाली एवढी चर्चा पुरे आहे, अधिक कीस काढण्यांत काय अर्थ आहे?

कुई होणें- ( कोल्हेकुई शब्द पहा. )

'गनीम आला रे आला' अशी एकच कुई होऊन जो तो बावरेपणानें आपलीं हत्यारें व पोषाख गोळा करूं लागला. -पटवर्धनांचे पराक्रम.

कुत्रा हाल खाईना- अतिशय वाईट स्थिति आली असा अर्थ. कुत्रें फाटक्या जोड्यासारखी वस्तुसुद्धां खातें. पण त्याहीपेक्षां वाईट स्थिति असा अर्थ.

कुत्र्याचा पाय मांजरावर आणि मांजराचा कुत्र्यावर घालणें- लटपटी करणें. To use crooked devices.

कुत्र्याचें मूत- फटकन् शिवी द्यावी, वस्कन् अंगावर यावें अशा प्रकारच्या स्वभावाचा द्वाड मनुष्य.

रंगरावाचा वरिष्ठ अधिकारी म्हणजे शुद्ध कुत्र्याचें मूत आहे. त्याच्या हाताखालीं पांच वर्षे कशीं काढलीं असतील तीं त्याचीं त्यालाच माहीत!

**कुरमुरे किंवा चुरमुरे खाणें**– इच्छेविरुद्ध एखादी गोष्ट झाली असतां निरुपायास्तव मनांतल्या मनांत चरफडणें. To chafe at.

**कोड पुरविणें**– कौतुकानें हौस पुरविणें. To fondle.

**कोण्या झाडाचा पाला!**– काय मोठीशी प्रतिष्ठा! काय किंमत!

'सुभेदार! हंः सुभेदार म्हणजे कोण्या झाडाचा पाला! तें आम्ही ओळखीत नाहीं असें जाऊन सांग जा.' –नाट्यकथार्णव.

**कोलीत लावणें**– पेटलेल्या लांकडानें आग लावणें; कलागत लावून देणें.

लावूनि कोलीत। माझा करतील घात॥ –तुकाराम.

**कोळशांतलें माणिक**– अतिशय काळा मनुष्य. Black as soot.

**खडा टाकून ठाव पाहणें**– पाणी किती खोल आहे हें पाहणें झालें म्हणजे प्रथम खडा टाकून पाहतात. त्यावरून थोड्याशा गोष्टींत परीक्षा पाहणें हा अर्थ.

**खडा टाकून पाहणें**– पाणी किती खोल आहे हें खडा टाकून पाहत असतात. त्यावरून स्वकार्य साधण्याचा कितीसा संभव आहे ह्याचा अजमास पाहण्यासाठीं एखाद्यापाशीं हळूच गोष्ट काढून पाहणें हा अर्थ.

**खडान् खडा माहिती**– इत्थंभूत बारीक सारीक गोष्टीची सुद्धां माहिती. Knowledge of details.

दादांच्या मनांतली गोष्ट खडान् खडा समजावून घेऊन ती तुला कळविल्याशिवाय मी कदापि रहावयाचा नाहीं. –भोंतिपीडचरित्र.

**खंडीभर लेकरें**– (खंडी=वीस.) यावरून पुष्कळ असा अर्थ.

**खडे चारणें किंवा खावयास लावणें**– शरण येण्यास लावणें; फार हाल करणें. To humble.

दिल्लीपतीला सुद्धां डोईजड होऊन बसलेला जो दक्षिणचा निजाम त्याला सुद्धां मराठ्यांनीं खडे चारले मग इतरांची काय कथा!

**खडे फोडणें**– दूषणें देणें.

आईला जर कांहीं सांगेन म्हटलें तर त्या माझ्या नांवानें खडे फोडतील. –रंगराव.

खंत घेणें– प्रियजनाच्या वियोगामुळें मनाला दुःख होऊन वारंवार त्याचें स्मरण होणें. To pine.

मुलानें आईची फार खंत घेतली आहे.

खप्पी मंडळी– वस्ताद, सभंग, न भिणारी किंवा लाजणारी मंडळी. Shameless and cunning persons.

कांहीं अशी खप्पी मंडळी भेटते कीं स्वतः दुसऱ्याचें उपयोगी तर कधीं पडायचें नाहीं, पण दुसऱ्याचें मात्र आपल्या हक्काचें समजून स्वायत्त करतील.

खरडपट्टी काढणें– रागें भरून बोलणें. To scold.

खरपूस ताकीद करणें– निक्षून सांगणें. To tell one positively.

खरवड काढणें– चांगली खसखशीत कानउघाडणी करणें. To scold one severely.

खर्चास शेंडी फुटणें– ठरविलेल्या अंदाजावर खर्चाची रक्कम जाणें. Said of an expense exceeding the estimate.

खसखस पिकणें– मोठ्यानें व पुष्कळ हंसणें. ( हंसतांना खसखस् असा कांहींसा आवाज होतो, त्यावरून हा अर्थ निघाला आहे. खसखस म्हणजे अफूचें बीज याऱ्याशीं याचा संबंध नाहीं. ) To laugh wildly.

खळखळ करणें– हट्ट करणें. उदा० दामू शाळेंत जावयाला रोज फार खळखळ करतो.

खाऊन ढेकर देणें– गिळंकृत करणें; खाऊन मोकळें होणें. To misappropriate; to make one's own.

खाऊन पिऊन सुखी– सुखवस्तु; खाण्यापिण्याचा ददात नसलेला; मध्यम स्थितींतला. Well off.

खा खा सुटणें– खाण्याची एकसारखी इच्छा होणें. To be ravenous.

खापरतोंड– निपणतूचा मुलगा; मूळ पुरुषापासून सहावी पिढी. The sixth generation from the original ancestor.

खापर( डोक्यावर) फोडणें– फुटणें– एखाद्यावर निष्कारण चुकीचा

किंवा अपराधाचा आरोप करणें. To impute a wrong to an innocent person.

खार लागणें– झीज सोसावी लागणें. ( तीव्र खार कपड्यास लागला ह्मणजे कपड्याला भोंकें पडतात. ) To sustain a loss.

आपल्या या शहाणपणामुळें आज आमच्या खिशाला चांगलाच खार लागला आणि वरती चारचौघांत फजिती झाली ! – त्राटिका.

खाल्ल्याघरचे वासे मोजणें– ज्याचें अन्न खावें ( ज्याच्या उपकारांत बद्ध असावें ) त्याला जर वाईट स्थिति प्राप्त झाली, आणि त्याला घर विकण्याचा प्रसंग आला, तर किती किंमत येईल हें पाहण्याच्या दृष्टीनें त्याचे वासे मोजणें; अर्थात् त्याचें वाईट चिंतणें; निमकहराम होणें. To be false to the man whose salt one has eaten.

शिवाजीस माणसाची परीक्षा चांगली होती. त्यामुळें त्यानें हातीं धरलेल्या माणसाच्या पुत्रपौत्रांकडूनही...... खाल्ल्याघरचे वासे मोजण्याचें नीच कृत्य घडलेलें आढळत नाहीं. –नि० चं०

खिरींत सराटा– पुष्कळशा चांगल्यांत एखादें वाईट मिसळलेलें असतें तें. A dead fly in a precious ointment.

दामूला तुह्मीं आपल्यांत घेतलें हें वाईट केलें. तो ह्मणजे खिरींत सराटा आहे.

खोड ठेवणें– दोष शोधणें. To find fault with.

खोदखोदून विचारणें– एखादी गोष्ट काढून घेण्यासाठीं पुनः पुनः युक्तिप्रयुक्तीनें विचारणें. To put searching questions.

गची बाधा होणें– 'गर्व' या शब्दाचें पहिलें अक्षर 'ग' तें संकेतानें गर्वाबद्दल योजितात. गर्व होणें हा अर्थ. To be puffed up with pride.

गच्छन्ती करणें– पळून जाणें.

गजांतलक्ष्मी– दाराशीं हत्ती झुलण्याइतकी संपत्ति.

गट ( गट्ट ) करणें– गिळून टाकणें. मोठा पदार्थ किंवा मोठासा घोट घशाखालीं उतरतांना 'गट' असा आवाज होतो, त्यावरून गिळणें हा अर्थ. To gulp down.

धर्मावरि शल्य बळें, शल्यावरि धर्मराज करि लगट।
त्याला मद्रप वाटे आम्हां कौंतेय आजि करिल गट ॥

—मोरोपंत.

**गडप करणें**— गिळंकृत करणें; नाहींसें करून टाकणें.

कां पाटवितों ? कळतें जरि करिल व्यूहनद गडप यातें।

—मोरोपंत.

**गडबडगुंडा करणें**— काम चांगलें होवो कीं वाईट होवो, तिकडे लक्ष न देतां सरासरी गडबड करून तें उरकून घेणें. To perform a thing hurriedly and disorderly.

भाव आणि भक्तीचा गडबडगुंडा केला।
एकाजनार्दन पायीं मानभाव झाला ॥ —एकनाथ.

तो भट एका घटकेंत लग्नाचा गडबडगुंडा करून आटपून गेला.

**गंध नसणें**— मुळींच ज्ञान नसणें. To have not the least knowledge of.

यमे, तिच्या माहेरीं इंग्रजीचा कीं नवीन कसला गंध देखील नाहीं. —पण लक्षां०

**गपा ( गप्पा ) छाटणें**— गप्पा सप्पा—गोष्टी करणें.

बंधु विषधराशन परि साधु तुम्ही हि म्हणा भला खगपा।
आम्ही कवी, नवीना रीति नव्हे, छाटितोंचि लाख गपा ॥ —मोरोपंत.

**गम खाणें**— उतावीळ न होणें, धीर धरणें.

**गम्य असणें**— गम्य म्हणजे थोडेंसें ज्ञान. Some little knowledge.

**गयावया करणें**— दीनवाणी प्रार्थना करणें. To supplicate.

असें म्हणून व पुष्कळ गयावया करून मीं त्याचा राग शांत केला. —पण ल०

**गर्भगळित होणें**— भयभीत होणें; भीतीनें गरोदर स्त्रियांचा गर्भ गळतो. त्यावरून हा अर्थ झाला. To be terror-stricken.

**गवऱ्या मसणांत जाणें**— मनुष्य मेलें ह्मणजे त्याच्या दहनविधीसाठीं मसणांत ( श्मशानांत ) गवऱ्या पाठवितात. यावरून मृत्युकाल जवळ असणें हा अर्थ. Nearing death.

गळ घालणें– आग्रह करणें.

नानाला आमची मुलगी करा म्हणून रावोपंत भारीच गळ घालीत आहेत.

गाढवाचा खरारा– मूर्ख मनुष्य.

गाढवाचा नांगर फिरणें– जमीनदोस्त करणें. To raze to the ground.

गादीला पाय लावणें– राजा किंवा गुरु यांची गादी पूज्य मानतात. तिला पाय लावणें ह्मणजे त्यांचा फार अपमान करणें. यावरून गादीच्या मालकाविरुद्ध बंड करणें हा अर्थ. To rebel against.

गाय गोंवणें– हिंदु जातींत स्त्रिया सर्वस्वी पुरुषावर अवलंबून राहणाऱ्या असल्यामुळें त्यांची स्थिति दीनवाणी आहे, हें दाखविण्यासाठीं बायकांना गाईची उपमा देतात. यावरून गाय० ह्मणजे मुलीला सुख लागणार नाहीं अशा ठिकाणीं तिला देणें असा अर्थ.

गाय होणें– To be humble.

गांवगुंड– हा शब्द गारुड्यास जिंकण्यासाठीं त्याची विद्या शिकणारास मूळ लावीत. त्यावरून कोणतीही विशेषशी विद्या न शिकतां दुसऱ्यास जिंकण्यांत प्रवीण, अर्थात् लबाड्या करण्यांत प्रवीण असा अर्थ झाला. The village-champion.

गांवचा नसणें– कांहींएक संबंध न दाखविणें. To pretend to be not concerned in.

गांवीं नसणें– लक्ष नसणें.

गाशा गुंडाळणें– निघून जाणें. गाशा हा शब्द उर्दू आहे; त्याचा अर्थ 'बिछाईत वगैरे सामान' असा आहे. एक गांव सोडून दुसऱ्या गांवीं जातांना बिछाना गुंडाळून घ्यावा लागतो. यावरून गाशा गुंडाळणें ह्मणजे निघून जाणें असा अर्थ प्रचारांत आला.

पुण्यांतले लोक चांगले व्यवहारज्ञ आहेत, ते आपल्या नादीं लागणार नाहींत, अशी खात्री होतांच, स्वामींनीं तेथून आपला गाशा गुंडाळला. –नि० मा०

गाळण उडणें– एका काळीं अनेक संकटें प्राप्त झाल्यामुळें मनुष्याची दुःस्थिति होणें. To be distressed.

**गाळण होणें**– त्रेधा उडणें, भीतीनें गांगरून जाणें. To be terror-stricken.

**गाळीव मूर्ति**– अट्टल सोदा. A past master in craftiness.

**ग्रामकेसरी किंवा ग्रामसिंह**– कुत्रें.

**गुंगारा देणें**– फसवून पळून जाणें.

**गुण उधळणें किंवा पाघळणें**– दुर्गुण प्रकट करणें. To manifest one's evil propensities or qualities.

पत्र पुरतें झाल्यावर सदाशिवराव म्हणाले, 'हे आपल्या मातुश्रींनीं कसे गुण उधळले पहा!' –रंगराव.

**गुलगुल गोष्टी**– हळूच आणि कानास गोड लागतील अशा रीतींनें चाललेल्या गोष्टी. Words of blandishment.

**गुलाबाचें फूल**– नाजूक स्त्री किंवा पुरुष. A delicate person.

बाईसाहेब, हें ऊन फारच कडक आहे बरें. अशा उन्हांत आपली नाजूक काया करपेल. आपण आपलें हें गुलाबाचें फूल घरांत नेऊन जपून ठेवा. –त्राटिका.

**गुलाबी थंडी**– गुलाबाचा वास जसा उग्र नसून मंद पण सुखदायी असतो, त्याप्रमाणें थोडीशी थंडी जी सुखावह वाटते, तिला ही संज्ञा देतात. थंडीची थोडीशी झुळूक. Mild coldness of weather.

**गूळखोबरें देणें**– लहान मुलांना गूळ खोबऱ्याची (कोणत्याही खाऊची) लालूच दाखविली म्हणजे तीं वाटेल त्याच्या नादीं लागतात. त्यावरून लालूच दाखवून फसाविणें हा अर्थ. To allure into; to beguile.

**गोत्यांत आणणें**– संकटांत घालणें; निष्कारण खर्चांत आणणें.

**गोमाजी कापशे**– अमकाच मनुष्य विवक्षित नसतां सामान्यत्वेंकरून कोणीही पुरुष. Somebody; some Dick or Jack.

हे मोठे गोमाजी कापशे येथें आले आहेत बोलायला!

**गोंडा घोळणें**– लाभासाठीं पुढें पुढें करणें; खुशामत करणें. To flatter.

घटका घालणें– आतां मरतो कीं घटकेनें मरतो अशी अवस्था होणें. To be in the last agonies of death.

घडा भरणें– इयत्ता पुरी होणें. To be ripe for reward or punishment.

त्याच्या पापाचा घडा भरला म्हणजे देव त्याला शिक्षा करीलच करील.

घड्याळ टिपरू– तिखट आणि भाकर. A poor meal.

घर धुवून नेणें– सर्वस्वाचा अपहार करणें. To take away one's all.

घर बसणें– घरांतला कर्ता मनुष्य नाहींसा होऊन कुटुंबास विपत्ति येणें. To sink by misfortune.

घर बुडविणें– सर्व कुळाचा घात करणें.

रावणाचें घर बुडविलें सारें । त्याचीं रांडापोरें मारियेलीं ॥ –तुकाराम.

घर भरणें– फायदा करून घेणें.

घर ह्मणून ठेवणें– पुढें लागेल ह्मणून संग्रहास ठेवणें. To keep in stock as a reserve.

घरांत वाजे नकारघंटा– दारिद्र्य असणें, घरांत कांहीं नसणें.

उद्योगी व प्रामाणिक माणसाला उदरनिर्वाहाची पंचाईत पडूं नये पण असें नसून ‘घरांत वाजे नकारघंटा’ अशी एखाद्या राष्ट्राची स्थिति असली...... तर तें राष्ट्र भिकारच ह्मटलें पाहिजे. –निबंधमाला.

त्याचा प्रपंच हीन करंटा ।
घरांत वाजे नकारघंटा ।
मुलें भुकेनें करिती तंटा ॥

–अमृतराय.

घरींदारीं सारखा– यांत घरीं म्हणजे स्वतःच्या घरीं आणि दारीं म्ह० लोकांच्या दारीं असा अर्थ.

घालून पाडून बोलणें– ज्यास बोलावयाचें त्याचें नांव न घेतां त्याला आपणास उद्देशून बोलतात असें वाटण्याजोगें भाषण करणें. To censure a person by innuendo.

आमच्या आजीनें आईला अगदीं लेकीसारखें केलें......कधीं घालून पाडून बोलली नाहीं. –पण लक्षांत.

घृतकुल्या मधुकुल्या–तूपसाखरेची समृद्धि; चमचमीत आणि सुग्रास भोजन. A sumptuous dinner.

घोडें थकणें–नुकसान वगैरे लागल्यामुळें किंवा सामर्थ्य नसल्यामुळें उद्योगधंदा मंदावणें.

घोडें पुढें ढकलणें–फायदा करून घेण्यासाठीं पुढें सरसावणें; हौसेचें तट्टू पुढें सारणें. To ride one's hobby.

घोडें पुढें दामटणें–इतरांच्या पूर्वी आपला कार्यभाग साधून घेण्याचा घाईनें प्रयत्न करणें.

घोडें पेंड खातें–ओलांडून जाववत नाहीं अशी अडचण. घोड्याला पेंड चारली असतां त्याच्या अंगांतली तरतरी नाहींशी होऊन तो सुस्त बनतो व अडचणीच्या जागेवरून उडी मारून त्याला जातां येत नाहीं. यावरून हा सं० निघाला.

घोडें मारणें–नुकसान करणें; पूर्वीच्या काळीं सडका, आगगाड्या वगैरे झाल्या नव्हत्या, तेव्हां घोडें हें प्रवासाचें मुख्य साधन होतें. तें मारणें म्हणजे मोठें नुकसान करण्यासारखें होतें. To do a wrong to.

'तूं माझ्याशीं अबोला कां धरला आहेस ! मीं तुझें असें काय घोडें मारलें आहे तें कळूं दे.'

आपण नशिबाचं काय असें घोडें मारलें होतें कीं त्यानं आपणांस तुरुंगांत टाकावें ! –विकारवि०

घोड्याएवढी चूक–मोठी चूक. A gross blunder.

आमच्या मतें सुरजमल जाटाची पोक्तपणाची सल्लामसलत झुगारून देण्यांत भाऊसाहेबांच्या हातुन घोड्याएवढी चूक झाली.

घोरपड–हा एक चिकाटी धरणारा असा प्राणी आहे. अलंकारिक अर्थानें हा शब्द एखादें मोठें लचांड अशा अर्थानें योजतात. केव्हां केव्हां स्त्रियांसंबंधानें तिरस्कारार्थी याचा उपयोग होतो.

'त्या मामलेदारावर घोरपड येऊन तो निघाला.'

रघुनाथ काय आपला भरारी मुलगा ! त्याच्या गळ्यांत असली घोरपड पडली तर तो कोणीकडे भरकटेल याचा नेम नाहीं. –वाजी०

घोरपड येणें– संकट प्राप्त होणें. To be in trouble.

चकारशब्द– पुढें आणखी कांहीं एक बोलावयाचें तें. 'मी आतां बोललों तें बोललों; यापुढें तुमच्यासंबंधानें मी चकारशब्दही बोलणार नाहीं.' या वाक्यावरून वरील शब्द कोणत्या अर्थी वापरतात याचा बोध होईल.

एखाद्या वर्ण्यव्यक्तीविषयीं लिहावयाचें म्हटल्यास त्याचे आनुषंगिक माहितीविषयीं चकारशब्दही काढूं नये अशी आमची स्थिति आहे. –वि० ज्ञा० वि०

चक्री गुंग होणें– अक्कल गुंग होणें. To be confounded or non-plussed..

चंग बांधणें– मी अमुक एक गोष्ट करीन, असें ठासून सांगणें; ब्रीद बाळगणें. To profess.

एखाद्या मर्त्यानें मी अमुक वर्षे जगेन असा चंग बांधणें हा केवळ मूर्खपणा होईल.

चंडाळ (किंवा चांडाळ) चौकडी– दुष्ट माणसांची जूट. A band of black guards.

चढती किंवा उतरती कमान– उत्कर्षाची किंवा अपकर्षाची स्थिति.

चंदन करणें–नाश करणें. Demolition; devastation.

पेंढाऱ्यांनीं गांव लुटून चंदन केलें.

चऱ्हाट वळणें– चऱ्हाट म्ह० लांब व जाड दोरी. यावरून लांबच लांब कंटाळा आणण्याजोगी गोष्ट सांगणें. To tell a long-winded tale.

अहमद याप्रमाणें आपलें लांबलचक चऱ्हाट वळीत असतांना दोन घटका निघून गेल्या. –उषःकाल.

चवाट्यावर आणणें– उघडकीस आणणें; जाहीर करणें. To make known to the public; to expose.

चालत्या गाड्यास खीळ घालणें– सुरळीतपणें चाललेल्या कामांत विघ्न करणें. To interrupt the smooth working of.

चावून चिकट– घासाघीस करीत कंटाळा आणणारा. Obstinate.

चाळा लावणें– नाद किंवा छंद लावणें.

चाळा लावूनि गोविंतोसी। दावूनिया लपसी।
लेंपोनि केउता जासी। ऐसी माव न करी आह्मांसी रे गोविंदा॥

—ज्ञानदेव.

**चिटं पांखरूं**— लहान पांखरेंसुद्धां; कोणीही. ( चिट० नसणें ह्म० पूर्ण स्तब्धता, शांतता, शून्यता असणें ).

यमुनेच्या विस्तीर्ण तीरावरील घाटावर मी एकटाच पडलों होतों. माझ्याशिवाय तेथें चिटपांखरूंसुद्धां कोणी नव्हतें. मासिकमनोरंजन.

**चिटपांखरूं नसणें**— पूर्ण शांतता असणें. Utter stillness or solitude.

**चिरीमिरी घेणें**— बक्षीस घेणें.

तार घेऊन आलेला शिपाई चिरीमिरी घेतल्याशिवाय जाईना. —रंगराव.

**चुकल्या चुकल्या सारखें होणें** एखादें मनुष्य किंवा वस्तु यांचा अभाव लक्षांत येऊन चित्ताला अस्वस्थता प्राप्त होणें. To miss; to be out of sorts.

**चुटपुट लागणें**— मनाची टोंचणी लागणें. To fret for.

( कोण आलें होतें ) तें पक्केपणीं समजून येईपर्यंत मनाला मोठी चुटपुट लागावयाची —पण लक्षांत.

**चुरमुरे खाणें (किं० चुरमुऱ्याचे लाडू खाणें )**—पाण उतारा झाल्यामुळें किंवा केलेलें कृत्य पदरांत घातल्यामुळें निरुत्तर होऊन गप्प बसणें. To fret at; to sit hungering.

**चुलींतून निघून वैलांत पडणें**— आगींतून निघून फोपाट्यांत पडणें. To fall out of the frying pan into fire.

**चोराला सोडून संन्याशाला सुळीं देणें**— खऱ्या अपराध्याला सोडून निरपराधी माणसाला शिक्षा करणें.

**चोरी असणें— होणें**— चोरी ह्मणजे चोराचें कर्म; त्यावरून साशंकपणा असणें; करावयाचें तें कोणाला न कळत केलें पाहिजे. उघडपणें करतां येत नाहीं अशी स्थिति असणें हा अर्थ.

श्रीमंतांना जवळ पैसा व लत्ताकपडा असून त्यांचा उपभोग घेण्याची चोरी झाली होती. —गुज० इति०

चौकोनी चिरा– जिकडे घालावा तिकडे उपयोग होण्यासारखा हुषार मनुष्य. A fellow handy and clever, ready for whatever turns up; a square fellow fitting every company.

जगत्शेटीचा नातू– जगत्शेट हें पूर्वीच्या कोणा श्रीमान् सावकाराचें नांव होतें. तें आतां या ह्मणींत उपरोधिक अर्थानें उपयोगांत आहे; गरीब निराश्रित मनुष्य.

जगांतून उठणें– १ लोकाचाराविरुद्ध वागणें; २ सर्वस्वी बुडणें (वैधव्यामुळें).

विश्वासराव ह्मणाला, 'आई काय सांगूं? तुझी वेणी जगांतून उठल्यासारखी झाली!' –रंगराव.

जंगजंग पछाडणें– शिकस्तीचा किंवा कमालीचा प्रयत्न करणें. To make strenuous efforts.

त्याच्या मनांतली गोट काढून घेण्यासाटीं जंगजंग पछाडलें, पण तो दाद लागूं देत नाहीं.

नार्मन लोकांनीं जंगजंग पछाडलें, पण त्या रंगदार द्वीपस्थांनीं आपला गुण ह्मणून सोडला नाहीं. –केसरी.

जड पारडें– तराजूच्या ज्या पारड्यांत पदार्थ ठेविला असतो तें रिकाम्या पारड्याहून जड असतें. यावरून ज्याच्याजवळ संपत्ति आहे असा मनुष्य हा अर्थ. A substantial person.

जड बुडाचें माणूस– वजनदार किंवा श्रीमंत, लौकिकवान् मनुष्य.

जन्माची भाकर जन्मभर मिळणारी भाकर. Provision for life.

जिभेवर असणें– बोलून जाण्याच्या अगदीं तयारींत असणें. To be on the tip of one's tongue.

जळत घर भाड्यानें घेणें– धोका आहे हें प्रत्यक्ष दिसत असतां त्यांत पडणें. To be concerned in a highly dangerous affair with open eyes.

**जमीनअस्मानाचें अंतर**– फारच अंतर! As wide asunder as the poles.

वृद्ध तरुणांच्या आचारविचारांत कालमानानें व शिक्षणभेदानें थोडाबहुत फरक होतो, पण त्यामुळें त्यांत जमीनअस्मानाचें अंतर पडतें असें नाहीं.
–आगरकर.

**जळत्या घराचा पळता वासा**– जळत असलेल्या घरांतून एक वासा काढला तेवढाच लाभ! दिवाळखोराच्या इस्टेटींतून जें काय हातीं लागेल तेवढेंच. ('पळता' याचे जागीं 'पोळता' असाही पाठ आहे व तो अधिक चांगला दिसतो.) A penny in the pound.

**जाडें प्रकरण**– धेंड; असामान्य मनुष्य. A big man.

कृष्णशास्त्र्यास ज्या प्रतिपक्ष्याशीं झुंजावयाचें होतें तें फार जाडें प्रकरण होतें.
–वि० ज्ञा० वि०

**जातीवर गेला**– येथें जात=मूळ स्वभाव. To revert to one's nature.

**जीव कीं प्राण करणें**– अत्यंत प्रेम करणें. आपला जीव सर्वांस फार प्रिय असतो. जिवाइतकी एखादी वस्तु प्रिय असणें.

सर्वांत मोठी दुःखाची गोष्ट म्हणजे ही कीं, जीवर तो (जॉन्सन) जीव कीं प्राण करीत असे........ती त्याची आवडती बायको मरण पावून तो पुनः सडाचा सडाच राहिला.
–नि० मा०

**जीव खालीं पडणें**– काळजींतून मुक्त होणें.

**जीव टांगणीस लागणें**– टांगला असणें=एखाद्या वस्तूवर प्रीति बसणें. To set one's love on.

**जीव थोडा थोडा होणें**– अतिशय काळजी लागणें, आतुरता उत्पन्न होणें. To be sinking under; to be extremely solicitous about.

**जीव देणें**–आत्महत्या करणें. To commit suicide.

**जिवाचा धडा करणें**– (धडा=निश्चय.) To make a resolve.

जिवांत जीव आहे तोंपर्यंत– जिवंतपणीं, जिवंत आहे तोंपर्यंत. During one's life.

माझ्या जिवांत जीव आहे तोंपर्यंत मी तुला सोडून चार दिवस देखील रहाणार नाहीं. —पण लक्षांत०

जिवांत जीव घालणें– धैर्य देणें. To revive one's courage.

जिवांत जीव येणें– गेलेलें धैर्य पुनः येणें. To revive lost strength or courage.

जिवावर उड्या मारणें– दुसऱ्यावर अवलंबून चैन करणें. To indulge oneself in dependence upon the life of another.

पण कुलक्षयाच्या भीतीनें जिवाचा धडा तरी मला केला पाहिजे. —गुप्तमंजूष.

जिवावर उदार– जीव केव्हां धोक्यांत घालील याचा नेम नाहीं– जिवाची भीति ज्याला वाटत नाहीं– जीव खर्ची घालण्यास तयार असा. Reckless of life.

जिवावरचा प्रसंग–जीव जाण्यासारखें संकट. Jeopardy of life.

जिवास खाणें– मनाला लागणें, त्याच गोष्टीचें सर्वदा चिंतन करून झुरणें. To prey upon.

जेवावयाला जाणें आणि तोंड विसरून येणें– ज्या कार्याकरितां जावयाचें त्याचें मुख्य साधनच विसरणें.

जोजो करणें– निजणें–निजविणें. लहान मुलांना निजवितांना या पद्या गाणें ह्मणत असतात. त्याचें पहिलें चरण 'बाळा, जोजो रे ।' असें आहे. त्यावरून ही ह्मण प्रचारांत आली. To go to sleep; to put a child to sleep.

जोडे फाडणें– खेटे घालणें. To pay frequent visits for one's interest.

ज्याचें नांव तें– मुर्खींच.

'मुलगा किती हो द्वाड ! ज्याचें नांव तें ऐकत नाहीं !'

तिला लग्नाबद्दल मीं पुष्कळ गळ घालून पाहिली. तिकडूनही बराच आग्रह झाला. पण ज्याचें नांव तें हिचें एकच उत्तर ! —मूकनायक.

झांकलें माणिक- बाहेरून डौल न घालणारा, पण खरोखर गुणी मनुष्य. A man of worth though of unostentatious appearance.

झेंडा नाचविणें- मोठें कृत्य केलें असें जाहीर करणें. (पूर्वी एखादी मोठी कामगिरी करून आल्यावर दाराशीं झेंडा घेतलेल्या लोकांना नाचविण्याची चाल होती.) To set oneself up as a great personage.

टकमक पाहणें- आश्चर्यानें पहाणें. To gaze at.

टकमक पहात होते प्रभुमुखचंद्राकडेचि चातकसे। -मोरोपंत.

टक्केटोणपे खाणें- ठेंचा खाणें. To get knocks, bruises &c.

हॅम्लेटमधला पोलोनियस हा व्यवहारांत उपयोगी पडणाऱ्या ह्मणी जाणणारा व टक्केटोणपे खाऊन शहाणा झालेला असा ह्मातारा आहे. -नि० चं०

ट फ करणें- अक्षरओळख होणें; एखाद्या विषयाचें अल्प ज्ञान होणें.

विद्यालयांतून जे संस्कृतज्ञ बाहेर पडतात त्यांना ट फ करण्याचें सामर्थ्य आलें न आलें पुरे, कीं लगेच कोणत्याही शास्त्रावर व्याख्यान, निबंध वगैरे सुरू झालेच. -नि० मा०

टंगळ मंगळ करणें- कामचुकारपणा करणें, कोणतेंही काम मनापासून न करणें, कामाचा आळस करणें. To do a thing dwadlingly; to dilly-dally.

जे आपल्या कामाची टंगळ मंगळ करतात, त्यांना यश येत नाहीं. -वि०ज्ञा०वि०

ट ला ट जुळविणें- अक्षराला अक्षर जुळविणें.

असे ट पुढें येणार आहेत हें जर त्या कवीला माहीत असतें तर त्यानेंही ट ला ट जुळविण्याचे श्रम घेतले नसते. -मूकनायक.

टळटळीत दुपारां- ऐन दुपारीं. In the fervid flaming noon.

टळटळीत दुपारां। जन्मला रामराणा ॥

टाकणें टाकणें- नुसता उपचार करणें; औपचारिक गोष्ट ह्मणूनच करणें. To go through the form of.

मी पक्वान्न घेत नाहीं हें त्याला ठाऊक आहे; पण उगाच टाकणें टाकायला आला होता.

टाकून बोलणें– अपमानकारक शब्द बोलणें. To give an insult by words; to abuse.

टाळूवर मिरें वाटणें– एखाद्यावर अधिकार गाजविणें. To exercise absolute sway over.

डोक्यावर केंस न ठेवणें– पुरी हजामत ( लाक्षणिक रीतीनें खरडपट्टी ) करणें. To scold one vehemently.

दुरदुर लावणें– थोडा वेळपर्यंत कर्तृत्वाची ऐट मिरविणें. To make a flash or brilliant show for a short period.

टेंभा पाजळणें– डौल मारणें, ( टेंभा=काठीस चिंध्या गुंडाळून त्याचा काकडा करतात तो; दिवटी. )

'मी चंव करीन, त्यंव करीन' अशी बडबड करून निजामानें आपल्या कर्तृत्वाचा मोठा टेंभा पाजळला होता; पण बाजीरावाच्या लष्कराचा किल्ल्यासभोंवतीं वेढा पडतांच, त्याचे चांगले डोळे उघडले.

टेंभा मिरविणें– दिमाख दाखविणें. To make a show of.

पुष्कळांना परोत्कर्ष अगदीं सहन होत नाहीं, व आपलाच जिकडे तिकडे टेंभा मिरवावा असें वाटत असतें.
—वि० ज्ञा० वि०

टाव घेणें– खोली पहाणें; मनाची परीक्षा करणें. To fathom; to sound.

टाव ना ठिकाण– पत्ता नसणें. Not to know one's whereabouts.

डबघाईला येणें– (डफ+घाई.) डफावर गाणें ह्मणतांना गाणें संपण्याचे वेळीं डफ फार घाईनें वाजवितात. यावरून ड० ह्मणजे नाशाची वेळ जवळ येऊन ठेपणें असा अर्थ. To be on the point of sinking or ruin.

स्कॉटलंडाच्या मुसाफरीत अनेक वेळां समुद्रावर वादळ सुटून होडी डबघाईस आली होती.

डांगोरा / धांडोरा पिटणें }– जाहिर करणें. To proclaim.

पिकली पंढरी पीटिला धांडोरा । केणें आलें घरा सभागियांच्या ॥
पुराणें डांगोरा पिटितीं । चिंतनें उद्धार सर्व गती ॥
न लगे नेम नानायुक्ती । नाम चिंता श्रीरामाचें ॥ —एकनाथ.

तुझिया थोरपणा विह्नि असावें कवणें शंकावें रायासी । प्रत्यक्ष जनीं वाटली नारी तिचें स्मरण लोकांसी । पुराणीं डांगोरा पिटती हें पतिव्रतापण नये-सीरया ॥ —ज्ञानदेव.

डावें उजवें कळणें— डावें ( वांकडें ) कोणतें आणि उजवें ( सरळ ) कोणतें हें कळणें ( व्यवहारज्ञान ). Practical wisdom.

या ब्राह्मणाला डावें उजवें कांहीं कळत नाहीं. हा अगदीं सरळ माणूस आहे.

डाळ शिजणें— दाद लागणें, अक्कल चालणें.

जेथें संस्कृत कवितेची डाळ शिजत नाहीं तेथें मराठी कवितेची गोष्टच बोलाव-यास नको.

डाळ शिजूं देणें— चालूं देणें. To give a scope; to allow one a free hand in an affair.

माझें लग्न होण्यापूर्वी वेगळं निघण्यासाठीं तिनें नाना तऱ्हेच्या खटपटी केल्या, पण तिची डाळ कोणीं शिजूं दिली नाहीं. —पण लक्षांत०

डोंगरचे आंवळे व सागरचें ( समुद्राचें ) मीठ— या दोघांची एकत्र गांठ पडण्याचा संभव फार कमी; पण लोणचें घालतांना ती गोष्ट घडते. यावरून असंभवनीय गोष्टीसुद्धां केव्हां केव्हां घडतात हा अर्थ. Improbabilities become sometimes realities.

डोंगर पोखरून उंदीर काढणें— मोठे प्रयास करून फार थोडी कार्य-निष्पत्ति होणें. Much ado about nothing ( *cf.* the mountain was in labour and brought forth a mouse. )

तहान लाडू भूक लाडू— तहान व भूक शांत करण्यासारखे फराळाचे जिन्नस वगैरे.

त्या वीरमातेनें दोघांस जवळ बसवून पाठीवर हात फिरवून त्यांच्या हातीं तहान० दिले. —बाजीराव.

तंबी देणें— दटावणें; शिक्षा देण्याच्या धाकानें सावध करणें. To chastise.

तळपट होणें– नाश होणें. To be utterly ruined.

धर्मासि ह्मणे ' हं, या, मांडा उकलुनि रम्य तळपट, हो ' ।
कृष्णाहि ह्मणे, ' मेल्या अक्षकरांचें समूळ तळपट हो ' ॥

—मोरोपंत.

तळीराम गार करणें– जवळ द्रव्य जमवून मनाची तृप्ति करून घेणें. ( बहुधा दुसऱ्याच्या द्रव्याचा अपहार केला असतां ही ह्मण योजितात. )

ताकापुरतें रामायण– आपलें कार्य साधण्यापुरते आर्जव. ( एक बाई ताक करीत होती आणि दुसरी एक बाई ताक मागण्याला आली होती. ताक होईपर्यंत या दुसऱ्या बाईनें रामायणाची कथा सांगितली. ताक हातांत पडतांच एकदम कथा आटोपली. )

ताकास जाऊन भांडें लपविणें– दुसऱ्याचे घरीं ताक मागावयास तर जावयाचें पण भांडें लपवून न्यावयाचें; ह्मणजे एखादें कृत्य करण्यांत अंग ठेवावयाचें, पण आपल्या वरची जबाबदारी टाळण्याचा यत्न करावयाचा; अथवा याचना तर करावयाची, पण ती आशा सफळ होण्याविषयीं उदासीनताही दाखवावयाची.

ताज्या घोड्यावरच्या गोमाशा– जोंपर्यंत एखाद्याची भरभराट आहे तोंपर्यंत त्याच्या पुढें पुढें करणारे स्तुतिपाठक. Parasites; summer-friends.

ताटाखालचें मांजर– पूर्णपणें अंकित किंवा ओशाळा.

आह्मी राज्यकर्ते आहों आणि सैरन्ध्री आमच्या ताटाखालचें मांजर आहे.

—कीच०

तापल्या तव्यावर भाजून घेणें– एका कार्यांत अनायासें दुसरें कार्य करून घेणें. एकदां तवा चांगला तापला असला ह्मणजे त्यावर एकामागून एक पुष्कळ भाकरी भाजतां येतात.

तांबडें फुटणें– अरुणोदयाचे वेळीं आकाशाला तांबूसवर्ण चढतो, त्यावरून अरुणोदयाची वेळ हा अर्थ. The break of dawn.

ना ह्मणतां ताकभात समजावा– तर्कानें कोणतीही गोष्ट चटकन् ओळखावी. A straw will show which way the wind blows.

**तारे तोडणें**– वेड्यासारखें भाषण करणें; किंवा लिहिणें. Foolish talk or writing.

टेबलापाशीं बसून हवे तसे तारे तोडणारांच्या तर्व्येतीप्रमाणं समाजाची गति होत नसते. –आगरकर.

**ताळ सोडणें**– धरबंद नसणें. To go out of control.

हे! सासूबाई काय म्हणतील? म्हणतील यांनीं अगदीं ताळच सोडला. काय, बायकांना घेऊन एका ठिकाणीं काय बसतात! –पण लक्षांत०.

**तिखटमीठ लावून सांगणें**– पदरची कांहीं कल्पना घालून चटकदार बनवून एखादी गोष्ट सांगणें; अतिशयोक्ति करून सांगणें. To embellish.

मृगांकमाले, तूं मात्र अधन्य खरी! तुझ्यानें आपलें प्रेम तिखट मीठ लावून सांगणें होणार नाहीं! यास्तव तूं अशीच स्तब्ध रहा. –नाट्यकथार्णव.

**तुणतुणें वाजविणें**– एखादी क्षुल्लक गोष्ट पुनः सांगत सुटणें; लोकांनीं वाईट ह्मणून ठरविलेलें मत पुनः पुनः प्रपादणें. To reiterate.

देशांत किती जोरानें विचारक्रांति चाललेली आहे, याची या लोकांस दादच नाहीं, आपलें प्रायश्चित्ताचें तुणतुणें तें अद्याप वाजवीतच आहेत.

**तूट पडणें**– कमती येणें. To fall short of.

**तैलबुद्धि**– ज्याप्रमाणें तेलाचा एक थेंब पाण्यांत पडला असतां तो एक-दम पसरून सगळी जागा व्यापतो, त्याप्रमाणें विषयांत किंचित् प्रवेश झाल्याबरोबर त्या सगळ्या विषयाचें आकलन करण्यास समर्थ अशी बुद्धि. A ready understanding.

**तोरा मिरविणें**– दिमाख दाखविणें.

**थंडा फराळ**– नुसती हवा खाऊन राहणें; हवा थंड असते, ती खाऊन राहणें ह्मणजे उपाशी राहणें.

तुम्ही फार झालें तर आजापणजापर्यंत पितरांचा समाचार घेतां; पण पणज्यांच्या बापाची वाट काय? त्यांनीं थंडा फराळ करून नित्य दिगंबर असावें कीं काय– –आगरकर.

**थुंकी झेलणें**– श्रीमंताचे तोंडांत थुंकी आली असतां ती घेण्यासाठीं पिकदाणी किंवा दुसरें कांहीं पात्र पुढें करणें हें काम त्याची हांजी हांजी करणारे आश्रित करीत असतात. यावरून हांजी हांजी करणें हा अर्थ.

जानकीबाईनें साऱ्यांच्या पुढें पुढें करावें, सावित्री बाईची तर तिनें जशी थुंकी झेलावी, पण त्या निर्दय सावित्रीबाईला दया येईल तर रामाचें नांव! —रंगराव.

थेर करणें— आपल्या नांवलौकिकाची चाड न धरतां चोरी, दुर्भाषण इ० वाईट गोष्टी अतिशय करूं लागणें. To begin dissolute or evil practices.

'याचा धंदा कांय? तर रंग पाहून थेर करायचा.' —विकार०

दगडाखालीं हात सांपडणें— अडचणींत सांपडणें, (दगडाखालीं हात सांपडला ह्मणजे तो युक्तीनेंच काढून घ्यावा लागतो. दांडगाईनें काढतां येत नाहीं.) To fall into some painful predicament.

दगडावरची रेघ— न फिरणारे (न खोटे ठरणारे) शब्द. Irreversible words.

हा मुलगा अशा गुणांनीं धुळीचे दिवे खात जाणार, ही दगडावरची रेघ मी लिहून देतों पहा!

दडी देणें— लपून बसणें.

दम मारणें— झुरका घेणें. उदा० चिलमीचा दम मारल्याशिवाय त्यास चैन पडत नाहीं. To take a pull or whiff.

दहीं खाऊं कीं महीं खाऊं— (मही = ताक) हें करूं कीं तें करूं या विषयींचा निश्चय न होणें. To shilly-shally; to hesitate.

दाणे टाकून कोंबडे झुंजविणें— कित्येक लोकांना कोंबड्या कोंबड्यामध्यें झुंज लावून गंमत पाहण्यांत हौस वाटते. ते समोरासमोर दोन कोंबडे उभे करून मध्यें दाणे टाकतात व ते दाणे खाण्यासाठीं कोंबडे आवेशानें येऊन भांडूं लागतात. यावरून मुद्दाम पदरचें खर्चून भांडण लावून देणें हा अर्थ. To be so fond of quarrels as to incur expense to effect them.

दादाबाबा (दादापुता) करणें— गोड बोलून व कुरवाळून मन वळविणें.

दिवसाढवळ्या— भरदिवसां. In broad day-light.

दिवसा मशाल लावणें— व्यसनाचे पायीं पैशाची उधळपट्टी करणें.

**दिवे लावणें**- दुर्लौकिक संपादन करणें. To become notorious.

तूं मोठी शहाणी आहेस तें आहे ठाऊक ! जा आतां आपल्या शहाणपणाचे काय दिवे लावावयाचे असतील ते नवऱ्याच्या घरीं लाव ! — नाट्यकथार्णव.

**दिव्यानें रात्र उजाडली**- सगळ्या रात्रभर दिवा लावून बसलों. झोंप घेतली नाहीं. To wake all the night.

**दीड दमडीचा शिपाई**- अगदीं हलक्या दर्जाचा शिपाई (तिरस्कारार्थी हा शब्द योजतात.)

**दुःख वेशीस बांधणें**- वेशीला बांधलेली वस्तु सर्वांना दिसावयाची- यावरून सर्वांना कळविणें हा अर्थ. To proclaim a grievance to the whole world.

**दुःखावर डागण्या देणें**- दुःख पावलेल्या मनुष्यास मर्मभेदक भाषणानें आणखी दुःख देणें. To apply salt to a sore.

**पडचाकर**- चाकराचा चाकर.

**पडजीभ**- जिभेच्या मागें दुसरी लहान जीभ दिसते ती.

**पडलंका**- एक रावणाची लंका, व दुसरी तिच्याही पलीकडे लांब असलेली लंका.

**पढतमूर्ख**- पढलेला- शिकलासवरलेला असून कार्याकार्याचा विचार न करतां मूर्खासारखें वागणारा. A learned fool.

**पंढरीची वारी**- वारकरी म्हणून जे विठोबाचे भक्त आहेत ते दर आषाढी कार्तिकी एकादशीला पंढरपुरास विठोबाच्या दर्शनाला जातात त्याला पंढरीची वारी म्हणतात. यावरून सामान्यत्वें करून वारंवार होणारी खेप असा अर्थ. Periodical visits.

चांगला अभ्यास न करतां वकिलीच्या परीक्षेस जाणें म्हणजे पंढरीची वारी करणेंच आहे.

**पणांत येणें**- वयांत येणें. To come of age ; to enter into the teens.

मुलगी पणांत आली.

पथ्यावर पडणें– पथ्य म्हणजे दुखणेकरी, बाळंतीण यांचें त्यांच्या स्थित्यनुरूप हितावह भोजन. यावरून हितावह होणें हा अर्थ. To be beneficial.

एकंदरींत पाहता आमच्या नव्या लोकांची चाल ही दिसते कीं, पथ्यावर पडण्यापुरती मात्र ते सुधारणा उचलतात. –निबंध०

सुदर्शन राजा आजच्या आज रात्रीं येथें येणार काय? सर्वोत्कृष्ट आहे! या स्वारीचें येणें आपोआप माझ्या पथ्यावर पडतें आहे. –अतिपीड०

पदरचा माणूस– आपल्या आश्रितांपैकीं माणूस. A man belonging to one.

पदरचें घालणें– मुळांत नसतां आपल्या कल्पनेनें एखाद्या ग्रंथांत घालणें; भरती करणें. To interpolate.

परसांतली भाजी– परस म्हणजे घराभोंवतालची उघडी जागा. या जागेंत भाजी वगैरे लाविली असतां ती हव्या त्या वेळीं काढतां येते. त्यासाठीं कष्ट करावे लागत नाहींत. यावरून प० म्हणजे कांहीं श्रम न करावे लागतां सहजगत्या होणारी गोष्ट. A thing easy of performance.

पवाडे ( पोवाडे ) गाणें– स्तुति करणें. To sing praises.

पळतें पीक– फळझाडांचा शेवटचा बहार; कोणत्याही व्यापारधंद्यांतला शेवटचा नफा. यावरून पुढें मिळण्याविषयींचा निश्चय नाहीं, आज आहे तो खरा असता फायदा. A present but fugitive good.

पाऊस म्हणतो मी– एकसारखा विपुलतेनें पाऊस पडतो हा अर्थ. There is abundance of rain.

पांग फिटणें– अन्नवस्त्राविषयींची काळजी दूर होणें. यावरून सामान्यतः कोणत्याही प्रकारची उणीव दूर होणें.

बहु जन्मांचा तो लाग। फिटला पांग जन्मांजन्मीं ॥ –एकनाथ.

पांग फेडणें– पांग = अन्नवस्त्राविषयींची चिंता; यावरून पुढें कोणत्याही अवश्यक गोष्टीचा उणेपणा भरून काढणें अशा अर्थी हा सं० योजतात.

आपल्या उपदेशाप्रमाणें वागणारे कांहीं लोक निघतील व देशाचे पांग फेडतील......असें समर्थास वाटलें असावें. -वि० ज्ञा० वि०

**पागोटें गमावणें**– केलेल्या व्यवहारांत नुकसान लागणें.

**पागोट्याची लाज धरणें**– स्वतःच्या नांवलौकिकाची चाड बाळगणें. To have due regard about one's own reputation.

**पागोट्याचे पेंच गळ्यांत येणें**– केलेलें कर्म अंगावर येणें. To suffer from one's own folly or misdeed.

**पांघरूण घालणें**– झांकण्याचा यत्न करणें. To cover over or hush up.

**पाड नसणें**– ( पाड=योग्यता. ) कःपदार्थासारखा असणें. To be as nothing before.

त्या अल्प समुदायाचा त्या मुसलमानी सेनासमूहापुढें कांहीं पाड नसे. -गुज० इति०.

**पांढऱ्यावर काळें करणें**– ( पांढऱ्या कागदावर काळ्या शाईनें ) लिहिणें. To reduce to writing.

ज्यांस पांढऱ्यावर काळें करतां येत नव्हतें ते हल्लीं मानसशास्त्राच्या गोष्टी सांगूं लागले आहेत. -ओक.

**पाढा वाचणें**– सविस्तर हकीकत सांगणें. To tell the particulars of.

**पाणी ओळखणें ( जोखण )**– अंगांत कितीशी ताकद, विद्वत्ता, धैर्य इ०. गुण आहेत तें पाहून ठेवणें. To discern the virtue or value of; to try the mettle of.

**पाणी पडणें**– व्यर्थ होणें; तेज नाहींसें होणें. ( विस्तवावर पाणी पडल्यानें त्याच्यांतलें तेज–त्याची उष्णता–जाऊन तो निरुपयोगी होतो. त्यावरून हा सं० आला असावा. )

आमच्या धंद्यांत तर सगळेंच काम सूर्य करतो आहे. तेव्हां अर्ध्या श्रमाच्या संगोपनासाठीं जर सरकार उद्युक्त आहे आणि आमचे सर्व श्रमावर जर पाणी पडत आहे तर सरकारानें आमचा अर्ज अवश्य मंजूर केला पाहिजे. -ग. ज. आगाशे.

वाईट नादामुळें त्याच्या गुणावर सपशेल पाणी पडलें आहे. -विकारवि०

पाणी पाणी होणें– रक्ताचें पाणी होणें ह्म० अतिशय मेहनत करावी लागणें. To undergo much toil or suffering.

'हें कठोर मांस झडून जाईल तर किंवा याचें पाणी पाणी होईल तर किती बहार होईल ! –विकारविलसित.

पाणी भरणें– नोकराप्रमाणें हात जोडून उभें राहणें, घरांतलीं सगळीं कामें करणें, वश असणें.– To be a slave of.

'उद्योगाचे घरीं ऋद्धिसिद्धि पाणी भरी' ॥

पाणी मुरणें– भिंतींत जेथें पोकळ जागा असते तेथें मोरीचें वगैरे पाणी सांचतें. यावरून कांहीं वैगुण्य असणें हा अर्थ. To have an unsound spot.

पाण्याचा कांटा मोडणें– अग्निसंयोगानें तें किंचित् उष्ण होणें. To take off the chill of water.

पाताळयंत्री– पाताळापर्यंत ( फार खोलपर्यंत ) ज्याचें यंत्र ( मसलत, धोरण ) पोंचतें असा गूढ मनुष्य. Deep, close or unfathomable.

एकदम पन्नास रुपयांची नोट तुझ्याजवळ आली कुठली ! बडा पाताळयंत्री दिसतोस तूं ! कुठें लग्गा साधलास वाटतं ! –जग हें०

पानें पुजणें– पानावर थोडेंसें नांवाला वाढणें.

पान न हलणें– झाडाचें पान हलण्याला यत्किंचित् तरी वारा लागतो. त्यावांचून तें कार्य होत नाहीं. यावरून कोणतेंही कार्य न होणें हा अर्थ झाला.

उदा० त्याच्यावांचून पान हालत नाहीं. He is indispensable.

पारावार नसणें– (पार=पलीकडचा+अवार=अलीकडचा कांठ ) मर्यादा नसणें. To know no bounds.

पिकलें पान– पिकलेलें पान केव्हां गळून पडेल याचा नेम नसतो. त्यावरून ज्याचे केंस पिकले आहेत ( पांढरे झाले आहेत ) व ज्याच्या मरणाचा काळ केव्हां येईल याचा नेम नाहीं असा जख्ख वृद्ध मनुष्य. Green old age.

पुख्खा झोडणें– स्वतः श्रम न करतां, मिळालेल्या अन्नावर यथेच्छ हात मारणें, अशा अर्थी हा सं० वापरतात. To stuff one's self with food.

हरिभाऊचें काम, ह्मणजे सकाळ संध्याकाळ मामाच्या घरीं पुरव्या झोडाचा आणि गांवभर भटकत फिरावें.

**पुंगी बंद करणें**– स्तब्ध बसायला लावणें, To put to silence.

एखाद्या लुच्च्याची टकविद्या जाणून त्याची पुंगी बंद केली असतां त्याचा माथा फिरतो....... –नि० मा०

**पुडीस जाणें**– संन्याशाच्या जेवणाला पुडी ह्मणतात. यावरून जेवणास जाणें हा अर्थ. To go to dine.

वृद्ध संन्यासी हरणाच्या कातड्याचे जोडे पायांत घालून ओवळे न होतां पुडीस जातात. –आगरकर.

**पुढें तिखट मागें पोचट**– आरंभीं मोठ्या वल्गना करणारा आणि मागून कृतीच्या वेळीं माघार घेणारा. One who boasts at the outset and yields soon after.

**पेढे चारणें**– फसविणें.

वेडा ह्मणतां ह्मणतां वैशाखराव आह्मांलाच पेढे चारणार ? –फाल्गुनराव.

**पैजेचा विडा उचलणें**– अमुक कार्य मी करीन अशी प्रतिज्ञा करून दरबारांत विडा उचलणें. To set to work vigorously and determinedly.

**पैठणी आदर–प्रेम–आग्रह**– पोकळ आदर; वरकरणीं केलेला आदर –प्रेम इ० Hollow compliments.

'मल्लिके, त्याच्या वचनावर भरंवसा टेवूं नको. त्याचें तें सगळें पैठणी प्रेम आहे.' –विकारविलसित.

**पैशाचा धूर निघणें**– घरांत श्रीमंती येणें. To be exceedingly rich.

**पोटचा गोळा**– मूल ( विशेष प्रीतीची वस्तु ); नऊ महिने पोटांत वाळगिलेल्या मुलावर आईची विशेष प्रीति असते, हें उघडच आहे. One's own child.

'स्वामीभक्तीसाठीं पन्ना दाईनें आपला पोटचा गोळाही बळी दिला.'

हलक्या समजुतीचे लोक एखाद्या निर्जीव वस्तूप्रमाणें पोटच्या गोळ्याचा विक्रय करतात. –नि० चं०

पोपटपंची करणें– अर्थ न कळतां पाठ केलेलें ह्मणून दाखविणें.

पोळी पिकणें– कांहीं दिवस सुग्रास मिळण्याचा योग प्राप्त होणें. To get into good living.

प्रताप–गुण–उधळणें– अंगचे दुर्गुण प्रकट करणें.

'त्यांच्या शहाणपणाचा प्रताप त्यांना वरांत उधळूं दे; बाहर नको त्याचा प्रभाव जायला.' –विक्टोरिवि०.

प्रस्थ करून ठेवणें–माजविणें– एखाद्याचें नसतें महत्त्व वाढविणें. To set up grand pretensions for; to make an imposing display.

प्रस्थान करणें– ठेवणें = जावयास निघणें. To set out.

प्राणांतिक अवस्था– प्राणोत्क्रमण होतें कीं काय अशी भीति वाटण्यासारखी स्थिति. A perilous condition.

फट ह्मणणें– धिक्कारार्थ यत्किंचित् दुःशब्द बोलणें. To speak to one reprovingly.

फडशा चालविणें– संहार किंवा नाश करण्याचा क्रम ठेवणें. To destroy.

अनेक दुर्मतांनीं, दुराग्रहांनीं व दुराचारांनीं महारोगाप्रमाणें या देशाच्या बुद्धीचा, नीतीचा व शरीरसामर्थ्याचा हजारों वर्षें फडशा चालविला आहे. – आगरकर.

फत्ते होणें– जिंकणें; यशस्वी होणें. To win.

फरारी होणें– पळून जाणें. To decamp.

फशीं पाडणें– फसवून अडचणींत गुंतविणें. To entrap.

मनाजी पाटील देहगावचा।
विश्वास धरूं नका याचा।
हा घात करील नेमाचा।
पाडील फशीं ॥१॥ –एकनाथ,

फाटक्या अंगाचा– रोड; कृश.

फांटा देणें– तोडणें. To dismiss.

फांटा फुटणें– डोक्यांत वेड शिरणें. To get crazy or cracked.

फांटे फोडणें / फांया फोडणें }– अडचणी उपस्थित करणें. To make difficulties.

फारकत होणें— निराळे होणें. To be divorced from.

ज्यांच्या मनांत समाजाचें कल्याण व्हावें असें असेल ते वृद्ध तरुणांत फारकत व्हावी असें कधींही चिंतणार नाहींत. —आगरकर.

फावड्यानें-खोऱ्यानें पैसे ओढणें —पुष्कळ पैसे मिळविणें; To roll in wealth; to have an enormous income.

फुटका मणि नसणें
फुटकी कवडी ,, —अतिशय दारिद्र्य असणें.

फुटक्या तिनीसांजा— ऐन संध्याकाळीं. ( सांज = संध्या ).

फुटाणें भाजणें— फुटाणें भाजण्याचे वेळीं हरभरे तापलेल्या भट्टींत घालावे लागतात, यावरून जुलूम करणें, गांजणें हा अर्थ.

फुटाण्यासारखा उडणें— रागामुळें त्वरेनें कांहीं कार्यास प्रवृत्त होणें. To be touchy.

फुली घालणें— व्यत्यय करणें. शरीरांतल्या एखाद्या दर्दाचें पाऊल पुढें पडूं नये ह्मणून त्या भागावर चिबव्याची फुली घालतात. यावरून वरील अर्थ निघाला असावा. To obstruct one's course; to put forth objections to a proposal.

फुलें विकलीं (वेंचलीं) तेथें गोवऱ्या विकणें— ज्या ठिकाणीं मोठ्या प्रतिष्ठेनें काळ घालविला, त्या ठिकाणीं हलकींसलकीं कामें करण्याचा प्रसंग येणें.

फुसकुली सोडणें— दुसऱ्याचे मर्मी लागेल असें भाषण स्वतः समोर न येतां आडून करणें.

फू करणें— उधळपट्टीनें खर्च करणें.

बजबजपुरी करणें— घोंटाळा-चुथडा-करणें. To make a mess of.

धर्माभिमानी ह्मणविणाऱ्या उच्च वर्णांतल्या स्त्रीपुरुषांनीं धर्माची अशी बजबजपुरी करणें योग्य आहे काय ? —आगरकर.

बडिजाव ( बडेजाव ) करणें— हिंदुस्थानी भाषेंतला मूळ शब्द बढ-जाव ह्म० पुढें चला असा आहे. यावरून एखाद्याचा बडे० ह्मणजे त्याची प्रतिष्ठा वाढेल असें करणें; गौरव करणें हा अर्थ.

बट्टू होणें– कलंकित होणें.

बंब वाजणें–बंब हा० वाजंत्र्याच्या संबळाबरोबर बों असा सूर देणारें वाद्य. दुर्लौकिक होणें. To acquire notoriety.

बभ्रा करणें– बोभाट करणें; गुप्त ठेवण्याची गोष्ट सर्वांस जाहिर करणें. To give notoriety to a thing.

बलबलपुरी– बजबजपुरी माजणें हा संप्र० पहा.

राजे लोक ऐषआरामी झाले ह्मणजे... ( त्यांच्याजवळ ) चांगल्यांची चूज नसते, यामुळें सगळी बलबलपुरी होऊन जाते. –बाजी०

बलबलपुरी होणें– गोंधळ होणें. To be thrown into disorder and tumult. Also बलबलपुरी आणि हमटम राज्य.

बस्तान बिघडणें– फारशी भाषेंत 'बस्तान' याचा मेळ, जम, बस असा अर्थ आहे. त्यावरून 'ब० बिघडणें' ह्मणजे केलेली व्यवस्था फुकट जाणें, घडी बिघडणें असा अर्थ. Upsetting the arrangement..

बाऊ करून ठेवणें– भीति वाटण्यासारखें महत्त्व देणें. To make a great fuss of.

बाऊ वाटणें– भीति वाटणें. ( लहान मुलांना भिवविताना 'बाऊ' या शब्दाचा उपयोग करतात. ) To get frightened..

ज्या लोकमताचा पुष्कळांस बाऊ वाटतो, त्याचा बऱ्याच बाबतींत आदरापेक्षां अनादर करणें हाच श्रेयस्कर मार्ग होय. –आगरकर.

बांगडी फुटणें– स्त्रियांचे पति वारले असतां त्यांच्या बांगड्या फोडतात. यावरून पति मरणें–वैधव्य येणें, माणसें मरणें हा अर्थ.

'किल्ला हस्तगत होतां दिसत नाहीं. मनुष्य फार कामास आले. नऊ लाख बांगडी फुटली.' –पेशव्यांची बखर.

बाजार करणें– अपेक्षित वस्तु बाजारांत विकत घेणें. To go a-marketing.

बाजू राहणें– अब्रू किंवा नांव राहणें. } To save one's name.
,, राखणें– ,, ,, राखणें.

परशुरामभाऊंच्या ( क्षत्रियास साजेशा ) या वर्तनानेंच पटवर्धनांची थोडी बाजू राहिली. —पट. पराक्रम.

बाड झोंकणें— गप्पा मारणें. To spread a gossip.

बाणा मिरविणें— अभिमान व्यक्त करणें. To profess.

अनंतराव हॅम्लेट नाटकांतलें मर्म काय तें आम्हांस कळलें आहे असा नेहमीं बाणा मिरवीत असतात.

बापशेटीची पेंड— ( बापशेट नांवाच्या श्रीमान् व उदार गृहस्थाच्या नांवावरून ही म्हण पडली आहे. ) हवें त्यानें खुशाल न्यावी अशी वस्तु.

बार भरणें— पढवून ठेवणें. To instruct a person.

बिऱ्हाड उचलणें— तळ हालविणें; निघून जाणें.

बिऱ्हाड करणें— ठाणें देणें.

बिलंदर लुच्चा— अट्टल सोदा. An arch-rogue.

रमाकांत कारभारी हा बिलंदर लुच्चा असल्याकारणानें त्याचे पक्षास बरेच लोक होते. —नि० चं०

बुद्धि फांकणें— डोक्यांत गोंधळ होणें. To get bewildered.

बुद्धीस ( शीं ) वैर करणें— अमकी गोष्ट आतां केली तर बरी असें मनांत आलें असतांही त्याची उपेक्षा करणें. To delay in complying with the good suggestions or impulses of one's own mind.

बुधवारी पंचा— अगदीं आंखूड जेमतेम गुडघ्यापर्यंत पोंचणारा पंचा. हे पंचे पुण्यास बुधवार पेठेंत मिळत यावरून हें नांव पडलें असावें.

बेंड फुटणें— गोप्य बाहेर पडणें. To be divulged.

बोऱ्या उडणें— फजीती होणें. To be disgraced.

बोल ठेवणें— दोष ठेवणें. To blame.

म्हणे म्यां कैसा अन्याय केला ।
बोल ठेवूं कवणावरी ॥

बोलण्यावर जाणें— बोलण्यावर विश्वास ठेवणें.

त्याच्या बोलण्यावर जाऊं नका. तो वेडा आहे.

बोलांत बोल नसणें– बोलण्यांत मेळ नसणें. Not to be consistent in one's speech.

बोलवाला होणें– उत्कर्ष होणें.

बोल लावणें– दोष लावणें–देणें.

वदुनि असें गहिंवरला महिवर लावूनि बोल भावास। –मोरो०

बोळवण करणें– निरोप देणें, रवानगी करणें.

बोळ्यानें दूध पिणें– अगदीं लहान मुलांना स्वतः दूध पितां येत नाहीं ह्मणून बोळ्यानें दूध पाजावें लागतें. त्यावरून स्वतःची अक्कल नसल्यामुळें दुसऱ्यानें शिकविलेली अक्कल घेणें हा अर्थ.

हें पहा, मी कांहीं बोळ्यानें दूध पीत नाहीं अशी फसायला. –नाटिका.

ब्रीद पाळणें– एखाद्या गुणांत श्रेष्ठता मिळविल्याचें चिन्ह ह्मणून हातांत दोरा बांधतात त्याला ब्रीद ह्मणतात. त्यावरून ब्रीद पाळणें ह्म० तो गुण खरा करणें. To make true the pretentions set up.

अनाथासी संभाळावें। ब्रीद पाळावें आपुलें॥ –एकनाथ.

भट्टी साधणें– स्वयंपाक करतांना अग्निसंस्कारानें पदार्थावर जो परिणाम होतो तो इष्ट नितक्या प्रमाणांत झाला म्हणजे त्याला भट्टी साधली असें ह्मणतात; यावरून चांगला परिपाक होणें हा अर्थ.

'आमच्या पंतांसही ककावली लिहितांना खूपच भट्टी साधली, त्यांनही शेवटच्या पंधरा सोळा केका लिहितांना.' –निबंध०

भर करणें– आपलें अहित करून घेऊन दुसऱ्यास सर्वस्व देऊन टाकणें. आपण स्वतः खाल्लें नाहीं, दानधर्मही केला नाहीं; शेवटीं चोराची मात्र भर केली.

भर देणें– उत्तेजन देणें.

भरारी मारणें– फार जलद प्रवास करणें.

राघोबादादांनें अबदल्लीना मूड घेण्याताठीं दक्षिणेतून अटकेपर्यंत भरारी मारली.

भरीं भरणें– मी कोण, करतों काय, इत्यादि गोष्टींचा विचार न ठेवतां एखाद्याचे नादीं लागणें. To be led away.

शक म्हणे 'व्यर्थ भरीं हा, त्यजुनि विचार तर्क, विघ्न भरे'।
वत्सा! तुम्हा शरांनीं केला क्षमभहि अर्क विभ्रम रे॥ –मोरोपंत.

भरीस पडणे— एखादी गोष्ट किंवा काम करण्याचें पत्करून तत्प्रीत्यर्थ नेहमीं उद्योगांत असणें; अभिमानास पेटणें.

भाकड कथा— एका कथेच्या पोटांत दुसरी कथा सांगतात ती, हा मूळचा अर्थ; यावरून रिकामपणीं सांगतात ती निरुपयोगी गोष्ट असा अर्थ. Idle talk.

भांगेमध्यें तुळस— वाईट आईबापांच्या पोटीं चांगली संतति. A good shoot from a bad stock.

भिकेचे डोहाळे होणें— दारिद्र्यादि दुर्दशा येण्यापूर्वी तद्‌नुरूप पूर्वीच्या संपन्न स्थितीस विरुद्ध वासना होणें. ( ज्या प्रकारची संतति व्हावयाची असते त्या प्रकारच्या वासना गर्भारपणीं बायकांना होतात. त्याला डोहाळे म्हणतात. ) To have beggarly desires.

भिजत कांबळें ( घोंगडें ) ठेवणें— एखादी गोष्ट निकालाला न लावतां तशीच पडून राहूं देणें. ( कांबळें लोंकरीचें असल्यामुळें तें फार वेळ पाण्यांत ठेवल्याशिवाय भिजत नाहीं. )

भिजत कांबळें ( घोंगडें ) पडणें— कोणतेंही काम तडीस न लागतां लांबणीवर पडणें. To lie suspended.

भिक्षेश्वरी किंवा लक्षेश्वरी—भिक्षा मागणारानें दोन घरें जास्त मागितलीं म्हणजे त्याची चंगळ होते, किंवा जो लक्षाधिपति असतो त्याची चंगळ असते. आधल्यामधल्यांचे मात्र हाल पुसूं नयेत.

भीक घालणें— मोजणें, मानणें. (भिकारी दाराशीं आला असतां भिक्षा देण्याइतकी त्याची पात्रता आहे अशी खात्री झाल्याशिवाय विचारी माणूस त्याला कांहीं देत नाहीं. यावरून योग्यता जाणणें हा अर्थ.) To care for ; to attach weight to.

बायकोच्या धमकावणीला कां तुम्ही भीक घालणार ! — कां० मो०

थोरांचें पाठबळ असलें ह्मणजे मग काय ? तुंग्यातुंग्या लोकांस कोण भीक घालतो ? —जग हें०

भीड घालणें } आर्जव, स्तुति वगैरे उपायांनीं अनुकूलता मिळविणें.
भिडेस „ } To urge one upon one's consideration for us.

भीड धरणें— दुसऱ्याचा मनोभंग होऊं नये ह्मणून जपणें. To hold one in some regard; to treat one with respect.

भिडले भीड लेशहि मनिं न धरुनि, ते शल्य, वायुज, गदीश ।
पडले मूर्च्छित; त्यांचें हित वदले देउ आयु जगदीश ॥ —मोरो०

भीड भिकेची बहीण— दुसऱ्याचा मनोभंग होईल या भीतीनें स्वतःच्या मनाविरुद्ध वागणें याचें नांव भीड धरणें. अशी भीड धरण्याचे वारंवार प्रसंग येत गेले तर लवकरच मनुष्य भिकेला लागेल असा अर्थ.

भुताटकीचें घर— ज्या घरांत भुतें, पिशाचें नांदतात असें घर. A haunted house.

भोग येणें— दैववशेनें सुखदुःखादि नशिबीं येणें. The good or evil of life.

आलिया भोगासी असावें सादर । —तुकाराम.

भोवऱ्यांत सांपडणें—( भोंवरा=वावटळ, धुळीची मंडलाकृति होते ना ) अडचणींत गुंतलें जाणें. To fall into perplexity.

भोळा सांब ( शंकर )— कोणीही भोळा मनुष्य. A guileless and unsuspecting person.

भंडार उधळणें— स्तुति करणें.

भ्रमाचा भोपळा— जवळ खरोखर ऐवज नसतां, तो असण्याचा आव मात्र दिसतो असा मनुष्य; जींत कांहीं राम किंवा तथ्य असेल असें बाह्य स्वरूपावरून वाटतें, पण खरोखर आंत कांहीं नसतें अशी पोकळ वस्तु. A substantial looking yet hollow thing.

भ्रमाचा भोपळा फुटणें— एका माणसाला आपल्या घराच्या तळघरांत एक वाळलेला भोपळा सांपडला. त्यांतल्या बिया खळखळ वाजत होत्या. त्या माणसाला वाटलें कीं, आपल्या आजोबांनीं यांत मोहरा भरून ठेवल्या असतील, म्हणून द्रव्याच्या भ्रमानें त्यानें तो पुष्कळ दिवस फार जपून

ठेविला. एके दिवशीं द्रव्याची गरज लागली ह्मणून तो फोडून पाहतो तों वाळलेल्या बिया! यावरून एखाद्या गोष्टीपासून मोठा लाभ होईल हा भ्रम एकाएकीं दूर होणें असा अर्थ झाला. To be disabused (said of a mind.)

आपल्या अंगचा दुर्गुण कितीही झांकला तरी अखेर भ्र० फुटून फजीती हीं व्हावयाचीच! — शं. मो. रानडे.

मक्ता घेणें— एखादी गोष्ट आपण करूं अशी हमी देणें.

आम्ही तुह्मांस सुशिक्षित करूं, असा आह्मीं कांहीं मक्ता घेतलेला नाहीं.

मखलाशी करणें— सरकारांतून दिलीं जाणारीं इनामपत्रें, करारनामे, कौलपत्रें, इत्यादि लिहून तयार झालीं ह्मणजे तीं मंजुरीसाठीं वरिष्ठ अधिकाऱ्यांकडे जातात व ते त्यांत कमजास्त केल्यानंतर मंजूर केल्याची निदर्शक म्हणून त्यांवर कांहीं खूण स्वहस्तें करतात त्यास मखलाशी ह्मणतात. यावरून सुधारणा करणें, मजकुरांत कमज्यास्त करून गोष्टीला इष्ट स्वरूप देणें इ० अर्थ झाला. To make the necessary changes before passing or sanctioning; varnishing.

अहो! जें मनांत होतें तें एकदम बाहेर पडलें. आतां किती जरी कलाकुसरी आणखी मखलाशी केली तरी मी फसायची नाहीं. —जग हें०

मट्ट्यास येणें— फार चालण्यानें किंवा श्रम केल्यानें थकणें; To be spent or exhausted with fatigue.

मधुमक्षिकेचें व्रत— (मधुमक्षिका=मधमाशी) मधमाशी प्रत्येक फुलांतला चांगला भाग (मध) गोळा करते, वाइटाकडे कधीं पाहत नाहीं. त्यावरून कोणत्याही ठिकाणीं चांगलें आढळेल तेवढें घेण्याचा निश्चय हा अर्थ. A resolve to pick up anything good from all quarters.

मन पाहणें— मनाची परीक्षा करणें. To sound the mind; to probe the mind.

मन बसणें— आसक्त होणें; अतिशय आवडणें. To be devoted to; to have the affections set upon.

मन मानेल तसें करणें– इच्छेस येईल तसें करणें. To follow one's own inclination or desire.

मन मिळणें– एखाद्या गोष्टीविषयीं अनेकांचा एकभाव होणें. To be of one mind.

मन मोठें करणें– उदारपणा धारण करणें. To act generously.

मनावर घेणें ( धरणें )– एखाद्या कामाविषयीं अगत्य वाटणें. To put one's heart in.

मनांत एक, जनांत एक– मनांत एक गोष्ट असतां बाह्यतः ती निराळीच दाखविणें; अर्थात् कपटी–दुटप्पी–वर्तन. Double-dealing.

मनांत गांठ बांधणें– मनांत गोष्ट पक्की ठेवणें. To commit carefully to mind.

मनांतल्या मनांत जळणें– आंतल्या आंत चरफडणें– To burn with ( jealousy, malice, or rage. )

मनांत (मनीं) मांडे खाणें–व्यर्थ मनोरथ करणें; आपणाला असा लाभ होईल, मग आपण अमकी गोष्ट करूं अशा कल्पनेंत तरंगणें. To build castles in the air.

सगळा आशेचा खेळ ! हीच आशा जर नसती तर भावी सुखाचे मांडे मला खातां आले नसते. –पण लक्षांत०

मनांतून उतरणें– पूर्वी आवडत असलेली वस्तु किंवा गोष्ट मागाहून कांहीं कारणामुळें नावडती होणें. To get out of one's good graces.

मनास येणें– आवडणें, पसंत होणें. To meet with the approbation.

' वाक्बाई, पाटिलीन का भावजय ? येते का मनास ?' असें तो गृहस्थ त्या मुलीला उद्देशून म्हणाला. –पण लक्षांत.

मरण नाहीं– शंका नाहीं. उदा० हा घोडा विकल्यास पांचशें रुपयांस मरण नाहीं स० पांचशें रुपये येतील यांत शंका नाहीं. There is no ground for apprehension.

**मरत मढ्यासारखा**– कृश व निःशक्त. Lean as Death.

**मरतां मरतां हातपाय झाडणें**– शेवटचा जोराचा प्रयत्न करून पाहणें. To make the last and desperate effort.

**मरेमरेसें करणें**– मरण्याचीच काय ती बाकी इतकें छळणें. To plague one to death.

**मसणांत गोंवऱ्या जाणें**– मरणाच्या पंथाला लागणें. To be about to die.

**माटमुट करणें**– भयानें घाबरून काय करूं, काय न करूं, असें होणें. ( Said of a heart ) To be in great trepidation.

**माती ( मातेरा ) करणें**– नासाडी करणें. To spoil.

तुका ह्मणे तेव्हां नरदेह नरों
तयाचा मातेरा केला मूढें। —तुका०

**मातेरें करणें**– नासाडी करणें.

हय सूत पार्ष्णि सारथि मारुनि खंडुनि समस्त हातेरें।
फोडुनि कवच, पळे करि पार्थ खळाचें पळांत मातेरें ॥ —मोरोपंत.

**मायेचा पूत**–( माय=आई, पूत=पुत्र ) खऱ्या आईचा पुत्र; पराक्रमी, प्रतापवान्, महत्कृत्य करणारा असा अर्थ.

**माय विणें**– ( उदा०–माझ्या देखत याला हात लावायला कोणाची माय व्यायली आहे तें पाहीन–ह्म० कोणाची छाती होते तें पाहीन. ) To have the boldness to.

**मारून मुटकून**– ओंबळें, कृत्रिम–अस्सल नव्हे. Forced.

**माशाचें जाळें**– मासे धरण्याकरितां केलेल्या जाळ्याला जशीं बारीक-बारीक छिद्रें असतात, त्याप्रमाणें ज्याला आहेत असा कपडा. A flimsy and open-textured cloth.

**माशानें गिळलेलें माणिक**– एखाद्यानें गिळंकृत केलेली आणि पुनः परत न मिळणारी वस्तु; कधीं न भरून येणारी हानि. An irrecoverable loss.

माशा मारीत बसणें- निरुद्योगी बसणें. To be without employment.

माशीला माशी- एखाद्या लेखाची नक्कल हुबेहुब करण्यास सांगितली असतां मूळच्या लेखांत शाईवर माशी बसून डाग पडला असला तर तसाच डाग नक्कलेंतही दाखविणें; यावरून हुबेहुब किंवा बिनचूक नक्कल हा अर्थ. Exact or accurate copy.

माशी शिंकणें- दुश्चिन्ह झाल्यामुळें बंद ठेवणें (माशी खरोखर कधीं शिंकत नाहीं. म्हणून काम बंद करण्यास कांहीं तरी खोटें निमित्त पुढें करणें अशा अर्थी या संप्रदायाचा उपयोग करतात.)

मिंधे होणें- ओशाळा-उपकारबद्ध होणें.

मिशांवर ताव देणें- बरें आहे पाहून घेईन असें ह्मणून मिशांवरून हात फिरविणें.

मी मी ह्मणणारे- स्वतःच्या कर्तृत्वाविषयीं अभिमान बाळगणारे.

मी मी म्हणणारे पैलवान त्यांना सुद्धां संभाजीनें कैक वेळां सहज चीत करून टाकलें होतें. -संभाजी.

मुंग्या येणें- वाय्वादि विकृतीनें शरीरावयव जड होऊन त्यास बाधिरता येणें. To be benumbed.

मुली उजविणें- मुलींचीं लग्नें करणें.

मुळावर येणें-बसणें- नाशास कारण होणें.

मुळावर जन्मणें- ज्याच्या योगानें दुसऱ्याचा नाश होईल अशा नक्षत्रावर जन्म होणें.

मूळ जाणें- मुलीला तिच्या सासऱ्याहून आणण्यासाठीं माहेरच्या माणसानें जाणें.

मेख मारणें- अडकवून ठेवणें. To stop or to conclude a business forcibly.

मेतकूट जमणें- स्नेह जुळणें, मित्रत्व होणें, मनास मन मिळणें. मेतकूट हा पदार्थ पुष्कळ प्रकारच्या डाळी व मीठमसाला वगैरे घालून त्यांचा

एकजीव करून केलेला असतो. यावरून एकजीव होणें हा अर्थ. To form intimacy with.

दिल्लीपति अकबरादिकांनीं रजपुतांशीं चांगलें वागून त्यांच्या मुलींशीं लग्नें लाविलीं, इतकें मेतकूट जमविलें. –नि० चं०

**मेलेलें अन्न**– निःसत्व अन्न ( जें स्वतःच्या श्रमानें मिळविलेलें नाहीं, तर केवळ दुसऱ्याच्या मेहेरबानी खातर–भिक्षा ह्मणून–मिळालेलें असतें, तें वेचव लागतें. )

सध्यां आह्मांस जी एवढी लाजिरवाणी स्थिति प्राप्त झाली आहे ती कशामुळें? ... आपल्या स्वार्थावर काय ती नजर, कोणाचा पायपोस कोणाच्या पायांत नाहीं, मेलेलें अन्न खाण्याची हौस हे प्रकार चोहोंकडे माजले आहेत, त्याचेंच सध्यांची व्यवस्था हें कार्य आहे. –केसरी.

**मेल्या आईचें दूध प्यालेला**– मेषपात्र.

**मोत्याची ओळ**–सुंदर वळणदार अक्षरें.Good hand-writing.

**मोळी चुचकळणें**–( मोळी हा शब्द तिरस्कारार्थी शरीरयष्टीला लावतात. ) स्नान करणें.

**म्हशीनें पाय दिलेलें नाक**– एका नकट्या मुलानें माझें नाक नकटें कसें झालें, असें आईला विचारलें. ती काय उत्तर देणार ! तिनें मुलाच्या समाधानार्थ ह्मटलें कीं, ' लहानपणीं ह्मशीनें तुझ्या नाकावर पाय दिला ह्मणून तें बसलें. ' यावरून नकटें नाक हा अर्थ.

**यमपुरी**– यमाची राजधानी ह्मणजे पापी लोकांना शासन करण्याची जागा. यावरून अपराध्यांस शिक्षा देण्याची जागा ( तुरुंग ) असा अर्थ.

**यमाचें बोलावणें**– यम ह्मणजे मृत्यु. त्याचें बोलावणें = मृत्यु. यमाजी भास्कर, यमाजीपंत, यमाजी बाबाजी इ० संप्रदायांत हाच अर्थ आहे.

**या कानाचें या कानास न कळूं देणें**– अतिशय गुप्त ठेवणें. To keep a thing pro-foundly secret. Let not your left hand know what your right hand does.

**येऊन जाऊन**– अखेरची गोष्ट.

घरदार, वननवाडी, सगळ्यांनीं सावकाराचें घर पाहिलें. येऊन जाऊन वायकोच्या अंगावरचें किडुकमिडुक तेवढें राहिलें.

**योगक्षेम चालविणें**– संसाराची एकंदर व्यवस्था पाहणें. उदरनिर्वाहाची तजवीज करणें. To support; to maintain.

जे मला अनन्यभावें शरण येतात, त्यांचा योगक्षेम मी चालवितों.

–श्रीमद्भगवद्गीता.

**रंगास येणें**– शोभा प्राप्त होणें. To advance in splendour or dignity.

त्याचा संसार नुकता कोठें रंगास येत चालला होता, तोंच त्याच्यावर मृत्यूनें झडप घातली.

**रंगारूपास आणणें–येणें–चढणें**–आरंभलेलें कार्य अनुकूल संस्कारादिकांनीं चांगल्या स्थितीला आणणें–येणें. इ. इ. To bring a thing to some definite shape.

**रजाचा गज करणें**– ( रज = अणु, कण ) *cf.* राईचा डोंगर करणें; अतिशयोक्ति करणें. To make a mountain of a molehill; to exaggerate.

**रडतराव किंवा रडत राऊत घोड्यावर बसविणें**– ज्याला ज्या कामाविषयीं उत्साह नाहीं त्याला आग्रहानें त्या कामाविषयीं प्रवृत्त करणें. To appoint for the perforemance of a work a reluctant or faint-hearted person.

तिथें म्हणणें असें पडे कीं, वेड्या वेड्या समजुती मोडण्यास, चांगले परिपाठ चालू करण्यास ...... स्त्रिया आपण होऊन तयार झाल्या पाहिजेत. रडत राऊत घोड्यावर बसवून उपयोगी नाहीं. –ओक.

**राईचा पर्वत करणें**– ( रजाचा गज करणें हा सं० पहा. )

**राखरांगोळी करणें**– सत्यनाश करणें. To utterly destroy.

**राग नाकावर असणें**– लवकर रागास चढणें, लवकर चिडणें. To be highly irritable.

**राजापासून रंकापर्यंत**– रंक ह्म० गरीब. राजापासून गरीब मजुरापर्यंत, ह्मणजे सगळे. From prince to pauper.

राजापासून रंकापर्यंत साऱ्यांस सारखी निस्तेजता आली आहे. —केसरी.

**रान खवळणें**— क्रोधानें किंवा भुकेनें कावरेंबावरें होणें. ( रानांतलीं जनावरें शिकारी माणसांनीं हुसकावून लाविलीं ह्मणजे तीं कावरींबावरीं होऊन रानोमाळ फिरतात, त्याप्रमाणें कावरेंबावरें होणें हा अर्थ. To be vehemently excited by anger, hunger &c.

लवकर जेवायला वाढा; आज इकडे रान फार खवळलें आहे.

**रिकाम्या रानीं**— विनाकारण. To no purpose.

आतां येथें तुमचें कामकाज कांहीं नाहीं; मग रिकाम्या रानीं कशाला बसतां ?

**राबेल तो चावेल**— जो शरीरानें कष्ट करील त्याला खावयाला मिळेल. He that works shall eat.

**रामाचें नांव !**— एखाद्या गोष्टीचा पूर्ण अभाव होता असें ठासून सांगावयाचें झाल्यास ही ह्मण योजतात. जसें—अजून तरी त्याला पश्चात्ताप झाला होता ह्मणाल तर रामाचें नांव !

**राक्षसी झोंप**— फार गाढ झोंप. Profound and heavy sleep.

**रेघ उमटणें**— दैव उघडणें. नशिबांत ज्या कांहीं बऱ्या वाईट गोष्टी घडावयाच्या असतात त्या कपाळावर लिहून ठेवलेल्या असतात अशी समजूत आहे. पूर्वी जी रेघ दिसत नव्हती ती उमटून दिसूं लागणें ह्मणजे अर्थात् अकल्पित रीतीनें भाग्य उदयास येणें.

शाहूमहाराजांची कृपा ह्मणण्यापेक्षां ... ... त्यांच्या ( ब्राह्मणांच्या ) दैवाची रेघ उमटून ते राज्यलक्ष्मीचा उपभोग घेऊं लागले ह्मटलें तरी चालेल.

—मराठ्यांचे पराक्रम.

**लकडा लावणें**—निकड लावणें. To urge or press.

**लघुशंकेस जाणें**— लघवी करण्यास जाणें. To go to make water.

**लंबकर्णाची स्वारी**— गाढव.

**लवनभंजन करणें**— नम्रता धारण करून गोड गोड बोलणें. To bow and scrape.

**लाखाच्या ठिकाणीं**—लाख ( रुपये वगैरे ) दिल्यासारखें. As good as a lakh.

लाज राखणें– लोकांकडून उपहास न होईल असें करणें. To save honor.

अहो नारायणा । सांभाळावें आम्हां दीनां ।
आमची राखावी ती लाज । परंपरा हेंचि काज ॥

–एकनाथ.

लाड पुरविणें– लहान मुलाची किंवा बायकोची हौस पुरविणें. To indulge; to gratify the fond fancy or desire of.

लोकांचीं घरें पुजणें– लोकांच्या घरोघर जाणें.

वचनाचा धड– दिलेलें वचन पाळणारा, बोलल्याप्रमाणें करून दाखविणारा, प्रामाणिक मनुष्य. True to one's word.

खरा लोककल्याणेच्छु व देशाभिमानी पुरुष म्हटला म्हणजे ...... तो वचनाचा धड असला पाहिजे. –नि० मा०

वज्रलेप होणें– ज्या चुन्यामध्यें कात, गूळ इ० सरंजाम घालून त्याला दृढता आणतात, त्याला वज्र म्हणतात. अशा चुन्याचा लेप दगडावर केला म्हणजे तो सहसा निघत नाहीं. त्यावरून पक्कें होणें हा अर्थ. वज्रानेंसुद्धां फुटण्यासारखा अर्थात् अभेद्य, अशीही उपपत्ति कित्येक सांगतात.

आमच्या आजेसासूबाई एकदां कोणाचें नांव घ्यायचें नाहीं असें म्हणाल्या कीं, मग तें वज्रलेप झालेंच समजावें. –पण लक्षांत०

वयांत येणें– तारुण्याचे भरांत येणें; समजूं लागणें; कायद्यानें मुलगी १८ वर्षांनंतर आणि मुलगा २० वर्षें पूर्ण झाल्यावर वयांत येतो असें समजतात. To come of age.

वरचष्मा करणें–होणें– (वर + चष्मा = दृष्टि, देखरेख) एखाद्यावर देखरेख करण्याचा अधिकार अर्थात् त्याच्याहून श्रेष्ठता मिळविणें–मिळणें. To assert superiority over ; to domineer.

वरवंटा फिरविणें– वरवंटा फिरला म्हणजे त्याच्याखालीं सगळ्या वस्तु चिरडल्या जातात. यावरून नाश करणें हा अर्थ. To make ravages.

वर्षाचा दिवस– वर्षांतन एकदां येणारा सण. सणाचा दिवस. A day of festival.

वर्षाचा दिवस फला तरी साजरा केला पाहिजे.

**वाघ**– आपल्या कामांत जागरूक आणि भयप्रद. जागरूकता आणि भयप्रदना हे गुण वाघाचे अंगीं विशेष असतात. Watchful and terrible-looking like a tiger.

बापूसाहेबांचा दरारा काय विचारतां ? ते नुसते वाघासारिखे आपल्या जागेवर बसलेले असतात !

**वाघाची मावशी**– मांजर.

**वाचा फुटणें**– बोलण्याची शक्ति येणें. To acquire speech.

अनुष्ठान करतां द्वारीं
मुक्यासि वाचा फुटे ॥

**वाचा बसणें**– बोलण्याची शक्ति नाहींशी होणें. To lose speech.

**वाचा विटाळणें**– शब्द खर्चणें. To speak a word or two in recommendation of.

**वाचाळपंचविशी लावणें**– वाचाळता करणें; फोल बोलणें.

**वाच्यता करणें**– एखाद्या गुप्त गोष्टीचा स्फोट करणें, बोलूं नये अशी गोष्ट दुसऱ्याकडे बोलणें. To give utterance to; to disclose.

आम्हीं सगळें कारस्थान उत्तम प्रकारें केलें होतें, पण सखोपंतांनीं अगोदरच त्याची वाच्यता केल्यामुळें सगळें ऑफस झालें.

**वाट लावणें**– निकालांत काढणें. To dispose of.

**वाटेस लावणें**– योग्य क्रमाला लावणें; पाटवून देणें.

**वाटेवर पडणें**– सहज प्राप्य असणें. To be easily obtainable.

परीक्षा पास होणें काय वाटेवर पडलें आहे ? त्यासाठीं हाडांचीं काडें करावीं लागतात.

**वारा न येणें**– **वारा न पडूं देणें**– अगदीं अलिप्त राहणें. To keep quite aloof from.

**वारा पडणें**– वारा बंद होणें. (Said of a wind) To cease to blow.

**वारा वाहील तशी पाठ देणें**– अनुकूल किंवा प्रतिकूल जशी स्थिति असेल त्या मानानें वागणें. To sail with the wind.

वारें लागणें– संसर्ग होणें.

संपत्तीचें वारें सृष्टीच्या आरंभापासूनही आजपर्यंत कसें तें मुळींच लागलें नाहीं असे देश पृथ्वीवर पुष्कळ आहेत. निबंध०

वाहत्या गंगेंत हात धुणें– कोणाचें नुकसान न करतां सहजगत्या होण्यासारखा आपला फायदा करून घेणें. ( गंगा अनायासें वाहत असते. तींत हात धुऊन घेतल्यानें कोणाचें नुकसान नसून धुणाराचे मात्र विहिरींतून पाणी काढण्याचे श्रम वांचतात. ) To make hay while the sun shines.

विडा उचलणें– पूर्वीं एखादें दुर्घट कार्य करण्यासाठीं कोणाची योजना करावी असा विचार पडला कीं, राजा दरबार भरवी आणि आपण हें काम करूं अशी ज्याची हिंमत असेल त्यानें तबकांतला विडा उचलावा असें जाहीर करी. त्यावरून एखादें दुर्घट कार्य करण्याविषयीं प्रतिज्ञा करणें हा अर्थ. To pledge one's word to perform a certain task; to undertake a task.

त्यांनीं ज्याच्या रक्तानें नाहाण्याबद्दल विडा उचलेला आहे ते कोण? –उषःकाल

वीट येणें– कंटाळा येणें. To feel disgust for.

या जगांतल्या वस्तुवस्तूचा मला वीट आला आहे. –विकार विल०

वेड घेऊन पेडगांवास जाणें– एखादें इच्छित कार्य किंवा मतलब साधण्यासाठीं मुद्दाम वेड्याचें सोंग करणें. To feign madness.

वेड पांघरणें– वेड्याचें सोंग घेणें–करणें. To feign madness.

वेड भरणें– वेडा होणें. To get mad.

वेडापीर– वेडगळ, छांदिष्ट मनुष्य. A madcap.

वेडें पीक– पुष्कळ येणारें पीक. Luxuriant crop.

वेड्यांचा बाजार– वेड्यांचा समुदाय किंवा समाज. A company of lunatics or imbeciles.

वेळेचा गुण– बरें किंवा वाईट होण्यांत वेळेचें जें अंग असतें तें. The secret influence of time.

वेळ मारून नेणें– प्रसंगाला उणें पडूं न देणें.

केवळ शब्दमात्रें करून वेळ मारून न नेतां कृति करून दाखविली पाहिजे.
–नि० त्रं०

शब्द खालीं पाडणें– दुसऱ्यानें म्हटल्याप्रमाणें न करणें; दुसऱ्याची शिफारस न ऐकणें.

शब्द झेलणें– आज्ञा होते केव्हां आणि आपण ती पाळतों केव्हां अशा रीतीनें तत्पर रहाणें.

राजकारस्थानी पुरुष आणि सेनापति यांचे शब्द त्यांच्या अमदानींत सगळे लोक झेलीत असतात. –ओक.

शब्द ठेवणें– लावणें– दूषण लावणें. To censure.

माझेनि दोषें पावलों खेद । हा तुज कासया ठेवणें शब्द । नाटवूनी ममापराध । एक देईं मज आतां ॥ –मुक्तेश्वर.

शहानिशा करणें– होतें कीं नाहीं होत, मिळतें कीं नाहीं मिळत, इ० गोष्टींविषयींची शंका नाहींशी करून निश्चय करणें; चौकशी करून निकाल करणें.

शाळू सोबती– शाळू नांवाची एक जोंधळ्याची जात आहे. ही हिंवाळ्यांत होते आणि हिंवाळ्याचे दिवस लहान असतात. त्यावरून शा० म्हणजे थोडा वेळ टिकणारा असा अर्थ. Fugitive, fleeting.

शिखरास हात पोंचणें– कृतकृत्य होणें.

शितावरून भाताची परीक्षा करणें– एखाद्या अंशावरून सगळ्या पदार्थाची परीक्षा करणें.

शिळ्या कढीला ऊत येणें– आणणें– ज्या प्रसंगीं अंगचें पाणी दिसायला पाहिजे त्या वेळीं न दिसतां मागाहून उसनें अवसान येणें–आणणें. To stir up one's valour after the occasion for it is gone.

शुक होणें– स्तब्धता-शांतता होणें. To be still as death.

पुढलें दार लावलेलें असून जिकडे तिकडे शुक झालें आहेसें मला वाटलें.

शेंडा ना बुडुख– ( शेंडा = वरचें टोंक; बुडुख = खालचें अग्र ) कांहीं-च नाहीं. Neither head nor tail.

शेणाचा पोहो– सरळ अर्थ शेणाची लहानशी रास; यावरून पोकळ, मंद, सुस्त, आळशी असा मनुष्य. An impotent, imbecile and incompetent, dull, person.

शेणाचे दिवे लावणें– दिवाळें निघणें. To be bankrupt.

शेर– अन्नाचा ऋणानुबंध; सामान्यतः माणसाला डाळ, तांदूळ, भाजी-पाला, मीठमिरची वगैरे सर्व जिन्नस मिळून एक शेरभर अन्न रोज लागते अशी समजूत आहे.

माझा शेर जोंपर्यंत यांच्या पदरीं आहे तोंपर्यंत मी तो उगवून घेतंच आहे.

–रंगराव.

संपुष्टांत येणें– ( संपुष्ट हा संपुट शब्दाचा अपभ्रंश आहे. संपुट म्हणजे दोन पुडें असलेलें एक लहानसें पात्र ) यावरून लहानशा पात्रांत येणें, संकोच पावणें हा अर्थ. To be reduced into little.

समुद्रांत सुई शोधणें– निष्फळ होण्याची खात्री अशा कार्याला हात घालणें. To look for a needle in a bundle of hay.

सर पावणें– ( सर = बरोबरी ) बरोबरी करतां येणें.

जंबुकवनांत वाढला केसरी।
परी त्याची कैंची पावेल सरी॥ –श्रीधर.

सर पवणें ( जुनी मराठी )– पावणें– बरोबरी होणें.

बहुमार्ग बहुतापरि। परी न पवती सरी पंढरीची॥ –एकनाथ.

सर येणें–बरोबरी होणें.

पूर्वींच्यांची ( पुस्तकांची ) तुलना करून कित्येकांनीं असें मत प्रदर्शित केलें आहे कीं त्यांची सर अलीकडच्यांत कांहींच येणार नाहीं. निबंधमाला.

साखर पसरणें– पेरणें– गोड गोड बोलून मोहपाशांत अडकाविणें.

साखरेची सुरी– गोड बोलून मान कापणारा. A soft and gentle but deep and merciless person.

या चांडाळाच्या उरांत साखरेची सुरी भोंसकून केसानेंच मान कापली पाहिजे.

–संभाजी.

सांगड घालणें– जोडून देणें.

सुतळीचा तोडा– क्षुद्र किंमतीची वस्तु सुद्धां.

वाशिंग्टनानें आपल्या देशबंधूंना स्वतंत्र करण्याचें महत्कार्य केलें आणि एका सुतळीच्या तोड्यालाही न शिवतां अगदीं अलिप्तपणें राहून कालक्रमणा केली.

–नि० मा०

सुताचा तोडा– अगदीं क्षुद्र किंमतीची वस्तु. उदा० प्लेगच्या दिवसांत आम्ही त्याच्यावर घर सोंपवून चार महिने गेलों, पण सुताचा तोडा गेला नाहीं.

सुतानें चंद्राला ओंवाळणें– शुद्ध द्वितीयेच्या रात्रीं भाविक लोक आपल्या वस्त्राचें सूत ( दशा ) काढून तें चंद्राला अर्पण करतात आणि तूं जसा पुनः नवा झालास, तशीं आमचीं वस्त्रें नवीं होऊं दे अशी प्रार्थना करतात, यावरून हा सं० निघाला आहे.

सुतानें स्वर्गास गांठणें–जाणें–चढणें– एखाद्या गोष्टीचा यत्किंचित् अंश समजल्यानें बुद्धिप्रभावानें ती गोष्ट पूर्णपणें तर्कानें जाणणें. To divine a plot by a small clue.

आह्मां वाचकांच्या अंगीं जो नैसर्गिक चाणाक्षपणा असतो, त्यानें आम्ही तेव्हांच सुतानें स्वर्गास चढतों ( गांठतों ). –पण लक्षांत०

सुतानें सूत लागणें– एका गोष्टीच्या योगानें दुसरी गोष्ट समजणें. To be traced or found by means of a clue.

सुतास लागणें– नीट सुरळीत होऊं लागणें; व्यवस्थेत लागणें. To be in good order and regularity.

सुळावरची पोळी– सुळावर टांगून ठेवलेली पोळी घेण्यास जाणें हें अतिशय धोक्याचें काम आहे. यावरून धोक्याचें काम, जिवावरलें संकट असा अर्थ. A jeopardy.

असल्या दुष्ट माणसाच्या हाताखालीं नोकरी ह्मणजे सुळावरची पोळीच म्हटली पाहिजे.

सूर्याचें पिलूं– दिवा किंवा विस्तव.

सोन्याचा दिवस–सोन्यासारखा मूल्यवान्–महत्त्वाचा–आनंदाचा दिवस.

॥ आजी दिवस आला ॥ धन्य सोनियाच्या भला ॥ –तुका०

सोनियाचा दिवस आजी झाला ।
संतसमागम पावला ॥ —एकनाथ.

**सोन्याचा धूर निघत असणें**— अतिशय संपत्तिमान होणें. To have an overabundance of riches.

इंग्लंडांत आतां सोन्याचा धूर निघत आहे. पण पांच चार शतकांपूर्वी काय स्थिति होती !

आमच्या घरांतून पूर्वीं सोन्याचा धूर निघत होता व आमच्या घरांत माणकें आणि मोत्यें अधोलीनें मोजलीं जात होतीं. —काळ.

**सोस करणें**— लोभ धरणें.

वाउगा तूं न करीं सोस ।
दृढ घालीं तूं कास ।
धरींपां विश्वास । विठ्ठलचरणीं ॥

**सोस माजविणें**— निष्कारण प्रतिष्ठा वाढविणें.

**हत्ती झुलणें**— ( गजांतलक्ष्मी हा संप्रदाय पहा ).

**हरताळ पडणें**— उद्योग, व्यवहार बंद पडणें. कोणी मोठा मनुष्य ( राजा वगैरे ) मेला असतां नगरांतले सगळे व्यवहार लोक खुषीनें किंवा सरकारी हुकुमानें बंद ठेवतात त्याला हरताळ पडणें म्हणतात. हा सं० देशी संस्थानांत अद्याप आहे.

**हरताळ लावणें**— लिहिलेलें खोडणें. पूर्वी हातानें पोथ्या लिहीत असत, तेव्हां एखादें अक्षर चुकून पडलें तर तें शाईनें न खोडतां त्यावर पिवळी हरताळ लावीत. त्यावरून खोडणें, हा अर्थ प्रचारांत आला. To cancel.

खरेंच सांगतें द्या हा राग टाकून; हा तुमच्या साच्या स्वरूपाला आणि सद्गुणाला हरताळ लावतो. —शारदा.

**हरामाचा माल**—हिंदुस्थानी भाषेंत हराम म्ह० अन्यायाचा किंवा बेकायदेशीर; यावरून अन्यायानें, किंवा वाईट मार्गानें मिळविलेला माल असा अर्थ.

**हिंग लावून न विचारणें**— पदार्थाला स्वाद आणण्यासाठीं हिंग लावतात. हिंग हा पदार्थ महाग असल्यामुळें ज्याचें कांहीं महत्त्व आहे अशाच पदार्थांत हिंग घालतात. यावरून महत्त्वाचा न समजणें हा अर्थ.

हिंगाचा खडा– हिंगाला फार उग्र वास असतो. यावरून गडबड करणारा अथवा त्रास देणारा मनुष्य.

होता कीं नव्हता करणें– नाहींसा करणें.

निजामसाहेबांची काळजी सोडा;...... सगळे मराठे एकचित्त होऊन झटून मर्दन करतील तर दक्षिणेंत मुसलमान होता कीं नव्हता असें करून टाकीन.

– संभाजी.

हो–ना करणें– अनमान करणें ( एकदां ' हो ' म्हणून अनुमति देणें, मागून पुनः ' ना ' ह्मणून बेत फिरविणें, यावरून मनाची चलबिचल दिसते. ) To hesitate.

होस हो देणें– अनुमति देणें; एखाद्यानें हो ह्मटलें असतां आपणही तसेंच ह्मणणें. To say ditto.

आजीचा माझ्या लग्नाबद्दल नाद चालला होताच आणि...... बाबाही आतांशा तिला होस हो देऊं लागले होते. – पण लक्षांत०

होस हो मिळविणें– एखाद्यानें कांहीं ह्मटलें असतां आपणही तसेंच ह्मणणें. To assent to everything that is affirmed.

क्षिति ( क्षाति ) बाळगणें– चित्तास वाईट वाटणें; विधिनिषेध बाळगणें. To care for.

———

# प्रकरण तेरावें.

## ह्मणी.

ह्मण ह्मणजे काय याविषयीं विस्तृत विवेचन करण्याची अवश्यकता आहे असें नाहीं. कारण कीं, तो शब्द आबालवृद्धांच्या चांगल्या परिचयाचा आहे. घरीं दारीं, समाजांत, बाजारांत, नाटकगृहांत, आगगाडींत, कोठेंही चार माणसें जमलेलीं आढळलीं ह्मणजे त्यांच्या भाषणाचें सूक्ष्म अवलोकन करणारास त्या भाषणाच्या ओघांत सहज दहापांच ह्मणींचा उच्चार झालेला आढळून येईल. वाङ्मयापैकीं कादंबऱ्या व नाटकें यांतून–विशेषतः स्त्री पात्रांचे तोंडीं–ह्मणींची विपुलता आढळते. फार काय, पण आमचा प्रत्येक व्यवहार कोणत्याना कोणत्या ह्मणीशीं संबद्ध असलेला आढळून येईल. ज्या ह्मणीशीं आमचा इतका दाट परिचय आहे ती ह्मण ह्मणजे काय आहे याविषयीं कोणाचेही ठायीं अज्ञान संभवत नाहीं. तथापि ह्मणीची शास्त्रीय पद्धतीची व्याख्या करून दाखविणें हें काम मात्र फार दुर्घट आहे. परंपरेनें लोकांच्या बोलण्यांत आलेलें एखादें नीतिपर, अनुभवसिद्ध किंवा दृष्टांत-पर वाक्य किंवा अनेक वाक्यें मिळून होणारें वचन ती ह्मण, असा सामान्य अर्थ देतां येतो; पण ह्मण शब्दाची ही बिनचूक, रेखलेली, शास्त्रीय व्याख्या नव्हे. ह्मणीची बिनचूक व्याख्या करण्याची खटपट पाश्चात्य देशांत आरिस्टॉटलच्या काळापासून आणि आपल्या देशांतही बऱ्याच काळापासून चालली आहे, पण तिला यश आलें नाहीं. कारण, ह्मणींत कोणकोणत्या गोष्टी अवश्य असल्या पाहिजेत व कोणत्या नसल्या तरी चालतील, तींत सांगितलेलें तत्त्व त्रिकालाबाधित सत्य असलें पाहिजे कीं कांहीं कालापुरता जगाचा अनुभव तींत प्रतिबिंबित असला ह्मणजे पुरे; धर्म, नीति, व्यवहार वगैरे संबंधाचा बोध ह्मणींत ग्रथित असणें अवश्य आहे काय वगैरे अनेक महत्त्वाच्या गोष्टींसंबंधानें विद्वान् लोकांत तीव्र मतभेद आहेत. तथापि सर्वांना संमत अशीं ह्मणींचीं लक्षणें एकत्र करूं लागलों तर लघुता, व्यावहारिकता, चटकदारपणा, आणि लोकमान्यता

हे चार गुण म्हणीमध्यें असणें अवश्य आहे असें दिसतें. त्यांतल्यात्यांत लोकमान्यता हा शेवटचा गुण प्रधान व इतर गुण गौण तथापि अवश्य आहेत, असें दिसून येईल. कोणतेंही वाक्य समाजाला पसंत पडून तें रूढ झाल्याशिवाय त्याला ह्मण ही संज्ञा प्राप्त होत नाहीं. एखादें वाक्य समाजांत रूढ होण्याला तें सुसंस्मर्य ( चटकन् आठवण्यासारखें ) अर्थात् लहान आटोपशीर असावें लागतें. इतकेंच नाहीं तर त्यांत व्यावहारिकता व चटकदारपणा असल्याशिवाय लोकांना त्याचें महत्त्व वाटावयाचें नाहीं व योग्य प्रसंगीं त्याचें स्मरणही व्हावयाचें नाहीं. म्हणजे लोकमान्यतेच्या मुळाशीं हे बाकीचे तीन गुण आहेतच व हे परस्पराशीं इतके दृढसंबद्ध आहेत कीं त्यांतला कोणताच गुण वगळून चालावयाचें नाहीं. पण या सर्वांपेक्षां अधिक महत्त्वाचा असा गुण अद्याप सांगावयाचा राहिला आहे आणि ह्मणीचें विशेषत्व जें काय आहे तें त्यांतच आहे. कोणतेंही वाक्य निरनिराळ्या प्रसंगीं निरनिराळ्या उदाहरणांना लावून दाखवितां येईल तरच त्या वाक्याला ह्मणीची योग्यता प्राप्त होईल. जें वाक्य एकाच विवक्षित प्रसंगाला किंवा एकाच उदाहरणाला लावतां येतें, अन्यत्र लावतां येत नाहीं, त्याला फार झालें तर आपण सुभाषित हें नांव देऊं, पण तें ह्मण म्हणून समाजांत कधींही रूढ होणार नाहीं. व्यवहारांतल्या वस्तूची उपमा द्यावयाची तर सुभाषित हें एखाद्या विवक्षित दुकानावर पटवितां येणारा चेक किंवा हुंडी आहे, पण ह्मण ही बाजारांत हव्या त्या दुकानीं चालणारें राजमान्य चलनी नाणें आहे.

प्रत्येक म्हणींत धर्म व नीति यांचा बोध असलाच पाहिजे असें नाहीं. धर्म व नीति यांच्या जागीं व्यवहारांतला अनुभव किंवा एखादा चटकदार दृष्टांत असला तरी चालतो. उदा० 'अति तेथें माती,' 'अचाट खाणें, मसणांत जाणें,' 'गरजवंताला अक्कल नाहीं,' 'पळसाला पानें तीनच,' 'चर्ली तो कान पिळी,' 'विंचवाचें बिऱ्हाड पाठीवर,' 'कुडास कान, ठेवी ध्यान,' 'गाढवाला गुळाची चव काय माहीत?' वगैरे ह्मणींपैकीं कांहींत नीति, कांहींत जगाचा अनुभव आणि कांहींत समर्पक दृष्टांत भरले आहेत. कोठेंही गेलें तरी एकसारखाच प्रकार आढळावयाचा या गोष्टीला 'पळसाला पानें तीनच' या म्हणीहून किंवा ज्याच्याजवळ सामानसुमान वगैरे लटांबर नाहीं अशाबद्दल 'विंचवाचें बिऱ्हाड पाठीवर' या ह्मणीहून अधिक

समर्पक दृष्टांत सांपडणें जसें कठिण आहे, तसेंच 'कुडास कान, ठेवी ध्यान' किंवा 'गरजवंताला अक्कल नाहीं' या म्हणींत सांठविलेलें व्यवहारज्ञानही अधिक मार्मिकपणानें व्यक्त केलेलें क्वचितच आढळेल.

ह्मणी ह्या आजपर्यंत होऊन गेलेल्या लोकांच्या संचित ज्ञानाचा कोश आहे, असें ह्मटलें असतां अतिशयोक्ति होणार नाहीं. या ज्ञानाचे विषयांच्या वर्गीकरणाप्रमाणें म्हणींचेंही वर्गीकरण करतां येईल, पण ही वर्गीकरणपद्धति अनेक कारणांमुळें फार गैरसोयीची आहे. शेतकी, प्राणी, धर्म, नीति, अन्न, आरोग्य, घरदार, व्यवहार, सृष्टि, परस्परांमधील नात्याचे संबंध इत्यादि गोष्टींवरून ह्मणींचें वर्गीकरण करतां येईल. पण प्रस्तुत पुस्तकांत दिलेल्या सुमारें साडे तीनशें ठळक ठळक ह्मणींना ही वर्गीकरणपद्धति अवजड होईल. ह्मणून या पुस्तकांत मराठी ह्मणींचे वर्ग पुढीलप्रमाणें केले आहेतः—

१ आईबाप, सासूसून, गुरुशिष्य वगैरेमधील संबंधावरून झालेल्या म्हणी.
२ मनुष्यप्राण्याच्या शरीरावयवांवरून प्रचारांत आलेल्या म्हणी.
३ पशु, पक्षी इत्यादिकांवरून आलेल्या म्हणी.
४ असंबद्धता, विरोध, उपहास वगैरेंच्या दर्शक म्हणी.
५ व्यवहारज्ञान, अनुभव, धर्म, नीति इ० संबंधाच्या ह्मणी.
६ विविध म्हणी.

---

## १ नात्याच्या संबंधांवरून झालेल्या म्हणी.

आई जेवूं घालीना, बाप भीक मागूं देईना—दोन्हीकडून अडचण. A dilemma.

आजा मेला, नातू झाला—घरांतलें एक माणूस कमी झालें, त्याचेबद्दल एक वाढलें. मिळून संख्या बरोबर.

आत्याबाईला मिशा असत्या तर काका ह्मटलें असतें—जी गोष्ट किंवा स्थिति पालटणें आपले हातीं नाहीं, ती तशी नसती तर बरें होतें असें जेव्हां कोणी ह्मणतो, तेव्हां त्याच्या उत्तरादाखल या ह्मणीचा उपयोग करतात. If my aunt had been a man she should have been my uncle.

कामापुरता मामा – काम साधून घेण्यापुरतें गोड गोड बोलणें. Dangers past God is forgotten.

कोणाची होऊं नये बायको, आणि कोणाचे होऊं नये चाकर– बायको आणि चाकर या दोघांनाही आपापल्या यजमानाच्या तंत्रानें चालावें लागतें. स्वतंत्रता अशी त्यांना नाहींच.

गुरूची विद्या गुरूलाच फळणें– लोकांना फसविण्याची युक्ति एकानें दुसऱ्याला दाखविली असतां त्या युक्तीचा प्रयोग ती दाखविणारा-वरच घडणें.

नवरा मरो कीं नवरी मरो, उपाध्यायाला दक्षिणेशीं कारण– वधू आणि वर यांचें लग्न लागून दक्षिणा पदरांत पडे तोंपर्यंत उपाध्यायाला काळजी असते. ती पदरांत पडल्यावर मग नवरानवरींचें कांहीं बरें वांईट झालें तरी त्याचें त्या भटाला काय होय ? यावरून पुढें कांहींही परिणाम होवोत, तूर्त मतलबाशीं कारण, असा अर्थ.

नावडतीचें मीठ अळणी–नावडत्या माणसानें कांहींही केलें तरी तें वाईटच लागतें असा अर्थ. मिठासारखा पदार्थ नावडत्या बायकोनें वाढला ह्मणूनच तो अळणी लागतो. Showing a strong prejudice against a person.

वडे बापके बेटे– बापाच्या मोठेपणावर डौल मिरविणारा मनुष्य. स्वतः कांहींएक कर्तबगारी न करतां, वाडवडिलांच्या नांवावर मिजाशींत दिवस घालविणाऱ्या लोकांस उपहासहेतूनें ‘ वडे बापके बेटे ’ असें म्हणतात.

‘ वडे बापके बेटे ’ हा प्रकार इंग्रज लोकांत फारच कमी–किंबहुना नाहींच ह्मटलें तरी चालेल. –वि० ज्ञा० वि०

बाप तसा बेटा– जसें बीज तसा अंकुर; जशी खाण तशी माती; बापाचे गुण मुलांत उतरावयाचे असा अर्थ. Like father like son.

बाप दाखव नाहीं तर श्राद्ध कर–हिंदु धर्मशास्त्राप्रमाणें मृत पितरांचें श्राद्ध करणें हें मुलाचें अवश्य कर्तव्य आहे. तेव्हां बाप जिवंत असेल तर तो दाखविणें, नाहीं तर श्राद्ध करणें याशिवाय त्याला गत्यंतर नसतें. यावरून तुमच्या ह्मणण्याला आधार काय तो दाखवा, नाहीं तर हरलों असें

कबूल ^करून^ आमचें मत स्वीकारा असें ह्मणून एखाद्याला अडचणींत घालणें हा अर्थ झाला.

बापाला बाप ह्मणेना मग चुलत्याला काका कोण ह्मणतो—जवळचा संबंध जो ओळखीत नाहीं तो लांबचा ओळखणार नाहीं हें तर उघडच आहे. मोरोपंतांनीं ' काका ' च्या ऐवजीं ' आजोबा ' शब्द घालून ही ह्मण योजिली आहे. जसें:— ' बापासि बाप न म्हणे, ऐशासी काय होच आजोबा '. He is no respecter of persons.

बाबा वाक्यं प्रमाणम्—वाडवडिलांचा शब्द हाच आधार किंवा प्रमाण, यापलीकडे प्रमाण नाहीं असा निर्धार. Ipse dixit.

मागून पुढून बाप नवरा—'मुलाचें लग्न व्हावयाचें होतें म्हणून त्याला एक मुलगी सांगून आली होती. बापाचीही पहिली बायको मरून तो दुसरें लग्न करण्याच्या विचारांत होता. तेव्हां त्यानें आलेली मुलगी मुलाला न करतां स्वतःलाच करून घेतली. यावरून जें कांहीं येईल तें आपणच घ्यावयाचें, दुसऱ्याला मिळूं द्यावयाचें नाहीं अशा मतलबी प्रवृत्तीचा मनुष्य.

लेकीस बोले सुनेस लागे—लेकीला म्हणून जें बोललें असतें तें खरोखर सुनेला उद्देशून असतें. पण ही सासू जेव्हां तेव्हां मला बोलते असा आपला बोभाटा होऊं नये म्हणून ती सासू मुद्दाम लेकीला बोलते.

---

## २ शरीरावयवांवरून झालेल्या ह्मणी.

आंधळा मागतो एक डोळा आणि देव देतो दोन डोळे—अपेक्षेपेक्षां जास्त प्राप्ति होणें. To have more than one's heart could wish for.

आधीं पोटोबा मग विठोबा—अगोदर प्रपंच मग परमार्थ; अगोदर पोट भरण्याची सोय पहावी मग परमार्थाला लागावें. The wolf calls for satisfaction before God.

इतर कितीही चांगल्या सुधारणा झाल्या तरी आमच्या लोकांनीं ' आधीं पोटोबा मग विठोबा ' या ह्मणीप्रमाणें अगोदर निर्वाहाची सोय पाहिली पाहिजे.

आपली पाठ आपणांस दिसत नाहीं—या ह्मणीचे दोन अर्थ आहेत.

एक–स्वतःचे दोष स्वतःस दिसत नाहींत, ते दुसऱ्यांनीं दाखविल्यावर मग कळतात. दुसरा–आपल्या पाठीमागें लोक आपणांस बरें म्हणतात कीं वाईट म्हणतात तें कळत नाहीं.

**आपलेच दांत आणि आपलेच ओंठ**– शिक्षा करणारे आपणच आणि ज्याला शिक्षा करावयाची तोही आपल्यांतलाच अशी स्थिति असते तेव्हां या म्हणीचा उपयोग करतात. दोन्ही वादी आपले स्वकीय म्हणून बरें किंवा वाईट करतां येत नाहीं असा अर्थ.

**आपलें नाक कापून दुसऱ्याला अपशकुन**– दुसऱ्याचें वाईट व्हावें म्हणून अगोदर स्वतःचें वाईट करून घेणें. Cut off your nose to spite your face.

**आपल्या कानीं सात बाळ्या**– एखाद्या वाईट कृत्यांत आपलें अंग मुळींच नाहीं किंवा तें आपणांस ठाऊक नाहीं असें दाखविणें असल्यास या म्हणीचा उपयोग करतात. ( कानांत सात बाळ्या घातल्यानंतर त्यांनीं सगळा कान झांकून जावयाचा व कर्णपटलावर कोणताही ध्वनि येणें अशक्य व्हावयाचें. त्यावरून अज्ञान असणें हा अर्थ. ) To profess total ignorance of.

**आलें अंगावर तर घेतलें शिंगावर**– अंगावर घेणें=हल्ला करणें, अंगावर येऊन पडणें; शिंगावर घेणें=शिंगानें उचलणें. बैलाला मारणारा माणूस त्या बैलाच्या शिंगांच्या टप्प्यांत आला तर तो शिंगानें त्याला उचलण्याला कमी करीत नाहीं. यावरून आयता मिळालेला फायदा करून घेणें हा अर्थ. To take advantage of an opportunity that offers itself without being sought for.

**उघड्या डोळ्यानें प्राण जात नाहीं**– एक मांजर होतें, तें उंदीर धरण्यासाठीं मेल्याचें सोंग करून निश्चित पडून राहिलें होतें. पण उंदीर येतात कीं काय तें पाहण्यासाठीं त्यानें डोळे मात्र उघडे ठेविले होते. मांजराची कांहीं हालचाल दिसेना, तेव्हां उंदरांना वाटलें कीं, मांजर खरोखरींच मेलें आहे. म्हणून ते निर्भयपणें हिंडणार होते. पण त्यांतला एक शहाणा उंदीर म्हणाला, 'गड्यांनो, हें मरण नाहीं, सारें ढोंग दिसतें. कारण उघड्या डोळ्यानें प्राण जात नाहीं. मेलेल्याचे डोळे मिटतात आणि याचे तर

उघडे आहेत.' यावरून दुसऱ्याचें नुकसान करण्यास टपणाऱ्या माणसाचें कपट केव्हां ना केव्हां तरी बाहेर येतें असा एक अर्थ; किंवा धडधडीत नुकसान होत आहे हें दिसत असतां त्याचा प्रतिकार न करतां स्वस्थ बसणें हें माणसाच्या हातून घडत नाहीं हा दुसरा अर्थ. हा दुसरा अर्थ अधिक ग्राह्य आहे. One cannot shut his eyes in the face of a glaring iniquity or impropriety.

**उचलली जीभ लावली टाळ्याला**– बोलणें सोपें (करणी कठिण असते); कारण बोलण्यास जीभ उचलून टाळूला लावण्यापलीकडे विशेष कांहीं करावें लागत नाहीं हा अर्थ.

**एका कानानें ऐकावें, दुसऱ्या कानानें सोडून द्यावें**– एखादी गोष्ट ऐकून घ्यावी, पण तिच्याप्रमाणें वर्तन मात्र ठेवूं नये, असें असलें ह्मणजे या ह्मणीचा उपयोग करतात. *cf.* ' नळी फुंकली सोनारें । इकडून तिकडे गेलें वारें ॥ ' In at one ear, out at the other.

**एका हातानें टाळी वाजत नाहीं**– टाळी वाजण्याला दोन हात लागतात, तसे भांडणालाही दोन पक्ष लागतात. ह्मणजे भांडणाचा दोष एकस्यावरच कधीं येत नाहीं; दोन्हीपक्षांकडे थोडथोडा तरी तो वांटला जातो असा अर्थ. It takes two to make a quarrel.

**काखेंत कळसा आणि गांवास वळसा**– बाईच्या कमरेवर पाण्याची घागर असतां ती शोधण्यासाठीं तिनें गांवभर हिंडणें. Absent-mindedness.

**कान आणि डोळे यांच्यांत चार बोटांचें अंतर**– एखादी गोष्ट प्रत्यक्ष पाहणें व तिच्याविषयीं कर्णोपकर्णीं आलेल्या बातम्या ऐकणें यांमध्यें फार तफावत दिसून येते. वस्तुस्थिति असते तशीच ती लोकांच्या तोंडून ऐकूं येत नाहीं.

**कानामागून आला आणि तिखट झाला**–एखादा अल्पवयी मनुष्य मोठ्या माणसादेखत व त्याचा अपमान होईल अशा रीतीनें आढ्यता आणून गोष्टी करतो तेव्हां त्याला ही ह्मण लावतात. (ही म्हण मूळ मिरच्यांच्या झाडावरून निघाली. त्या झाडाला अगोदर पानें येतात आणि

मागून मिरच्या लागतात. त्यावरून 'पानामागून आली०' अशी म्हण निघाली. पुढें 'पाना' बद्दल 'कान' हा शब्द कसा आला असेल तें सांगतां येत नाहीं.)

**कुडी तशी पुडी**— कुडी=शरीर किंवा अंगकाठी; पुडी=अन्नाचें प्रमाण; जसें शरीर तसा आहार.

**ज्याचें पोट दुखेल तो ओवा मागेल**— ज्याला दुःख भोगावें लागतें, तो त्या दुःखाच्या निवारणाच्या तजविजीला लागतो. He who is ill seeks the physician.

**ज्याच्या हातीं ससा तो पारधी**— ज्याच्या हातांत ससा आहे त्यानेंच त्याची शिकार केली असें मानण्यांत येतें, मग त्यानें ती केली असो वा नसो. एखादें कृत्य एकानें केलें असतां तें दुसऱ्याच्या नांवावर विकलें जातें, तेव्हां या ह्म० चा उपयोग करतात. He plays well who wins.

**झांकली मूठ सव्वा लाखाची**— मूठ झांकलेली असली म्हणजे तींत किती किंमतीची वस्तु आहे हें दुसऱ्यास ओळखतां येत नाहीं. तेव्हां हव्या तेवढ्या किंमतीची आहे असें सांगतां येतें. पण मूठ उघडली आणि वस्तु नजरेस पडली कीं, लोक तिची खरी किंमत करतात. म्हणून अंगीं दुर्गुण असले तर ते झांकून ठेवावे, तोंडानें त्यांचा उच्चार करूं नये किंवा अन्य रीतीनें व्यक्त होऊं नयेत अशी खबरदारी घ्यावी म्हणजे माणसाची लोकांत प्रतिष्ठा राहते असा अर्थ. *cf.* मौनं सर्वार्थसाधनम् Silence is golden. Hold your tongue and you will pass for a wise man.

**डोळा तर फुटूं नये आणि काडी तर मोडूं नये**— असें सरळ व निस्पृहपणाचें वर्तन ठेवा कीं, त्यापासून कोणाचा उपमर्द होऊं नये, पण त्याबरोबर आपणा स्वतःलाही कोणापुढें वांकण्याचा प्रसंग येऊं नये.

**डोळ्यांत केर आणि कानांत फुंकर**— रोग एक आणि उपाय भलताच असें कोणी केलें म्हणजे वरील म्हणीचा उपयोग करतात.

**तोंड करी बाता ढुंगण खाई लाथा**— एखादा मनुष्य तोंडानें स्वतःची हवी तेवढी प्रतिष्ठा मिरवितो, पण त्याची खरी योग्यता म्हणजे दुसऱ्याच्या लाथा खाण्याइतकी, अशाविषयीं ही ह्मण योजतात.

**तोंड धरून बुक्क्यांचा मार**— एखाद्यावर विनाकारण आळ घेऊन त्याला त्याबद्दल शिक्षा करावयाची, पण स्वतःच्या बचावार्थ त्याला कांहीं एक बोलूं द्यावयाचें नाहीं अशा जुलुमाला ही म्हण लावतात. बोलतां येत नाहीं, आणि विनाकारण शिक्षा मात्र भोगावी लागते अशी स्थिति. It is the greatest misery to suffer and at the same time to have to keep silence.

घायकांचा जन्म म्हणजे तोंड दाबून बुक्क्यांचा मार म्हणतात तें अक्षरशः खरें आहे. —पण लक्षांत०

**दांत कोरून पोट भरत नसतें**— मोठ्या व्यवहारांत कृपणपणानें थोडीशी कसर करून भागत नाहीं.

**दुसऱ्याच्या डोळ्यांतलें कुसळ दिसतें, पण स्वतःच्या डोळ्यांतलें मुसळ दिसत नाहीं**—दुसऱ्यांतलें अल्पस्वल्प व्यंग दिसतें, पण स्वतःच्या अंगचा ढोबळ दोष माणसाला दिसत नाहीं. One can see a mole in another's eye, but not a beam in one's own.

**दोन डोळे शेजारीं, भेट नाहीं संसारीं**— एखादा मित्र जवळच रहात असून क्वचित् काळीं त्याची भेट होत असली ह्मणजे या ह्मणीचा उपयोग करतात.

**पांचीं बोटें सारखीं नसतात**— विषमता ही वस्तुमात्रांत आहेच, एक वस्तु दुसरीसारखी कधीं नसते, असें दाखवितांना या ह्मणीचा उपयोग करतात. Dissimilarity is a law of nature.

**पाय धू ह्मणे तोडे केवढ्याचे ?**— जें काम करावयाचें तें सोडून भलत्या गोष्टीची उठाठेव कशाला ? *cf.* 'उचल पत्रावळी म्हणे जेवणार किती ?' 'घर सारव, तर म्हणे कोनाडे किती ?'

**पायाखालीं मुंगी मरणार नाहीं**— इतकें जपून व हळू हळू चालणें कीं, पायाखालीं कीड मुंगी सांपडली तरी ती चिरडली जाणार नाहीं. फार हळू चालणारा व त्याचप्रमाणें अत्यंत निरुपद्रवी अशा माणसाविषयीं ही म्हण योजतात.

**पायींची वहाण पायींच बरी**— ज्याची जितकी योग्यता त्याला तितक्या बेतानेंच वागविलें पाहिजे. पायांत घालण्याची वहाण डोक्यावर

कोणी घेत नाहीं किंवा वेणींत घालण्याचीं फुलें पायांखालीं कोणी चुरडीत नाहीं. हलक्यांचा वाजवीपेक्षां अधिक सन्मान झाला म्हणजे ते शेफारतात. यासाठीं तसें करूं नये हा अर्थ. Every thing is good in its place.

पोट पाठीस लागलेंच आहे– पोटाला मिळविण्यासाठीं सर्वांनाच उद्योग करावा लागतो.

पोट लागलें पाठीसीं
हिंडवीतें देशोदेशीं । –तुकाराम.

बावळी मुद्रा आणि देवळीं निद्रा– दिसण्यांत बावळा, पण खरोखर व्यवहारचतुर अशा माणसासंबंधानें या ह्मणीचा उपयोग करतात.

बुडत्याचा पाय खोलांत– ज्याचा अपकर्ष व्हावयाचा असतो, त्याची वाईट गोष्टीकडे प्रवृत्ति होते. *cf.* 'विनाशकाले विपरीत बुद्धिः' Infatuation or head-strong recklessness is observable in a man sinking into ruin.

भांडणाचें तोंड काळें– ह्मणजे त्याचें दर्शनसुद्धां नको, इतकें तें अशुभ व त्याज्य आहे असा अर्थ. ( तोंड काळें करणें हा संप्रदाय पहा. )

भित्याच्या पाठीस ब्रह्मराक्षस– भित्रा माणूस आपल्या भित्रेपणाच्या पायींच आपल्यावर अधिक भीति ओढून आणितो. Foolish fear invites further dangers.

मऊ सांपडलें ह्मणून कोंपरानें खणूं नये– एखाद्याच्या चांगुलपणाचा फार फायदा घेऊं नये. Give a clown your finger and he will take your whole hand.

मारत्याचे हात धरवतात, पण बोलणाराचें तोंड धरवत नाहीं– एखादा प्रत्यक्ष काठी घेऊन मारूं लागला तर त्याला प्रतिबंध करतां येतो, पण आपल्यामागें कोणी आपली निंदा करूं लागला, तर ती बंद करणें आपल्या हातची गोष्ट नाहीं.

मुलाचे (पोराचे) पाय पाळण्यांत दिसतात– पुढें मोठेपणीं मुलगा कसा निघेल याचा अंदाज त्याच्या लहानपणाच्या कृत्यांवरून करतां येतो. A child is the father of the man.

या बोटाची थुंकी त्या बोटावर करणें- मुलें पालथा हात करून मधल्या बोटाच्या मागच्या बाजूस मधल्या पेऱ्यावर थुंकी लावतात आणि मग दुसऱ्याला फसविण्याकरितां एकदां अलीकडचें एक बोट व एकदां पलीकडचें एक बोट अशीं जुळवून दाखवितात. अशानें पहिल्यांदा जी थुंकी जोडींतल्या पलीकडच्या बोटावर दिसते, तीच दुसऱ्यांदा अलीकडच्या बोटावर दिसल्याचा भास होतो. यावरून लटपटपंची करून वस्तूचें स्वरूप निरनिराळें करून दुसऱ्यास फसाविणें. To contrive to evade blame.

लाथ मारील तेथें पाणी काढील- जमिनीवर लाथ मारून पाणी काढावयाला अंगांत अलौकिक सामर्थ्य पाहिजे. यावरून सामर्थ्यवान्, हुषार असा अर्थ.

शीर सलामत तो पगड्या पचास- शीर शाबूद राहिलें (जिवंत राहिलों) तर एक सोडून पन्नास पगड्या मिळतील (पैसे मिळवितां येतील). *cf.* Health is wealth. Life is more than meat and the body than raiment.

शेंडी तुटो कीं पारंबी तुटो- एकजणानें वडाच्या झाडाच्या ज्या पारंब्या खालीं लोंबल्या असतात त्याला आपली शेंडी बांधली व तो झोंके घेऊं लागला. त्याचा इतका निश्चय होता कीं, शेंडी तुटो कीं पारंबी तुटो, तिकडे न पहातां झोके घेण्याची हौस पुरवून घ्यावयाची. यावरून जिवावर उदार होण्याइतक्या धाडसी व दृढ निश्चयाच्या माणसाच्या कृत्यासंबंधानें बोलतांना ही म्हण योजतात.

हंसतील त्यांचे दांत दिसतील- लोकांच्या हंसण्याची पर्वा करावयाची नाहीं असें म्हणावयाचें असल्यास या म्हणीचा उपयोग करतात.

हात ओला तर मैत्र भला- (कोणाला कांहीं वस्तु देऊन टाकावयाची असली तर ती पाण्यानें भिजवून देतात. यावरून ओला हात म्ह० कोणाला कांहीं देण्यानें सामर्थ्य अथवा दातृत्व.) जोंपर्यंत मनुष्य दुसऱ्याला देत असतो तोंपर्यंत त्याच्याशीं सगळे मित्रत्वानें वागतात. Our friend is friendly whilst our hand is full.

**हातचें सोडून पळत्याच्या पाठीस लागूं नये**– जें खात्रीनें आपलें आहे (आपणांस मिळणारच) तें सोडून जें अनिश्चित आहे (मिळेलच अशी खात्री नाहीं) तें मिळविण्याच्या नादीं लागूं नये. A bird in hand is worth two in the bush.

**हातच्या कांकणास आरसा कशाला ?**– हातांतलें कांकण प्रत्यक्ष डोळ्यांनीं दिसण्यासारखें असतां तें पाहण्यासाठीं आरशासारख्या साधनाचें साह्य घेऊं पाहणें हा खुळेपणा आहे. म्हणजे जी गोष्ट उघड सिद्ध आहे ती दाखविण्यासाठीं पुराव्याची जरूरी नाहीं. We do not want a candle to see the sun.

मी म्हणतों माझ्या आनंदीची परीक्षाच झाली नाहीं. पण हातच्या कांकणाला आरसा कशास पाहिजे ? पैज लावा. –त्राटिका.

**ह्या हाताचें या हातावर**– येथल्या येथेंच; वाईट कृत्यांचीं फळें या लोकींच मिळतात अशा अर्थी.

---

## २ पशु, पक्षी, इ० वरून झालेल्या म्हणी.

**अगे अगे म्हशी मला कां नेशी ?**– एका माणसाचें बायकोशीं नित्य भांडण होई, तेव्हां 'मला हें खपायचें नाहीं, अशानें मी एखादे दिवशीं उठून जाईन' असें बायकोला धाक दाखविण्यासाठीं तो म्हणत असे. पण बायकोनें नवऱ्याचें पाणी ओळखलें होतें. एके दिवशीं त्यानें उठून जाण्याचा धाक घालतांच 'बरें आहे, जायचें तर जा' असें ती म्हणाली. लाजेकाजेस्तव त्याला जावें लागलें. तो उठला आणि नदीचे कांठीं जाऊन आतां घरीं परत जाण्यास काय युक्ति करावी याचा विचार करीत बसला. तेव्हां त्याला एक युक्ति सुचली. नदीवर पाणी पिण्यासाठीं म्हशी आल्या होत्या, त्यांत त्याची स्वतःची म्हैस होती. तिच्या मागोमाग तो गेला आणि म्हैस घरांत जाऊं लागली, तेव्हां 'अगे अगे म्हशी मला कां नेशी' असें मोठ्यानें म्हणत तिची शपटी धरून आंत गेला. जणूं काय म्हशीनें त्याला ओढून आणिलें होत ! यावरून कांहीं तरी पोकळ सबब सांगून आपली फजिती छपविण्याचा यत्न करणें असा अर्थ.

अतिशहाणा त्याचा बैल रिकामा– एक मनुष्य होता. तो आपणांस अतिशहाणा समजत असे. बैलाकडून काम घेतलें म्हणजे त्याला भूक फार लागेल व मग दाणावैरण ज्यास्त घालावी लागेल यासाठीं तो त्या बैलाला रिकामा ठेवीत असे. यावरून स्वतःस शहाणा ह्मणविणारांचें मूर्खपणाचें कृत्य असा अर्थ. Too much cunning overreaches itself.

उंदराला मांजर साक्ष– उंदरावर एखादें किटाळ आलें तर त्याच्या बाजूनें साक्ष द्यावयाला मांजर नेहमीं तयार असणारच ! कारण, मांजराला हें माहीत असतें कीं, उंदराला संकटांतून सोडविण्यानें त्याच्यावर आपले उपकार होतील आणि त्याच्या मोबदल्यांत आपणांस त्याला वाटेल तेव्हां खातां येईल. यावरून ज्याचा एखाद्या गोष्टींत हिताचा संबंध आहे त्याला त्या गोष्टीबद्दल विचारणें व्यर्थ आहे हा अर्थ. Summon not your enemy to befriend you.

उंटावरून शेळ्या हांकणें– एकाला शेळ्या चारण्यास सांगितलें तर तो पायीं त्यांच्या मागोमाग न जातां उंटावर बसून हांकूं लागला. यावरून अतिशय आळस किंवा हलगर्जीपणा करणें असा अर्थ. To evince superlative sluggishness or indolence.

एकानें गाय मारली ह्मणून दुसऱ्यानें वांसरू मारूं नये– एकानें एक मोठी वाईट गोष्ट केली, या सबबीवर दुसऱ्यानें लहान कां होईना पण दुसरी वाईट गोष्ट करणें वाजवी नाहीं हा अर्थ.

कसायाला गाय धारजिणी– धारजिणी ह्म० फलद्रूप होणारी. कसाई निष्ठुरपणानें गाईचा घात करणारा, पण ती त्याच्यापुढें गरीब होते. कडक रीतीनें वागविणाऱ्या धन्याची चाकरी नोकर लोक बरोबर करतात, गरीब धन्याची टेंगळतांड करतात, असें दाखवितांना या म्हणीचा उपयोग करतात.

कावळ्याच्या शापानें गाई ( ढोरें ) मरत नसतात– क्षुद्र माणसांनीं थोरामोठ्यांना कितीही दूषणें ठेविलीं तरी त्यापासून त्यांचें कांहीं नुकसान होत नाहीं.

एखादा भेरडा वेड लागून भलभलतें बडबडूं लागला, ह्मणजे तेवढ्यानेंच कोणाच्या अंगीं चांडाळपण थोडेंच येतें ! कावळ्याच्या० —अतिपीड०

कुत्र्याचें शेंपूट नळींत घातल तरी वांकडेंच—देहस्वभाव पालटत नाहीं. It is impossible for an Ethiopian to change his skin or a leopard to change his spots.

कुत्र्याचें शेंपूट नळकांड्यांत घातलें तरी तें वांकडें तें वांकडेंच—जातिस्वभावच वाईट असला तर तो सुधारण्यासाठीं कितीही श्रम केले तरी ते फुकटच जावयाचे. वाईट माणसांना सुधारण्याचा किती ही यत्न केला तरी वाईट तीं वाईटच राहणार. Some characters can never be reformed.

कोंबडें झांकलें ह्मणून तांबडें फुटावयाचें राहत नाहीं—(किंवा उजेडावयाचें राहत नाहीं)—एखादी गोष्ट बाहेर न फुटावी ह्मणून आपण कितीही प्रयत्न केला तरी तिचे स्वाभाविक परिणाम व्हावयाचे ते होतीलच. कोंबडा उजेडण्याचे वेळीं आरवतो ह्मणून तो झांकून ठेवण्यानें उजेडण्याचें राहत नाहीं. योग्य वेळीं उजाडतेंचें.

कोल्हा काकडीला राजी— कोल्ह्याची किंमतच तितकी, ह्मणून तो काकडीसारखी क्षुद्र वस्तु मिळाली तरी तेवढ्यावर संतुष्ट होतो. Little things please little minds.

गाढवांचा गोंधळ, लाथांचा सुकाळ— गाढवें जमून गोंधळ करूं लागलीं ह्मणजे तीं परस्परांना लाथा मारीत रहावयाचीं. त्यांच्या जमण्यापासून दुसरें कांहीं निष्पन्न व्हावयाचें नाहीं. यावरून हलकट माणसांच्या हातून परस्परांना शिवीगाळ करणें यासारखीं हलकटपणाचींच कृत्यें होणार, त्यांच्या पासून चांगल्या कृत्यांची अपेक्षाच करतां येत नाहीं असा अर्थ.

गाढवानें शेत खाल्ल्याचें पाप ना पुण्य— गाढव हें अपवित्र पशु मानलें आहे, तेव्हां त्याला शेत खाऊं देण्यानें पाप लागत नाहीं तसें पुण्यहीं लागत नाहीं. गाईला खाऊं घातल्यानें पुण्य लागतें. यावरून दुर्जनावर उपकार करण्यापासून कांहीं उपयोग नाहीं, व्यर्थ श्रम मात्र घडावयाचे असा अर्थ.

गाढवाच्या पाटीवर साखरेची गोणी—गाढव पाटीवर साखरेची गोणी वाहून असलें तरी तिचा त्याला कांहीं उपयोग होत नाहीं, किंवा त्याला

करून घेतां येत नाहीं. नुसती एखाद्या गोष्टीची अनुकूलता असून उपयोग नाहीं, तिचा फायदा करून घेण्याची शक्तिही पाहिजे.

**गाढवाला गुळाची चव काय माहीत !**— गुळाची चव माणसालों कळते, गाढवाला कळत नाहीं. यावरून एखाद्या गाजरपारख्याला रत्नाची परीक्षा करण्यास सांगणें, किंवा अरसिकाला काव्याचें परीक्षण करण्यास सांगणें हें उपहास्यास्पद व निरर्थक आहे असा अर्थ.

**गाढवापुढें वाचली गीता कालचा गोंधळ बरा होता**— मूर्खाला कितीही उपदेश केला तरी तो त्याच्या मनावर ठसत नाहीं. ( 'गांवढ्यापुढें वाचली गीता' हा पाठ अर्थाच्या दृष्टीनें अधिक शुद्ध आहे. कारण गांवढ्याचें गोंधळांत जितकें मन रमतें तितकें गीतेचा पाठ श्रवण करण्यांत नाहीं. ) A fool is a fool for all time. Casting pearls before swine.

**गांवढ्या गांवांत गाढवी सवाष्ण**— यांत 'गाढवी' बद्दल 'गांवढी' पाठभेद पाहिजे. गांवढी = खेडवळ स्त्री. लहान खेडेगांवांत सवाष्ण पाहिजे असली तर एखादी खेडवळ स्त्रीच मिळावयाची हा अर्थ. लहान गांवांत क्षुद्र माणसालासुद्धां महत्त्व येतें. *cf*. आंधळ्यांत काणा राजा.

**गोगलगाय आणि पोटांत पाय**— गोगलगाय ही सरपटत जाते. तिचे पाय बाहेर दिसत नाहींत. यावरून जो माणूस बाहेरून गरीब दिसतो, पण ज्याचे मनांत कपट भरलें असतें व जो गुप्तपणें खोडसाळपणा करतो त्याला ही संज्ञा देतात. A wolf in sheep's clothing.

**घोडा मैदान जवळ आहे**— घोडा धांवण्यांत कसा काय आहे याची परीक्षा मैदानांत होते. तें मैदान जवळ आहे ह्मणजे परीक्षेची वेळ जवळ आहे असा अर्थ. *cf*. 'हा सूर्य आणि हा जयद्रथ.' The hour has come and also the man.

**जन्मा आला हेला, पाणी वाहतां मेला**— हेल्याच्या हातून त्याच्या जन्मांत पाणी वाहण्यापलीकडे कांहीं सत्कृत्य थोडेंच घडावयाचें आहे ! यावरून निर्बुद्ध किंवा जड माणसें नुसतीं 'खायाला काळ भुईला भार' होतात, त्यांच्या हातून कोणतेंही सत्कृत्य न घडल्यामुळें त्यांचा जन्म वृथा होतो असा अर्थ.

जाईल तेथें हत्ती, नाहीं तेथें मुंगीसुद्धां जाणार नाहीं– कांहीं ठिकाणीं वाजवीपेक्षां पुष्कळ अधिक निरर्थक खर्च होतो, आणि कांहीं ठिकाणीं अगदीं क्षुद्र बाबतींतसुद्धां चिकित्सा आणि काटकसर होते अशा तऱ्हेची अव्यवस्था.

**टिटवीनें समुद्र आटविला**– प्रथमदर्शनीं जी गोष्ट अगदीं असंभाव्य किंबहुना अशक्य वाटते, ती दीर्घोद्योगानें घडवून आणितां येते असा या म्हणीचा अर्थ. या म्हणीच्या उपपत्तीविषयीं पुढील गोष्ट आहे:– एका टिटवी पक्ष्याच्या मादीनें समुद्राच्या कांठाशीं एका खडकाच्या भगदाडांत अंडीं घातलीं होतीं. तीं भरतीचे वेळीं समुद्राचें पाणी खडकावर फिरून समुद्रांत गेलीं. टिटवी परत आल्यावर माझीं अंडीं मला परत दे असें समुद्राला ह्मणू लागली. पण त्यानें तिचें बोलणें लक्षांतच घेतलें नाहीं. यावरून रागावून समुद्र कोरडा करण्याची तिनें प्रतिज्ञा केली आणि लागलीच आपल्या चोंचींत पाण्याचा एकेक थेंब घेऊन ती समुद्र कोरडा करण्याच्या उद्योगाला लागली. तिचा नर मार्गानें जात होता, त्याला तिनें सगळी हकीकत सांगितली, तेव्हां तोही तिच्या मदतीला आला. इतक्यांत नारदमुनि तेथें आले. त्यांनीं ही त्यांची सगळी गोष्ट ऐकून घेतली आणि त्यांच्या दीर्घ प्रयत्नाचें अभिनंदन केलें. पुढें नारद गरुडाकडे गेले आणि त्याला म्हणाले कीं तूं ‘ पक्ष्यांचा राजा म्हणवितोस, आणि समुद्राचा सूड घेण्यासाठीं टिटवी जिवापाड श्रम करीत आहे, तिला मदत करीत नाहींस हें बरोबर नाहीं. ’ तेव्हां गरुडपक्षी आपल्या असंख्य पक्ष्यांच्या गणासह मदतीला धांवला. याप्रमाणें आरंभीं जी गोष्ट अगदीं क्षुद्र वाटली, तिला बरेंच मोठें गंभीर स्वरूप प्राप्त झालें. इतके सगळे पक्षी झटून काम करूं लागले तर समुद्र तेव्हांच कोरडा होईल आणि आपण उन्हांत तळमळून मरूं अशी माशांना भीति वाटून त्यांनीं विष्णूची प्रार्थना केली, आणि विष्णूनीं मग समुद्राकडून टिटवीचीं अंडीं तिला परत देवविलीं, अशी कथा या ह्मणीच्या मुळाशीं आहे.

**डोंगर पोखरून उंदीर काढणें**– अचाट परिश्रम करून त्याची फलश्रुति फारच अल्प झालेली दाखविणें; उलट अल्पस्वल्प गोष्टीसाठीं फार यातायात करणें अशा अर्थींही ही ह्मण योजतात. Much ado about nothing. The mountain was in labour and brought forth a mouse.

**थोरां घरचें श्वान त्यास सर्वही देती मान**— मोठ्यांच्या घरच्या माणसालाच मान मिळतो असें नाहीं, तर कुत्र्यालासुद्धां ( ह्म० अगदीं हलक्यासलक्यालासुद्धां ) लोक मान देतात. मोठ्यांच्या आश्रयाचा प्रभावच मोठा असा अर्थ.

**दुभत्या गाईच्या लाथा गोड**— गाय दूध देत असली आणि मग ती लाथा मारीत असली तरी मनुष्य त्या सहन करतो; म्ह० ज्याच्यापासून आपला कांहीं लाभ घडत आहे अशा माणसानें वेळेस झिडकारलें तरी मनुष्य ती वागणूक लाभासाठीं मुकाट्यानें सहन करतो.

**धर्माचे गाई आणि दांत कांगे नाहीं**— धर्मार्थ अथवा फुकट मिळालेल्या वस्तूंत खोड काढीत बसूं नये; कारण ती बोलून चालून धर्माचीच ! ( पुष्कळ जनावरांची परीक्षा त्यांच्या दांतांवरून होते. यावरून दांत किती आहेत हें पाहणें म्हणजे चिकित्सा करणें असा अर्थ. ) Do not look a gift horse in the mouth.

**बैल गाभणा तर ह्मणे नववा महिना**— निकृष्टप्रतीच्या खुशामतीचें हें एक उदाहरण आहे. ज्याचेकडून कार्य करवून घ्यावयाचें आहे त्यानें कांहींहीं ह्मटलें तरी त्याला ‘ होस हो ’ हें उत्तर द्यावयाचें, मग तें ह्मणणें कितीहीं वेडेपणाचें असो. उदा० एकानें म्हटलें, ‘ हा बैल गाभणा आहे ’ तर त्याला खुष करण्यासाठीं दुसऱ्यानें म्हणावयाचें, ‘ होय आहे खरा, याला नववा महिना असला पाहिजे. ’ *cf.* ‘ सांगाल ती पूर्व दिशा. ’ The language of the sycophants.

**बैल गेलान झोपा केला**— ( झोपा = निवाऱ्याची जागा. ) बैल थंडीनें मेल्यावर त्याच्यासाठीं निवाऱ्याची जागा करणें. *cf.* वरातीमागून घोडें. Shut the stable-door after the horse is stolen.

**भरंवशाचे ह्मशीस टोणगा**— एखाद्या ह्मशीला पारडीला होईल असा पूर्ण भरंवसा असतां तिला टोणगा होणें; ह्मणजे पूर्ण निराशा हा अर्थ. Disappointment from a quarter on which reliance had been placed.

**मांजराचे गळ्यांत घांट कोणीं बांधावी ?**— एक मांजर उंदीर खाण्यास टपकलें होतें. त्याच्यापासून आपलें रक्षण कसें करतां येईल या

गोष्टीचा विचार करण्यासाठीं उंदराची एक सभा भरली होती व त्यांत असें ठरलें कीं, मांजराचे गळ्यांत घांट बांधलेली असली ह्मणजे तें आल्याची वातमी त्या घांटेच्या आवाजानें सर्व उंदरांना कळेल व ते पळून गेले ह्मणजे मांजराच्या हातीं कोणी लागणार नाहीं. युक्ति चांगली ह्मणून सर्वांनीं माना डोलविल्या. पण एक वृद्ध उंदीर होता तो म्हणाला, 'मित्रहो, युक्ति तर नामी आहे; पण मांजराच्या गळ्यांत घांट बांधण्यास कोण पुढें होतो ?' असें विचारतांच सगळे चूप बसले. कोणी पुढें येईना. यावरून एखादी दिसण्यांत सोपी पण करण्यास अशक्य अशा गोष्टीसंबंधानें ही म्हण योजितात. Who shall hang the bell about the cat's neck ?

मुंगीला मुताचा पूर– थोडेसें जरी संकट असलें तरी क्षुद्र प्राण्यांना तेंच भारी होतें.

मुंगी होऊन साखर खावी, हत्ती होऊन लांकडें मोडूं नयेत– अंगीं थोडीशी नम्रता धारण केली कीं सर्वांची मर्जी संपादन होऊन लाभ होतो; तेंच दुसऱ्याशीं कुऱ्यानें वागलें म्हणजे संकटांना तोंड द्यावें लागतें. Better be little and lowly with some comforts than be great with all the hardships of greatness.

मोर नाचतो ह्मणून लांडोरही नाचते– मोराचें पाहून लांडोर नाचूं पाहते, पण तिला मोरासारखा पिसारा नसल्यामुळें तिचें नाचणें शोभत नाहीं. यावरून एक करतो म्हणून त्याचें पाहून दुसऱ्यानें तसें करणें योग्य नाहीं. दुसऱ्याचें अनुकरण करण्याला देखील अंगीं योग्यता लागते. *cf.* एकीनें घातली सरी, ह्मणून दुसरीनें घातली दोरी.

लकडीवांचून मकडी वठणीस येत नाहीं– (मकडी=माकड.) माकड फार खोडकर असतें. कितीही सौम्य उपाय करून पाहिले तरी खोड्या करण्याचा त्याचा स्वभाव जात नाहीं. त्याला ताळ्यावर आणण्याला एकच उपाय ह्मणजे लकडी [ मार ] हा आहे. यावरून हलकट किंवा मूर्ख हे मारानेंच वठणीस येतात हा अर्थ. *cf.* शहाण्यास मार शब्दाचा.

वरातीमागून घोडें– लग्नाच्या वरातीच्या मिरवणुकींत सर्वांच्या पुढें चांगले शृंगारलेले कोनवाली घोडे चालविण्याची चाल आहे. यावरून वरात

निघून गेल्यावर मागाहून घोडे नेणें व्यर्थ, त्याप्रमाणें एखादी गोष्ट होऊन गेल्यावर मागाहून तत्संबधाचीं साधनें जुळविणें व्यर्थ होय हा अर्थ. A day after the fair.

**वाघ म्हटलें तरी खातो, वाघोबा म्हटलें तरी खातो**– एखाद्याशीं उर्मटपणानें वागणें आणि सौम्यपणानें वागणें दोन्ही सारखेंच व्यर्थ होतें, अशा ठिकाणीं ही म्हण योजतात. जंगलांत वाघाशीं गांठ पडल्यावर त्याला 'वाघोबा' असें बहुमानपूर्वक नांव दिलें तरी तो खावयाला सोडीत नाहीं.

**वासरांत लंगडी गाय शहाणी**– जेथें सगळेच अप्रबुद्ध जमलेले असतात, तेथें अर्धवट शहाणासुद्धां मोठा पंडित किंवा शहाणा समजला जातो. *cf.* गांवढ्या गांवांत गाढवी सवाण. A figure among ciphers.

**विंचवाचें बिऱ्हाड पाठीवर**– विंचू चालतांना आपली नांगी पाठीवर घेऊन चालतो. या गोष्टीला अनुलक्षून ही म्हण निघाली आहे. ज्या माणसाजवळ सामानसुमान किंवा दुसरें लटांबर फारसें नसतें, अशा माणसासंबंधानें ही म्हण योजतात.

**शिंक्याचें तुटलें, बोक्याचें पटलें**– शिंक्यावर ठेवलेलें दूधदुभतें शिंकें तुटून खालीं पडलें तर खालीं बसलेल्या बोक्याचा आयताच फायदा होतो. यावरून अकल्पित रीतीनें एखादी गोष्ट झाली व तिजमुळें एखाद्याला पाहिजे होतें तें आयतेंच मिळालें म्हणजे ही म्हण योजतात.

**शेळी जाते जिवानिशीं, खाणार म्हणतो वातड**– शेळीच्या मांसाची सागुती केली. तिच्यापायीं गरीब बिचाऱ्या शेळीचा जीव गेला तो गेलाच, आणि खाणाराचेंही समाधान झालें नाहीं. (त्याला ती आवडली नाहीं.) एखाद्यानें जीव तोडून झटावें, आणि एखादी गोष्ट करून दाखवावी; पण ती दुसऱ्याच्या पसंतीस न येतां त्यानें उलटीं नांवें ठेवावीं, अशा प्रसंगीं ही म्हण योजतात.

**हत्तीच्या पायीं येते आणि मुंगीच्या पायीं जाते**– हत्तीची चाल जलद असते आणि मुंगीची फारच मंद असते. यावरून लवकर येतें आणि हळू हळू जातें हा अर्थ. (बहुधा दुखणें, विपत्ति इ. संबंधानें या म्हणीचा उपयोग करतात.)

———

## ४ विरोध, असंबद्धता इ० दाखविणाऱ्या म्हणी.

**अन्नसत्रीं ( अन्नछत्रांत ) जेवणें, मिरपूड मागणें**– अन्नसत्रांतलें जेवण म्हणजे बोलून चालून धर्माचे खातर घातलेलें. तेथें श्रीमंतीचे चोचले करणें योग्य नाहीं असा अर्थ. To dine upon charity and call out for sauce.

**आईजीच्या जिवावर बाईजी उदार**– जेव्हां एखादा मनुष्य दुसऱ्याचा पैसा हवा तसा उधळपट्टीनें खर्चतो तेव्हां या म्हणीचा उपयोग करतात. To be generous with the property of another.

**आधींच उल्हास त्यांत आला फाल्गुन मास**– अगोदर स्वतःलाच अश्लील, निलाजरें कृत्य करण्याची हौस ! त्यांत शिमगा आल्यानें तसें करण्यास मोकळीक मिळाली. मग परिणाम काय विचारावयाचा आहे ! स्वतःच्या हौसेंत दुसऱ्याच्या उत्तेजनाची भर पडली असा अर्थ.

**आधींच तारें आणि त्यांत शिरलें वारें**– (आधींच उल्हास त्यांत आला फाल्गुन मास ही म्हण पहा. )

**आंधळ्या बहिऱ्यांची गांठ**– आंधळ्याला दिसत नाहीं, बहिऱ्याला ऐकूं येत नाहीं. दोघेही पंगुच. यावरून पंगु, कर्तृत्वहीन, परस्परांना मदत करण्यास असमर्थ, अशांची गांठ असा अर्थ.

**आपण हंसे लोकाला शेंबूड आपल्या नाकाला**– एखादा दुर्गुण स्वतःच्या अंगीं असतां दुसऱ्याच्या अंगीं मात्र तो दुर्गुण पाहिल्याबरोबर त्यांना हंसणारीं अशीं कांहीं माणसें असतात. त्यांना उद्देशून ही म्हण योजतात. जसें, एका लंगड्यानें दुसऱ्या लंगड्याला हंसावें किंवा एका उनाड पोरानें दुसऱ्याला उनाड म्हणून त्याचा उपहास करावा. Thou seest a mole in the eyes of others, but not a beam in your own.

**आपला तो बाब्या, दुसऱ्याचें तें कारटें**– मनुष्य स्वतःस्यासंबंधानें जी उदार बुद्धि ठेवितो ती दुसऱ्याच्या संबंधानें नाहीं. बाब्या हा शब्द प्रेमवाचक आणि कारटें हा तिरस्कारवाचक आहे. All his geese are swans.

**आपला हात आणि जगन्नाथ**— स्वतःला कांहीं घेणें झालें तर मग कोण कमी करतो! हातास लागेल तेवढें घेत सुटावयाचें हा अर्थ. ( जगन्नाथपुरीला गेलेल्या यात्रेकरूंनीं तेथें ठेविलेला देवाचा प्रसाद हवा तेवढा घ्यावा अशी मुभा असते. त्यावरून विपुलता व हवा तेवढा भाग घेण्याची मोकळीक या दोन गोष्टी व्यक्त करणें असल्यास या म्हणीचा उपयोग करतात. )

**आयत्या पिठावर ( बिळांत ) नागोबा**— येथें पीठ म्ह० आसन ( बसण्याची जागा ). एखाद्यानें स्वतःसाठीं एखादी चांगली गोष्ट संपादन करावी आणि दुसऱ्यानें ती उपटून तिचा आयता फायदा घ्यावा, असें झालें म्हणजे ही म्हण लावतात. ( दुसऱ्यानें केलेलें बीळ नागोबाला आंत शिरण्याला आयतेंच उपयोगी पडतें. ) He who seizes the fruit of another's labour.

**आहे ( असेल ) ते दिवस दिवाळी, नाहीं ( नसेल ) ते दिवस शिमगा**— दिवाळीचे दिवस जसे आनंदाचे, उत्साहाचे असतात, तसे शिमग्याचे दिवस अशुभ, दुःखाचे गणले आहेत. यावरून मिळेल तेव्हां उधळपट्टीनें खर्च करणें व न मिळेल तेव्हां उपास करणें असा अर्थ.

जो मनुष्य आहे ते दिवस दिवाळी, नाहीं ते दिवस शिमगा, या न्यायानें वागणारा आहे त्याच्या घरादारावरून नांगर फिरून त्याच्या हातांत लवकरच नारळाची आई येण्याचा संभव आहे. —नि० चं०

**उतावळा नवरा, गुडघ्याला बाशिंग**— लग्नाचे वेळीं कित्येक जातींत डोक्याला बाशिंग बांधण्याची चाल आहे. पण एखादा मनुष्य लग्नाला इतका उतावीळ झाला कीं, जमिनीवर तबकांत ठेविलेलें बाशिंग उचलून डोक्यापर्यंत हात नेण्याला उशीर लागेल म्हणून त्यानें मध्येंच गुडघ्यालाच तें बांधिलें, तर अशा विलक्षण उतावळेपणाला ही म्हण चांगली शोभते. Much too impatient.

**उपट सूळ घे खांद्यावर**— नसतें लचांड मागें लावून घेणें. सूळ हा शब्द प्राणावरचे संकटाचा द्योतक आहे. To draw upon one self an evil by one's folly.

**एकदां कानफाट्या नांव पडलें कीं पडलें**— कानफाटे हे गोसाव्यां-

तली एक जात आहे. हे कानांना मोठालीं भोंकें पाडून कुंडलें घालतात. त्यावरून त्यांना कानफाटे नांव मिळालें. यांच्या वर्तनासंबंधानें लोक नेहमीं साशंक असतात. यावरून एकदां लोकांमध्यें अप्रीति किंवा शंका उत्पन्न झाली कीं ती सहसा जात नाहीं, कायम होऊन बसते असा अर्थ. दुसरी उपपत्ति– एकदां कान फाटले म्ह० कानाला भोंक पाडलें कीं तें जन्मभर रहातें. यावरून एकदां दुष्कृत्य केलें कीं जन्मभराचा कलंक लागला हा अर्थ.

**एक ना धड भाराभर चिंध्या**– कोणतेंही एक वस्त्र सबंद नाहीं, सगळे तुकडे तुकडे, अशाचा फारसा उपयोग होत नाहीं. त्याचप्रमाणें कोणत्याही एका विषयाचें पूर्ण ज्ञान नाहीं, सगळे विषय अर्धवट चावलेले, अशाचा फारसा उपयोग नसतो. Jack of all trades and master of none.

कांहीं दिवस हा अभ्यास कर, कांहीं दिवस तो कर, पुढें तिसराच हातीं घे... असें होतां होतां एक ना०......... असा प्रकार होतो. –ओक.

**एकाची जळते दाढी, दुसरा त्यावर पेटवूं पहातो विडी**– एकाच्या दाढीला आग लागली, तेव्हां तो ती विझवूं लागला. तेव्हां दुसरा ह्मणतो, 'थांबा, थांबा, विझवूं नका, मला विडी पेटवून घेऊं द्या.' दुसऱ्याच्या संकटाचा विचार न करतां त्यापासून सुद्धां स्वतःचा यत्किंचित् फायदा करून घेण्यास पहाणाराविषयींची ही ह्मण आहे.

**ओळखीचा चोर जिवानिशीं सोडीत नसतो**– कारण त्यानें तसें केलें तर ज्याला सोडलें तो सरकारी अधिकाऱ्याकडे फिर्याद करून त्या चोराचें नांव व ठावठिकाण सांगून त्याला पकडून आणवील. A soured friend is your bitterest enemy.

**कशास नाहीं ठिकाण, बुधवारचें लग्न**– ( कसा = रुपये ठेवण्याची अरुंद पिशवी. ) खर्चाच्या रकमेची जुळवाजुळव झालेली नाहीं आणि लग्नतिथि तर बुधवारीं ( अगदीं जवळ ) घेऊन ठेपली. ह्मणजे वायफळ गोष्टी असा अर्थ.

* **काळ आला होता, पण वेळ आली नव्हती**– यांत काळ = अंत किंवा नाश करणारा, आणि वेळ = संधि असे अर्थ घेतले पाहिजेत. नाशा

होण्याचें कारण उपस्थित होतें, पण थोडक्यानें वांचलें असा भाव. One had a narrow escape.

**कोठें इंद्राचा ऐरावत आणि कोठें शामभटाची तटाणी**– एक अतिशय थोर आणि दुसरी अतिशय क्षुद्र अशा दोन गोष्टींचा विरोध दाखवायाचा असल्यास या ह्मणीचा उपयोग करतात. *cf.* कहां राजा भोज और कहां गंगा तेलण.

**खावयाला काळ, भुईला भार**– ज्याचा कोणाला कांहीं उपयोग नाहीं असा पृथ्वीला भारभूत मनुष्य.

**गांवचा रांडया, घरचा देशपांड्या**– सगळ्या गांवांत जो वेडसर किंवा मूर्ख ह्मणून ठरलेला तो सुद्धां आपल्या स्वतःच्या घरांत मोठा अधिकार गाजवितो.

**गुळावरल्या माशा किंवा साखरेवरले मुंगळे**–जोंपर्यंत गोडी ( उत्कर्षाचे दिवस आहेत ) तोंपर्यंत मित्र ह्मणविणारे. *cf.* Cup–board love.

**चांभाराच्या देवाला खेटराचीच पूजा**–( पृ० ९४ वर ही ह्मण दिली आहे ती पहा. )

**चार दिवस सासूचे, चार दिवस सुनेचे**– सून लहान असते तेव्हां सासू आपला अधिकार गाजविते; पण पुढें त्याच सुनेला मुलेंबाळें झालीं व सासू म्हातारी झाली म्हणजे सुनेला आपला अधिकार गाजविण्याची संधि मिळते. Every dog has his day.

**चोराचें पाऊल चोर जाणे**– चोराचीं लक्षणें चोरालाच चांगलीं ठाऊक असतात. Set a thief to catch a thief.

**चोराच्या उलट्या बोंबा**– एक चोर चोरी करून पळत चालला असतां त्याला कोणीं पाहिलें. तो आतां ओरड करील व मग लोक जमा होऊन आपणांस पकडतील त्यापेक्षां आपणच चोर चोर म्हणून ओरडावें म्हणजे आपण चोर नाहीं असें लोक समजतील असें जाणून तो ओरडला. तेव्हां लोक फसले, आणि दुसरीकडे चोराचा शोध करूं लागले. तोंपर्यंत हा खरा चोर पसार झाला. यावरून स्वतः गुन्हा करून पुनः स्वतःच ओरडा करणें असा अर्थ.

**चोराच्या मनांत चांदणें**– चांदणें पडलें काय ही भीति चोरांच्या मनांत नेहमीं डांचत असते. आपल्या मनांत ज्या गोष्टीची भीति असते तिच्याशीं सादृश्य असलेली एखादी गोष्ट दिसली कीं लागलीच भीति वाटते. A thief always fancies that it is moon-light.

**चोराच्या वाटा चोराला ठाऊक**– चोरकर्मांतल्या खाचाखुब्या चोरांना जशा ठाऊक असतात, तशा इतरांना नाहीं. *cf.* चोराचीं पावलें चोर जाणे. Set a thief to catch a thief.

**चोराच्या हातची लंगोटी**– चोरानें सर्वस्वी लुबाडल्यावर लज्जा रक्षण करण्यापुरती एखादी चिंधी मिळाली तरी मेहरबानीच ह्मणावयाची. यावरून ज्याच्याकडून कधीं कांहीं मिळावयाचें नाहीं त्याच्याकडून जेवढें निघेल तेवढें भाग्याचें हा अर्थ. Get what you can from a bad pay-master.

**चोराला सोडून संन्याशाला सुळीं देणें**– खऱ्या अपराध्याला सोडून निरपराध्याला शिक्षा करणें.

**चोरावर मोर**– एका चोरापासून वस्तु उपटून नेणारा सवाई चोर. यांत ' मोर ' हा शब्द केवळ नादसादृश्यानें वापरला आहे. मयूरपक्षी हा अर्थ विवक्षित नाहीं. A thief set upon by another thief.

**जेवीन तर तुपाशीं नाहीं तर उपाशीं**–अतिशय दुराग्रहाचें किंवा हटवादीपणाचें लक्षण; माझ्या सगळ्या अटी कबूल केल्या तर माझी समजूत होईल, नाहीं तर मला कांहीं नको असें ह्मणणें. My own terms or none.

**ज्या गांवच्या बोरी त्याच गांवच्या बाभळी**– एखादा मनुष्य बढाया मारूं लागला ह्मणजे ' आह्मी तुला पक्के ओळखून आहों ' असें सुचविण्यासाठीं ही ह्मण योजितात. ( एकाच गांवांतले लोक परस्परांना चांगले ओळखीत असतात. )

**ज्याचें करावें बरें तो ह्मणतो माझेंच खरें**– एखादा मनुष्य आपल्या उपकारकर्त्यावर उलटला किंवा त्यानें सांगितलेली स्वतःच्याच हिताची गोष्ट ऐकेनासा झाला म्हणजे ही ह्मण योजितात.

ढवळ्याशेजारीं बांधला पोंवळा, वाण नाहीं पण गुण लागला- ढवळ्या ( पांढऱ्या ) रंगाच्या बैलाशेजारीं पोंवळ्यासारख्या ( साधारण गुलाबी ) रंगाचा दुसरा बैल बांधला, तर त्याचे रंग पालटत नाहींत ( सारखे सारखे होत नाहींत ); पण एकाचे गुण मात्र दुसऱ्याला लागतात. एक मारका असला तर दुसराही मारावयाला शिकतो. यावरून वाइटाच्या संगतीनें चांगलीं माणसें सुद्धां बिघडतात असा अर्थ. One contracts bad qualities from the company of another more easily than good ones.

ताकापुरतें रामायण- एक बाई दुसऱ्या बाईकडे ताक मागण्यास गेली. तिचें ताक करण्याचें काम चाललें होतें, तोंपर्यंत या बाईनें तिला खुष करण्यासाठीं रामायणाची कथा सांगण्यास सुरुवात केली आणि भांड्यांत ताक मिळाल्याबरोबर ती कथा घाईघाईनें संपविली. *cf.* 'कामापुरता राम.'

ताकाला जाऊन भांडें लपविणें- दुसऱ्याजवळ कांहीं मागावयाचें झालें तर तें उघड उघड न मागतां आढेवेढे घेऊन मागणें.

तुह्मी आह्मी एक, कंठाळीला मेख- कंठाळ स्त्री० सामान वाहण्यासाठीं घोड्यावर गोणपाटाचें जें बारदान केलें असतें ती. एऱ्हीं तुह्मी आह्मी एक; पण कंठाळीला ( सामानाच्या पिशवीला ) मात्र हात लावूं नका असा अर्थ. ( मेख ठोकून कंठाळीचें तोंड बंद करण्याची चाल पूर्वीं असे. )

तुला फें तुझ्या बापाला फें- दोघांचीही पर्वा करीत नाहीं. A fig for you and your father too.

तेल गेलें, तूप गेलें, हातीं धुपाटणें आलें- एका गृहस्थानें प्रवासांत एके ठिकाणीं मुक्काम केला असतां आपल्या नोकराला तेल व तूप हीं दोन्हीं बाजारांतून आणण्यास सांगितलें. त्या नोकरानें त्या दोन जिनसांकरितां भांडीं घ्यावयाचीं तीं न घेतां तो तसाच गेला. दुकानीं गेल्यावर त्याला भांड्याची आठवण झाली. तेव्हां जवळच्या एका देवळांत जाऊन त्यानें तेथलें धूप जाळण्याचें पात्र-धुपाटणें-घेतलें आणि तेल्याकडे जाऊन त्या धुपाटण्यांत तेल घेतलें. पुढें वाणी तूप देऊं लागला, तेव्हां धुपाटणें पालथें करून त्याच्या खोलगट भागांत त्यानें तूप घेतलें. पालथें करतांना घेतलेलें तेल अर्थात् सांडलें. मुक्कामाला आल्यावर यजमानानें

विचारलें, ' अरे, तूं नुसतें तूप आणिलेंस, पण तेल कोठें आहे ? ' ' हें पहा येथें आहे ' असें म्हणून दाखविण्यासाठीं नोकरानें धुपाटणें पुनः पालथें केलें. त्यामुळें तूप होतें तेंही सांडलें. अशा रीतीनें तेल गेलें, तूपही गेलें आणि नुसतें धुपाटणें तेवढें हातीं राहिलें. म्हणजे दोन फायद्याच्या गोष्टी असल्या आणि दोन्ही मूर्खपणामुळें हातच्या जाऊन मनुष्य पुनः कोरा करकरीत राहिला म्हणजे ही म्हण योजतात. He who hunts two hares leaves the one and loses the other.

तो पाप देणार नाहीं तर पुण्य कोठून देणार–तो फारच कृपण आहे. वाईट वस्तु देखील दुसऱ्यांला त्याच्यानें देववत नाहीं, मग चांगली देववत नाहीं यांत काय नवल !

तोबऱ्याला पुढें, लगामाला मागें–तोबऱ्यांत घोड्याचा दाणा असतो. यावरून तो० म्हणजे खाण्याचे वेळीं मात्र पुढें आणि काम करावयाचे वेळीं मात्र अळंटाळं असा अर्थ. *cf*. ' खानेकू मे और लढनेकू मेरा बडा भाई. ' A drone.

नकटीच्या लग्नाला सत्राशें विघ्नें–नकट्या मुलीचें लग्न अगोदर जुळत नाहीं, जुळलें तरी त्यांत अनेक अडचणी असतात. यावरून ज्यांत व्यंग आहे अशा कामांत अडचणींवर अडचणी येतात असा अर्थ.

नकटें व्हावें, पण धाकटें होऊं नये–शरीरांत व्यंग असलेलें पतकरलें, पण धाकटेपण येऊं नये. कारण धाकट्याची प्रतिष्ठा कोणी ठेवीत नाहीं. त्याला नेहमीं अरेतुरे करतात, कामें सांगतात व हलकें लेखतात, तसें नकट्याचें होत नाहीं.

न करत्याचा वार शनिवार–एखादें काम करण्याचें मनांत नसलें म्हणजे शनिवारीं करूं असें सांगतात. शनिवार हा अशुभ वार असल्यामुळें त्या दिवशीं पैसे देणें घेणें वगैरे कामें करूं नयेत असें सांगितलें आहे. यावरून काम न करण्याचा वार शनिवार होऊन बसला.

न खात्या देवाला नैवेद्य–देव नैवेद्य खात नाहीं म्हणून त्याला रोज लोक नैवेद्य दाखवितात. यावरून जो घेणार नाहीं अशी आपली पक्की खात्री असते त्याला एखादी वस्तु घेण्याविषयींचा आग्रह करणें असा अर्थ.

नदीचें मूळ आणि ऋषीचें कूळ पाहूं नये— केवढी ही भागीरथी,— सिंधूसारखी मोठी नदी असली तरी तिचा उगम एखाद्या लहानशा ओहोळांत किंवा अतिशय दुर्गम अशा अडचणीचे जागीं असलेला आढळतो; त्याचप्रमाणें ऋषि ह्मणजे परम पूज्य; पण पुष्कळ ऋषींचा जन्म हीनत्वाचा असल्याविषयीं महाभारत वगैरे ग्रंथांतून कथा आहेत. सारांश, पूज्यपणा आणि पवित्रता हीं पूर्वपरंपरेवर नसून ज्याच्या त्याच्या अंगच्या गुणावर व चरित्रावर असतात.

नव्याचे नऊ दिवस— कोणत्याही गोष्टीचा नवीनपणा फार काळपर्यंत टिकत नाहीं. तो लवकरच जातो, आणि मग ती गोष्ट मागें पडते. A new broom sweeps clean.

नाचतां येईना अंगण वांकडें— आपणांस एखादें काम चांगलें करतां आलें नाहीं ह्मणजे आपला उणेपणा झांकण्यासाठीं कांहीं तरी दुसऱ्या वस्तूंत खोड काढणें. A bad workman quarrels with his tools.

नांव मोठें, लक्षण खोटें— कीर्ति मात्र मोठी, पण कृति पहावी तर खोटेपणाची किंवा नांवाला ( कीर्तीला ) खोटेपणा आणणारी; किंवा बडबड फार, आणि कृति थोडी. Great braggers are little doers.

नांव सोनूबाई हातीं कथलाचा वाळा— ( नांव मोठें लक्षण खोटें ही ह्मण पहा. )

पाद्र्याला निमित्त पावट्याचें— जो मूळचाच पाद्रा त्याला पावटे खाल्ल्याचें निमित्त आयतेंच सांपडतें. मनुष्य आपल्या वर्तनाला निमित्तच शोधूं लागला तर तें त्याला कोठेंही सांपडेल असा अर्थ. He that is disposed for mischief will never want an occasion.

पालथ्या घागरीवर पाणी— पालथ्या घातलेल्या घागरीवर कितीही पाणी ओतलें तरी तें तींत थोडेंच मावणार आहे ! तें निघून जावयाचें. त्यावरून निष्फळ होणारा उपदेश किंवा श्रम यांसंबंधानें ही ह्मण योजितात. Instruction to a selfwilled person goes for nothing; a vain labour.

**पिंडीं तें ब्रह्मांडीं**– ( पिंडीं=मनुष्याचे शरीरांत. ) जसें मनुष्याचें शरीर तसेंच ब्रह्मांड. मनुष्य हें लहानसें ब्रह्मांडच आहे असा भावार्थ. Man is a microcosm.

**पिशाचाच्या हातीं कोलीत**– अगोदरच खोड्या करण्याची ज्याला हौस त्याच्या हातीं कोलीत पडल्यावर मग काय विचारावयाचें आहे? तो जिकडे तिकडे आग लावीत सुटणारच *cf.* 'आधींच मर्कट तशांतहि मद्य प्याला' इ. A firebrand in the hand of a madman.

**पी हळद हो गोरी**– हळद प्याल्याबरोबर काळें माणूस गोरें होत नाहीं. कोणत्याही गोष्टीचें कार्य किंवा परिणाम घडण्याला थोडाफार कालावधि लागतो. यावरून या ह्मणीचा अर्थ उतावीळपणा असा झाला आहे. Great impatience.

आजपर्यंत लोकांनीं जीं मोटमोठालीं कामें उरकलीं, तीं लागलींच 'पी हळद हो गोरी' या न्यायावर उरकलीं नाहींत. –नि० चं०

**पै दक्षिणा लक्ष प्रदक्षिणा**– देणें थोडें आणि त्याबद्दल काम मात्र चोपून घ्यावयाचें. लक्ष प्रदक्षिणा करण्याबद्दल दक्षिणा काय तर ह्मणे एक पै ! !

**पुराणांतलीं वांगीं पुराणांत**– ( पृ० ४० वर ही म्हण दिली आहे ती पहा. )

**फूल नाहीं, फुलाची पाकळी**– वास्तविक जितकें देणें द्यावयास पाहिजे, तितकें देण्याचें सामर्थ्य नसल्यामुळें त्यापेक्षां कांहीं कमी देणें. To give according to one's ability.

तुम्ही आमचें एवढें काम करा, आम्ही तुम्हास, फूल नाहीं, फुलाची पाकळी देऊं.

**बडा घर पोकळ वासा**– नांवाप्रमाणें अंगांत गुण नसणें. *cf.* नांव मोठें लक्षण खोटें. Large pretentions carry little merit.

**बसतां लाथ उठतां बुक्की**– सदासर्वदा मार. A kick or a cuff at all hours.

मीं तिला करड्या नजरेनें वागवून बसतां लाथ उठतां बुक्कीचा खुराक चालू केला. –फाल्गुनराव.

चळी तो कान पिळी– ज्याच्या अंगांत जोर असतो तो दुसऱ्यांचे कान उपटून आपलाच अंमल बसवितो. Might is right.

बाजारांत तुरी भट भटणीला मारी– बाजारांतून तुरीची डाळ घरीं आणण्याचे अगोदरच ती शिजविण्यासंबंधानें नवराबायकोंत भांडण होऊन भट बायकोला मारतो. यावरून जी गोष्ट घडून यावयाची आहे, तिच्याबद्दल अगोदर व्यर्थ वाद घालीत बसणें असा अर्थ. Counting the chicken before they are hatched.

दादा मुंबईस आल्यास त्यानें आपल्याच घरीं रहावें अशाबद्दल मी त्यास आग्रह करूं लागलें. तो ह्मणे कॉलेजांत राहणें चांगलें. मी ह्मणे तें कांहीं नाहीं याप्रमाणें बाजारांत०......

बायकांत पुरुष लांबोडा– बायकांच्या समाजांत पुरुषांनीं जाणें योग्य नाहीं असें सुचविणारें हें वाक्य आहे. हें वाक्य लहान मुलींच्या तोंडीं असतें.

मीं त्यांस "रांड्या राघोजी" किंवा बायकांत पुरुष लांबोडा असें ह्मणावें व मग त्यांनीं रागवावें. –पण लक्षांत०

विगारीचें घोडें, तरवडाचा फोक–(विगार ह्म० मोल न देता करून घेतलेलें काम; तरवड हें एक झाड आहे; फोक ह्म० नीट, सरळ फांदी.) मनुष्य स्वतःच्या घोड्याची काळजी घेतो तशी विगारीच्या घोड्याची घेत नाहीं. वि० घोड्याला मारावयाला तरवडाचा फोक (अतिशय लागणारा, कातडें सोलणारा) घेतो; यावरून दुसऱ्याच्या वस्तूची काळजी कोण घेतो! हा अर्थ. *cf.* भाड्याचें घोडें ओझ्यानें मेलें.

भटाला दिली ओसरी, भट हातपाय पसरी– कोणी एक पांथस्थ रात्रीं राहण्यापुरती जागा मागूं लागला. तेव्हां घराच्या मालकाला दया येऊन त्यानें ओसरी रिकामी करून दिली. भटजीबुवांनीं हळू हळू जवळची जागा घेतली व कांहींना कांहीं निमित्त काढून ते घरांतही घुसण्यास पाहूं लागले. यावरून थोडासा प्रवेश होतांच हळू हळू आपला पाय अधिक शिरकविण्यास कोणी पाहूं लागला ह्मणजे या ह्मणीचा उपयोग करतात. Give him an inch and he will take an ell.

मनाची नाहीं, पण जनाची तरी ठेवावी– यांत 'जनाची' या

शद्वापुढें 'लाज' हा शब्द अध्याहृत समजावा. Deference to people is essential.

**मनांत मांडे, पदरांत धोंडे**– मनुष्य मनोराज्यांत गर्क असतो तेव्हां सर्व कांहीं गोष्टी आपणास अनुकूल आहेत असें त्यास वाटत असतें. पण प्रत्यक्ष पदरांत काय पडलें तें पहावें तर दगड ! ( म्हणजे कांहीं नाहीं. )

**मळमळीत सौभाग्यापेक्षां झळझळीत वैधव्य बरें**– ज्या स्त्रीला नवऱ्यानें टाकलेलें असतें तिची स्थिति विधवेपेक्षांही कठिण होते. अर्धवट स्थिति दुःसह होते असा अर्थ. Death is preferable to suspense.

**मानला तर देव, नाहीं तर धोंडा**– जे मूर्तिपूजक आहेत तेच दगडें किंवा धातू वगैरेंच्या केलेल्या मूर्तींना देव समजून त्यांच्यापुढें नम्र होतात, बाकीचे लोक त्या मूर्तींना धोंडा समजून कांहींच मान देत नाहींत. यावरून मान ठेवला तर ठेवला, नाहीं तर नाहीं. मानासाठीं सर्वथा दुसऱ्यावर अवलंबून रहावें लागतें हा अर्थ.

माझें व तुझें देवाच्या घरचें नातें असें आहे कीं, मीं तुला सांगावें आणि तूं माझें निमूटपणें ऐकावें. पण 'मानला०' --संभाजी.

**ये रे माझ्या मागल्या, कण्या भाकरी चांगल्या**– दुसऱ्याच्या ताब्यांत राहून मोठेपणा मिळविण्यापेक्षां स्वतंत्रपणानें पूर्वीच्यासारखें कण्याभाकरी खाऊन गरिबीनें राहणें चांगलें असें अनुभवाअंतीं कळणें. यावरून पुढें पाऊल न पडतां पूर्वपदावर येणें ( मूळची गरिबीची स्थिति प्राप्त होणें ) असा अर्थ.

**रिकामा न्हावी, भिंतीला तुंबड्या लावी**– तुंबडी लावून शरीरांतलें नासकें रक्त काढणें हें काम न्हावी करीत असे. यावरून रिकामा उद्योग करीत बसणें हा अर्थ.

**लाज नाहीं मना, कोणी कांहीं ह्मणा**– मनाची लाज ज्याची सुटली तो लोकांनीं केलेल्या उपहासाची कोयें पर्वा बाळगणार आहे ? When shame is extinct in the soul, universal reproach is powerless.

**लाडें लाडें केलें वेडें**– मुलाचे फार लाड केले ह्मणजे तें वेडेवेडे चार करूं लागतें. *cf.* Spare the rod and spoil the child.

लोकां सांगे ब्रह्मज्ञान, आपण कोरडे पाषाण- लोकांस उपदेश करावयाचा पण स्वतः मात्र त्या उपदेशाप्रमाणें वागावयाचें नाहीं, अशा वर्तनाच्या लोकांसंबंधानें तुकारामबुवांनीं वरील वाक्य लिहिलें आहे. Physician, heal thyself.

वराती पाठीमागून घोडे- लग्नाच्या वरातीचे मिरवणुकींत शृंगारलेले कोतवालघोडे पुढें चालवीत असतात. वरात गेल्यावर मागून ते नेण्यांत अर्थ नाहीं. यावरून एखादी गोष्ट होऊन गेल्यावर मग तिच्या उपयोगाची सामग्री घेऊन पोंचणें असा अर्थ. To be a day after the fair.

वाणला तितका घाणला- जितकी जास्त स्तुति केली तितका अधिक बिघडला.

हटीं जेवण आणि मठीं निद्रा- येथें हट (हाट) म्ह० बाजार. कोठें तरी जेवावयाचें आणि कोठें तरी पडावयाचें, स्वतःचें घरदार नाहीं असा अर्थ.

हपापाचा माल गपापा- (हपापा म्ह० लोकांचा तळतळाट.) लोकांचा तळतळाट घेऊन मिळविलेलें द्रव्य झपाट्यानें (गपापा) जातें. Ill-gotten, ill-spent.

हलवायाच्या घरावर तुळशीपत्र- (आईजीच्या घरावर बाईजी उदार ही म्हण पहा.) देवाला नैवेद्य दाखवितांना वाढलेल्या ताटावर तुळशीपत्र घालून मग नैवेद्य दाखवितात, म्हणजे तदर अन्न देवाला अर्पण केल्याचें तुळशीपत्र हें चिन्ह आहे. त्यावरून परभारें दुसऱ्याचें घर तिसऱ्याला देणें हा अर्थ.

---

## ५ नीति, धर्म, व्यवहार इ० संबंधीं म्हणी.

अचाट खाणें मसणांत जाणें- खाण्यापिण्यांत अतिरेक करणें हें अनेक रोगांचें मूळ आहे. त्याचा परिणाम मृत्यु हाच व्हावयाचा. Excess in eating is the breeder of diseases.

अडला नारायण गाढवाचे पाय धरी- कितीही मोठा मनुष्य असला

तरी अडचणीच्या वेळीं त्याला एखाद्या मूर्ख मनुष्याची खुशामत करण्याची पाळी येते. A man in distress knows no honor.

अति तेथें माती– माती ह्मणजे विनमोलाची वस्तु; यावरून माती होणें ह्मणजे किंमत नष्ट होणें. मर्यादेचें उल्लंघन झालें म्हणजे माणसाची किंमत उरत नाहीं असा अर्थ. Avoid extremes.

अतिरागा भीक मागा– मनुष्याला अतिराग कामाचा नाहीं. त्यानें मनुष्य भिकेला लागतो हा अर्थ. Passion leads to poverty.

अंथरूण पाहून पाय पसरावे– ऐपतीच्या मानानें खर्च ठेवावा. Cut your coat according to your cloth.

असंगाशीं संग आणि प्राणाशीं गांठ– ज्याची संगति धरूं नये त्याच्याशीं सख्य केल्यास जीव जाण्याचा प्रसंग एखादे वेळीं यावयाचा. A bad company leads to ruin.

असतील शितें तर मिळतील भुतें– घरांत खावयाला असल्यावर खाणारांची काय वाण ! चालता काळ असल्यावर भोजनभाऊ हवे तेवढे मिळतात. Prosperity gains friends.

असेल त्या दिवशीं दिवाळी, नसेल त्या दिवशीं शिमगा– दिवाळी हा आनंदाचा मंगल दिवस आणि शिमगा त्याच्या उलट–अमंगल दिवस. यावरून अनुकूलता असेल त्या वेळीं चैन करून घ्यावी, विपत्तीचे दिवस आले ह्मणजे रडावें असा अर्थ. A feast when the purse is full, a fast when it is empty.

आकारें रंगती चेष्टा– हीं ह्मण पुढील संस्कृत श्लोकावरून आलेली आहे– 'आकारैरिंगितैर्गत्या चेष्टया भाषणेन च । नेत्रवक्त्रविकाराभ्यां लक्ष्यतेऽन्तर्गतं मनः ॥' ह्मणजे आकार, इंगित, चालचलणूक, कृति, भाषण, डोळे, मुद्रा इ० गोष्टींवरून मनुष्याच्या मनांत काय चाललें आहे तें साधारणपणें कळतें. या श्लोकाचा पहिलाच चरण अपभ्रष्ट होऊन मराठींत ह्मण होऊन बसला आहे. मनुष्याच्या बाह्य स्वरूपावरून त्याच्या हातून घडणाऱ्या कृतींचें स्वरूप ताडतां येतें हा या ह्मणीचा अर्थ आहे. *cf.* Face is the mirror of man's mind.

आधीं बुद्धि जाते मग ( भांडवल ) लक्ष्मी जाते– अगोदर बुद्धिभ्रंश होऊन मनुष्य वेडेचार करतो, तेव्हां मग त्याच्या धनाचा नाश होतो. Pride goes before fall.

उधाराचें पोतें सव्वा हात रितें– जिन्नस उधार घेण्यानें पुरवठ्यास येत नाहीं. कारण उधार माल महाग मिळतो. Purchases on credit are extravagantly dear.

एक घाव दोन तुकडे– झटपट निकाल. उगाच भिजत प्रकरण न ठेवतां एका तडाक्यासरशीं निकाल. A quick despatch.

एक पंथ दो काज– ( पंथ = मार्ग; काज = काम ) एकाच मार्गावरचीं दोन कामें एका खेपेंत करतां येतात. Killing two birds with one stone.

एका म्यानांत दोन सुऱ्या रहात नाहींत– एकाच घरांत दोन सवती सुखानें नांदत नाहींत किंवा एकाच धंद्याचीं दोन माणसें परस्परांचा मत्सर केल्याशिवाय रहात नाहींत असा अर्थ.

ऐकावें जनाचें, करावें मनाचें– कोणतीही गोष्ट करतांना सर्वांचा विचार घ्यावा आणि आपल्याशीं सगळ्या गोष्टींचा विचार करून योग्य दिसेल तें करावें. *cf*. Give every man thy ear, but few thy voice.

कडू कारलें तुपांत तळलें, साखरेंत घोळलें, तरी कडू तें कडूच– ज्याचा जन्मस्वभावच वाईट त्याला सुधारण्याचे सगळे प्रयत्न व्यर्थ होत.

काडी चोर तो पाडी चोर– काडी ( क्षुद्र वस्तु ) चोरल्याचें एकदां सिद्ध झालें ह्मणजे पुढें त्यानें पाडी ( वासरी ) सारखी मोठी वस्तु चोरली असा आळ साहजिकच येतो. Steal a penny, steal a pound.

कांहीं सोन्याचा गुण, कांहीं सवागीचा गुण– सोनें उजळतांना सवागी नांवाच्या एका पदार्थाचा उपयोग करीत असतात. सोनें चांगलें असलें ह्मणजे तें उजळ दिसतेंच, पण कांहीं अंशीं सवागीही उजळपण देण्यास कारणीभूत होते. यावरून एखादी गोष्ट घडवून आणण्यांत जसें थोरामोठ्यांचें तसेंच लुंग्यासुंग्यांचेंही साह्य होतें असा अर्थ.

**कुडास कान, ठेवी ध्यान**– कूड=भिंतीच्या ऐवजीं कांबट्या, काऱ्या इ० चें भिंतीसारखें बांधतात तें. कुडास कान असतात ह्मणजे कुडाच्या अथवा भिंतीच्या आडून कोणी ऐकल्यामुळें गोष्ट बाहेर फुटते. ह्मणून सावधगिरीनें बोल असा अर्थ. Walls have ears.

**कुचेष्टेवांचून प्रतिष्टा नाहीं**– जगांत प्रतिष्ठा मिळवावयाची असेल तर कांहीं तरी अलौकिक कृत्य केलें पाहिजे; त्यावांचून ती मि त नाहीं. Success is conditional on performance.

**कुंभाराची सून कधीं तरी उकिरड्यावर येईलच**– जी व्हावयाची अशी एखादी गोष्ट आज नाहीं उद्यां होईलच असा अर्थ (कुंभारांचें उकिरड्याशीं नेहमीं काम पडतें. तेव्हां आज नाहीं उद्यां कुंभाराची सून त्या कामासाठीं उकिरड्यावर येणारच.)

**कुऱ्हाडीचा दांडा गोतास काळ**– (गोत=जातभाई, संबंधी, आप्त.) कुऱ्हाडीचा दांडा लांकडाचा असतो व तो; लांकडें फोडण्यास ह्म० आपल्या गोताच्या नाशास कारण होतो; यावरून देशद्रोही, आपल्या जातभाईचें नुकसान करणारा असा अर्थ.

ज्या धनाजीची एक मांडी समरांगणीं जखमी झाली व ज्या धनाजीरावाला स्वराज्योत्कर्षाचा एवढा अभिमान, त्या शूराच्या पोटीं हा मंगलनिधि चंद्रसेन उत्पन्न झाला आणि स्वराज्याशीं निमकहरामीपणा करून 'कुऱ्हाडी०......झाला.'–बाजी०

**कोंड्याचा मांडा करून खावा**– कोंडा जरी आपण खात असलों (कोंडा खाण्याइतकी गरिबी जरी असली) तरी तो समाधानानें खावा ह्मणजे मांड्यासारखा गोड लागतो. जें मिळेल त्यांत सुखासमाधानानें रहावें.

**कोरडी आग पुरवते, ओली आग पुरवणार नाहीं**– या ठिकाणीं कोरडी आग ह्मणजे प्रत्यक्ष अग्निनारायणानें केलेली हानि, विस्तवानें लागलेली आग असा अर्थ, आणि ओली आग ह्म० भूक असा अर्थ उद्दिष्ट आहे. Pangs of hunger are more intolerable than ravages made by fire.

**कोळसा कितो उगाळला तरी काळाच!**– ज्याचें अंतर्बाह्य काळें तें कितीही उगाळलें तरी काळेंच रहावयाचें, पांढरें व्हावयाचें नाहीं. वाईट तें वाईटच. There is no washing the black white.

**खर्चणाराचें खर्चतें आणि कोठावळ्याचें पोट दुखतें**– खुद्द यजमान कांहीं एक गोष्टीचा खर्च मंजूर करतात, पण त्यांचे मुनीम किंवा कारकून मालकाच्या मंजुरीप्रमाणें खर्च करण्यास कां कूं करतात तेव्हां या ह्मणीचा उपयोग होतो.

**खाई त्याला खवखवे**– खवखवणें ह्म० घशांत कंडू सुटणें. यावरून जो वाईट काम करतो त्याच्या पोटांत तें डांचत असतें असा अर्थ.

**खाईन तर तुपाशीं, नाहीं तर उपाशीं**– मी ह्मणेन तें ऐकलें तर ठीक आहे, नाहींपेक्षां मी रुसून बसणार असा हट्ट. My own terms or none so ever.

**खाऊं जाणें तो पचवूं जाणें**– जो कांहीं एखादें कृत्य करतो तो त्या कृत्याचे परिणाम भोगण्यासही स्वतः समर्थ असतो. जो पैसे खातो त्याला हिशेबांत लटपटी कशा कराव्या तें शिकवावें लागत नाहीं.

**खाऊन माजावें, टाकून माजूं नये**– अन्नाचा उपयोग खाऊन पुष्ट होणें हा आहे. अन्न खाल्लें म्हणजे तें सत्कारणीं लागलें; तें टाकणें म्हणजे त्याचा दुरुपयोग करणें हें वाईट आहे.

**खाजवून अवधण आणणें**– आपल्या हातानें आपल्या जिवाला त्रास करून घेणें.

**खाजवून खरूज काढणें**– खरूज झालेल्या जागीं खाजविल्यानें खपली धरलेली असली तरी ती निघून खरूज वाढते. त्यावरून मिटलेलीं भांडणें पुनः उकरून काढणें हा अर्थ. To rake up an old quarrel.

**खाण तशी माती**– जसें बीज तसा अंकुर; जशीं आईबापें तशीं मुलें. Like father like son.

> जीचे उदरीं नव उत्पत्ती । तिची निवडली ऐशी जाती ॥
> ह्मणोनि खाण तैशी माती । आहाणा लोकीं प्रसिद्ध ॥ —मुक्तेश्वर.

**खिळ्यासाठीं नाल गेला, नालासाठीं घोडा गेला, घोड्यासाठीं स्वार गेला, एवढा अनर्थ खिळ्यानें केला !**– ही म्हण पुढील गोष्टीवरून निघाली आहे:– एकजण घोड्यावर स्वार होऊन जाण्यास निघाला असतां घोड्याच्या नालेचा एक खिळा निघाला होता तिकडे त्यानें दुर्लक्ष केलें, आणि

घोडा तसाच दामटीत नेला. त्यामुळें बाकीचे खिळे ढिले होऊन नाल पडली घोड्याचा पाय जायबंदी झाला, त्याला ठोकर लागली व त्या ठोकरीमुळें वरचा स्वार अचानक खालीं आपटून मेला. सारांश, थोड्याशा हयगयीमुळें एवढा अनर्थ झाला.

खोट्याच्या कपाळीं गोटा—( किंवा कुऱ्हाडीचा घाव )—जो खोटें काम करतो त्याच्या नशिबीं नुकसान ठेवलेलेंच आहे. Evil to him who evil thinks.

गरजवंताला अक्कल नाहीं—ज्याला गरज आहे त्याला दुसऱ्याचीं हवीं तशीं बोलणीं ऐकावीं लागतात. अशा वेळीं तो शहाणा असला तरी मूर्खांची मनधरणी त्याला करावी लागते. Every poor man is counted a fool.

गरज सरो, वैद्य मरो—जोंपर्यंत वैद्याच्या साह्याची जरूर आहे, तोंपर्यंत त्याच्या पुढें पुढें करावयाचें, गुण आल्यावर मग त्याची आणि आपली ओळख नाहीं असें वर्तन. A fig for the doctor when cured.

गर्जेल तो वर्षेल काय !—जे मेघ फार गर्जना करतात, त्यांचा पाऊस फारसा पडत नाहीं. यावरून ज्याची वटवट फार त्याच्या हातून प्रत्यक्ष कार्य थोडेंच घडणार असा अर्थ. Barking dogs seldom bite.

गर्वाचें घर खालीं—गर्विष्ठ माणसाला अखेर लज्जित होऊन खालीं पाहण्याची किंवा रसातळाला जाऊन पोंचण्याची पाळी येणें. Pride goes before fall.

गाड्यावर नाव नावेवर गाडा—नाव तयार केल्यानंतर ती नदीपर्यंत नेण्यासाठीं गाड्यावर घालावी लागते, त्याचप्रमाणें नदीला पूर आला असतां पैलतीराला नेण्यासाठीं गाडा नावेवर घालावा लागतो. म्हणजे परस्परांना कालपरत्वें परस्परांची मदत लागते. यावरून सर्व दिवस सारखे नसतात असा अर्थ.

गांव आहे तेथें महारवाडा आहेच—महारवाडा म्ह० महार वगैरे अस्पृश्य जातींचे लोकांची राहण्याची जागा. ही प्रत्येक गांवाला असते. यावरून प्रत्येक गोष्टींत कांहीं थोडा फार तरी वाईट, निंद्य, दूषणीय भाग अस-

णारच. Every flock has its black sheep. Every light has its shadow.

गांव करी तें राव न करी– गांवचे सगळे गांवकरी एका मतानें चालले तर त्यांच्या हातून जें महत्कार्य होऊं पावतें तसें प्रत्यक्ष राजाच्या हातूनही घडत नाहीं. एकीची महती या म्हणींत सांगितली आहे.

घर फिरलें म्हणजे घराचे वासेही फिरतात– कुटुंबांतल्या मुख्य पुरुषावर दुर्दैवाचा प्रसंग आला म्हणजे त्याचीं आश्रित माणसेंही त्याच्यावर उलटतात.

घरोघरीं मातीच्याच चुली– बाहेरून भपका आणि आंत अंधेर हा प्रकार सर्वत्र आहे. Every house has its skeleton.

चढेल तो पडेल– जो आपल्या उत्कर्षासाठीं धडपड करील तोच पडेल. जो कांहींच खटपट करणार नाहीं त्याला अपेशाची भीति नाहीं. He that soars high falls farthest.

छडी लागे छम् छम् विद्या येई घम् घम्– लहान मुलांना शिकवितांना छडीचा उपयोग वारंवार केल्यानें मुलगा भराभर विद्या शिकतो. ( अशी जुन्या लोकांची समजूत असे. ) Spare the rod and spoil the child.

जनीं जनार्दन– चार लोक म्हणतील तें खरें. *cf.* ' पांचामुखीं परमेश्वर.' The voice of the people is the voice of God. ( *Vox populi, vox dei.* )

जशी देणावळ तशी धुणावळ– जसा दाम तसें काम. पैसे थोडे दिले तर कामही चांगलें होत नाहीं असा अर्थ.

जळांत राहून माशांशीं वर– आपण ज्या परिस्थितींत राहतों त्या परिस्थितीशीं विरुद्ध कधीं होऊं नये. आपल्या भोंवतालच्या माणसांशीं वांकडें न जातां त्यांच्या साह्यानें सुधारणा करण्याचा यत्न करावा.

जावें त्याच्या वंशा तेव्हां कळे– दुसऱ्याच्या स्थितींत आपण स्वतः जावें तेव्हां तिचें खरें ज्ञान होतें. पाण्यांत मासा झोंप कसा घेतो हें आपण

स्वतः माशाच्या जन्माला जावें तेव्हां कळतें असें याविषयींचें उदाहरण तुकारामबुवांनीं दिलें आहे.

**जित्याची खोड मेल्यावांचून जात नाहीं**— एकदां लागलेली खोड सहसा मरेपर्यंत जात नाहीं. ती कायमची होऊन बसते. Habit is second nature.

**जी खोड बाळा, ती जन्मकाळा**— बाळपणीं जडलेल्या संवयी जन्मभर राहतात.

**ज्याची खावी पोळी त्याची वाजवावी टाळी**— आपल्या अन्नदात्याच्या उपयोगीं पडत असावें; त्याच्या मनाप्रमाणें नेहमीं वागावें. One should be true to one's salt.

**टाकीचे घाव सोसल्याविना देवपण येत नाहीं**— कष्ट केल्यावांचून थोरपण प्राप्त होत नाहीं.

**तळें राखील तो पाणी चाखील**— ज्याच्याकडे एखादें काम सोंपविलें असतें तो त्या कामापासून स्वतःचा थोडा फार तरी फायदा करून घेणारच असा अर्थ.

**थेंबें थेंबें तळें सांचे**— दिसण्यांत क्षुद्र दिसणाऱ्या वस्तूंचा हळू हळू संग्रह केला असता कालांतरानें मोठा संचय होतो. Many a little makes a mickle.

**दगडापरीस वीट मऊ**— निरुपाय ह्मणून मोठ्या संकटापेक्षां लहान संकट पतकरतें. Something is better than nothing. Half a loaf is better than none.

**दसकी लकडी एकका बोजा**— प्रत्येकानें एकेक काठी दिली तर दहाजणांमिळून—अर्थात् एका माणसाचें ओझें—होतें. याचा अर्थ असा कीं, प्रत्येकानें थोडथोडा हातभार लाविला तरी सर्वांमिळून मोठें कार्य होतें. *cf.* थेंबें थेंबें तळें सांचे. Many a little makes a mickle; Many drops make a shower.

**दांत आहेत तर चणे नाहींत, चणे आहेत तर दांत नाहींत**— एक

गोष्ट अनुकूल आहे, पण तिचा उपयोग होण्यास जी दुसरी गोष्ट पाहिजे ती अनुकूल नाहीं, अशी स्थिति होणें. Fortune seldom comes with both hands full.

ज्यांस बुद्धि आहे त्यांस आपलें शिक्षण पुढें चालू ठेवण्यास पैसा नाहीं; ज्यांपाशीं पैसा आहे, त्यांस बुद्धि नाहीं; दांत आहेत तर चणे नाहींत, चणे आहेत तर दांत नाहींत, अशांतला प्रकार !

दाम करी काम, बिबी करी सलाम–पैशानें सगळीं कामें घडवून आणतां येतात. Money makes the mare go.

दिव्याखालीं अंधेर–दिवा दुसऱ्याला उजेड देणारा, पण त्याच्याखालीं पहावा तर अंधेर ! यावरून चांगल्या माणसाचे ठायींसुद्धां एखादा दोष असतो हा अर्थ. Every light has its shadow.

दुधानें तोंड भाजलें ह्मणजे मांजर ताकसुद्धां फुंकून पितें–एकदां अद्दल घडल्यावर मनुष्य अगदीं साध्या गोष्टीसंबंधानेंसुद्धां शंका घेऊन फाजील सावधागिरी बाळगतो. Once bit, twice shy.

दुरून डोंगर साजरे–(' दूरतः पर्वता रम्याः ' ही ह्मण पहा. ) Distance lends a charm.

दैव देतें आणि कर्म नेतें–एखाद्याचा भाग्यानें उत्कर्ष व्हावा, पण लवकरच त्याच्या हातून कांहीं दुष्कृत्य घडून त्यामुळें त्याची हानि व्हावी अशी स्थिति असतां ही ह्मण योजतात.

द्यावें तसें घ्यावें, करावें तसें भोगावें–दुसऱ्याला आपण वागवूं तसा तो आपणाशीं वागेल. जसें कर्म करावें तसें फळ मिळतें. As you sow, so you must reap.

धन्याला धत्तुरा आणि चाकराला मलिदा–एखाद्या वस्तूवर ज्याचा वास्तविक हक्क आहे, त्याला ती न मिळतां, भलत्याच माणसानें त्या वस्तूचा उपभोग घ्यावा, असा प्रकार झाला ह्मणजे या ह्मणीचा उपयोग करितात.

आह्मी आपल्या भांडणांत परक्याला घालून ' धन्याला धत्तुरा आणि चाकराला मलिदा ' अशी स्थिति नेहमीं करून घेत असतों.

**धर्म करतां कर्म उभें रहातें**– दुसऱ्याचें बरें करण्यास जावें तर स्वतः-वर संकट ओढवतें अशी स्थिति असतां ही ह्मण योजतात.

**नवी विटी नवें राज्य**– ( नव्या खेळांत ) सगळाच प्रकार नवीन. नवा खेळ सुरू झाला ह्मणजे गडी नवे, खेळणाराही नवा, सगळेच बदलतात. New lords, new laws.

प्रत्येक विद्यंत व कलेंत पूर्वीच्यासारखे नवे कोणी होत नाहींत ... त्यामुळें सध्यां जे जे तसे आहेत ते खपून गेले ह्मणजे 'नवी विटी नवें राज्य' या ह्मणी-प्रमाणें सगळा हिंदुस्थान लखलखीत होईल. –नि० मा०

**नाक दावलें कीं तोंड उघडतें**– मनुष्याचा श्वासोछ्वास नाकानें किंवा तोंडानें चालतो. दोन्ही बंद करून चालत नाहीं. एखाद्यानें तोंड घट्ट मिटून धरलें तर तें उघडण्याला खात्रीचा उपाय ह्मणजे नाक दाबणें हा आहे. यावरून एखाद्याकडून कांहीं काम करून घ्यावयाचें असलें म्हणजे त्याची दुसऱ्या बाजूनें कुचंबणी केल्यानें तो तें लवकर करतो असा अर्थ.

**पडलेलें शेण माती घेऊन उठतें**– जमिनीवर पडलेलें शेण उचलूं लागल्यास त्या शेणाला लागून थोडीशी तरी भुईवरची माती येतेच. यावरून मनुष्य कितीही नीच असला तरी खटपट केल्यास त्याच्या प्रयत्नाला दुसऱ्याकडून थोडेंबहुत तरी साह्य मिळतेंच हा अर्थ.

**पळसास पानें तीनच**– कोठेंही गेलें तरी मनुष्यस्वभाव सारखाच असावयाचा. Man's character is the same everywhere.

**पांचामुखीं परमेश्वर**–( पृ० ५५ वर ही ह्मण पहा.)

**पिंडीं तें ब्रह्मांडीं**– *cf.* आपल्यावरून जग ओळखावें.

**पुढच्यास ठेंच, मागला शहाणा**– दुसऱ्याचा अनुभवें पाहून मनुष्य शहाणा होतो, व अगोदरच्या माणसानें केलेल्या चुका आपल्या हातून न घडाव्या म्हणून दक्षता ठेवतो. One man's fault is another man's lesson.

इतिहास, बखरी व चरित्रें हीं 'पुढ०' या न्यायानें सर्वांस अत्यंत हितावह आहेत. –बाजीराव.

वडा घर पोकळ वासा– दिसण्यांत मोठें श्रीमंती घराणें, पण ती श्रीमंती खरोखर पाहिली तर पोकळ.

बोलाफुलास गांठ– फूल पडेल असें ह्मणण्याला आणि फूल खालीं पडण्याला एकच गांठ पडली, ह्म० दोन्ही गोष्टी एकाच वेळीं घडल्या. co-incidence.

भरल्या गाड्यास सूप जड नाहीं– सूप वजनांत इतकें हलकें असतें कीं ओझ्यानें लादलेल्या गाड्याला त्याचें ओझें वाटत नाहीं. यावरून अनेक कामांचा बोजा ज्याचे अंगावर आहे त्याच्या अंगावर आणखी थोडेंसें काम येऊन पडलें तरी तो भीत नाहीं हा अर्थ.

भिकेची हंडी शिंक्यास चढत नाहीं– भिकेवर निर्वाह करणारा जें मिळेल तें खाऊन टाकतो, दुसरे दिवसासाठीं शिंक्याला हंडी लावून ठेवण्याचें त्याला कांहीं कारण पडत नाहीं. कारण, पुनः त्याची आपली भिक्षा आहेच !

भीक नको पण कुत्रें आटप– भिकारी दाराशीं गेल्याबरोबर दाराशीं असलेल्या कुत्र्यानें त्याचे लचके तोडण्यास प्रारंभ केला ह्मणजे भिक्षा घालूं नका पाहिजे तर, पण दया करून एवढें कुत्रें आटपा ह्मणजे भरून पावलों असें भिकारी ह्मणतो.

भुकेला कोंडा आणि निजेला धोंडा– चांगली भूक लागली असली ह्मणजे कोंडासुद्धां गोड लागतो आणि झोपेला मनुष्य आला ह्मणजे धोंड्यावर सुद्धां त्याला गाढ झोंप लागते. Hunger needs no sauce, sleepiness no pillow.

मन राजा मन प्रजा– राजा (हुकूम करणारा) आणि प्रजा (हुकूम पाळणारी) दोन्ही मनच; म्हणजे मनच सर्व कांहीं आहे. Mind is Lord paramount and Lord absolute.

मनीं वसे तें स्वप्नीं दिसे– अमकी गोष्ट अशी अशी व्हावी असें आपलें मन इच्छितें आणि ती प्रबळ इच्छा स्वप्नाच्या रूपानें प्रतिबिंबित झालेली आपणांस दिसते. जसें चिंतावें तसें स्वप्न पडतें असा अर्थ.

मूर्ति (किंवा व्यक्ति) तितक्या प्रकृति– भिन्न भिन्न लोकांचा स्व-

भावं भिन्न भिन्न असतो. जितके लोक तितक्या प्रकारचे स्वभाव. *cf.* पिंडे पिंडे मतिर्भिन्ना. Many men, many minds.

**म्हातारीनें कोंवडें झांकून ठेवलें म्हणून उजेडावयाचें राहत नाहीं**— कोंवडा उजेडण्याच्या अगोदर आरवतो; यावरून कोंबड्याच्या आरवण्याचा आणि उजेडण्याचा कार्यकारणभाव आहे असें मात्र नाहीं. उजाडूं नये म्हणून म्हातारीनें कोंबडें झांकून ठेविलें तरी उजाडावयाचें तें उजाडतेंच. सृष्टिक्रमाप्रमाणें गोष्टी होऊं नयेत म्हणून कितीही प्रयत्न केला तरी त्या गोष्टी थांबावयाच्या नाहींत.

**यथा राजा तथा प्रजा**— राजाच्या तंत्रानें प्रजा चालते; तो चांगला नीतिमान् असला तर तीही नीतिमान् निघते असा अर्थ. Like master like man.

**येरे माझ्या मागल्या !**— केलेला उपदेश किंवा शिकविलेली विद्या निष्फळ होऊन मनुष्य पूर्वपदावर आला म्हणजे या सं० चा उपयोग करतात. The slate is as clean as before.

मातापितरांचा वध करणें हें मोठें पातक आहे...त्यांच्या आज्ञेंत राहून त्यांचें कल्याण चिंतणें हाच आपला धर्म अशा पुष्कळ प्रकारांनीं मीं त्याला समजावून सांगितलें, तथापि त्याचें ये रे० तें म्हणून अखेर सुटलें नाहीं. —अतिपीड०

**राजा बोले दळ हाले, काजी बोले दाढी हाले**—राजानें हुकूम सोडतांच सगळें सैन्य एकदम तो हुकूम पाळतें. गरीब बिचारा काजी! तो जर हुकूम सोडूं लागला तर बोलतांना त्याची दाढी काय हालेल तेवढीच, इतर कोण त्याच्या हुकुमाची पर्वा करतो ! A sovereign's word is the law.

**लंकेंत सोन्याच्या विटा**— ( लंका सुवर्णाकरितां प्रसिद्ध होती. ) तेथें हवें तेवढें सोनें असलें तरी आपल्याला त्याचा काय उपयोग? असा अर्थ. Why talk of Utopia?

**वळचणीचें पाणी आढ्याला जात ( चढत ) नाहीं**— ( वळचण म्ह० घराच्या छपराच्या पारव्याची खालची बाजू. आढें म्ह० घराच्या छपराच्या दोन पारव्यांच्या मध्यें जें लांब लांकूड घातलें असतें तें. ) वळचण खालीं व

आढें वर असतें. तेव्हां अर्थातच वळचणीचें पाणी आढ्याला जाणें शक्य नाहीं. यावरून हलकें तें हलकें व थोर तें थोर; हलक्यानें कितीही थोर होण्याचा प्रयत्न केला तरी तें होणें शक्य नाहीं हा अर्थ.

वारा पाहून पाठ द्यावी– देशकालमान पाहून त्याप्रमाणें वागावें. Act according to circumstances.

विशीं विद्या तिशीं धन– वयाच्या विसाव्या वर्षापर्यंत माणसाला विद्या येण्याचा भर असतो आणि तिसाव्या वर्षापर्यंत पैसे मिळण्याचा भर असतो.

व्याप तितका संताप– जितका पसारा मोठा तितकी अधिक काळजी असते. Much good, much care.

शहाण्याला मार शब्दाचा– शहाण्यानें एखादी चूक केली आणि तिच्याबद्दल थोडीशी कडक शब्दांनीं समज दिली ह्मणजे तो उमजतो, त्याला प्रत्यक्ष शारीरिक शिक्षा करावी लागत नाहीं; मूर्ख मात्र छडीवांचून वठणीवर येत नाहीं हा अर्थ. A nod for the wise, a rod for the fool.

शिकविलेली बुद्धि आणि बांधलेली शिदोरी पुरत नाहीं– मनुष्याला उपजतबुद्धिच पाहिजे. ज्याप्रमाणें स्वतः स्वयंपाक करतां येत नसला ह्मणजे मनुष्याचे हाल होतात, तसे उपजतबुद्धि नसलेल्याचे होतात.

शितावरून भाताची परीक्षा– भात शिजला आहे कीं कच्चा आहे हें पाहण्याला भांड्यांतलें नुसतें एक शीत घेऊन पाहणें पुरें होतें, प्रत्येक शीत दाबून पहावयाला नको. यावरून थोड्याशा गोष्टीवरून मोठ्या गोष्टीची परीक्षा करणें हा अर्थ. A straw shows which way the wind blows.

शेरास सव्वाशेर– दुसरा त्याहून सरस अशा अर्थी ही ह्मण योजतात. More than a match.

सत्तेपुढें शहाणपण नाहीं– ज्याच्या हातीं अधिकार आहे तो श्रेष्ठ; त्याच्यापुढें नुसत्या शहाण्या माणसाचें तेज पडत नाहीं. Might is right.

**साखरेचा खाणार त्याला देव देणार**— भाग्यवंताला देवही अनुकूल होतो; कशानाकशा तरी रीतीनें त्याला हव्या असतात तशा गोष्टी घडतात. The rich or the fortunate are favoured by Heaven.

**सारीं सोंगें येतात, पैशाचें सोंग येत नाहीं**— बाकीच्या साऱ्या गोष्टींची जुळवाजुळव करतां येते; पैसे खर्चण्याला मात्र कोणी पुढें होत नाहीं.

**सुंब जळेल पण पीळ जाणार नाहीं**— ( सुंब=काथ्याचा दोरखंड. ) हा जाळला तरी त्याचा पीळ राख झाल्यावरसुद्धां जशाचा तसा राहतो. यावरून एखाद्या माणसाची हानि झाली तरी त्याचा ताठा सुटत नाहीं अशा अर्थी या ह्मणीचा उपयोग करतात. Obstinate lingering of pride &c. after degradation.

**हिरा तो हिरा, गार ती गार**— हिऱ्याचें तेज कधीं लपत नाहीं. गार कोणती व हिरा कोणता हें कोणालाही त्यांच्या तेजावरून सहज कळण्यासारखें असतें. यावरून गुणी माणसाचे गुण आपोआप प्रकट होतात, ते सांगावे लागत नाहींत, आणि थोर कोण व हलका कोण हें तेव्हांच दृष्टोत्पत्तीस येतें असा अर्थ. *cf.* ' काचः काचो मणिर्मणिः '

---

## ६ विविध म्हणी.

**अंगापेक्षां बोंगा मोठा**—( बोंगा = नेसलेल्या वस्त्राचा निऱ्या खोंवण्याच्या जागीं होणारा उंचवटा. ) यावरून खऱ्या गोष्टीपेक्षां अवडंबरच मोठें असा अर्थ. *cf.* Make not thy tail broader than thy wings.

**आगींतून निघून फोपाट्यांत पडणें**—लहानशा संकटांतून निघून मोठ्या संकटांत जाऊन पडणें. ( विस्तवाच्या आगीपेक्षां फोपाट्याची आग अधिक जाचक असते.) To fall from the frying-pan into the fire.

**आठ पुरभय्ये नऊ चौके**— पुरभय्ये लोक दुसऱ्याच्या हातचें खात नाहींत, ह्मणून त्यांच्या घरांत प्रत्येकजणाची स्वयंपाकाची जागा [ चौक ] स्वतंत्र असते. यावरून एकाचें दुसऱ्याशीं जमत नसेल अशा ठिकाणीं या म्हणीचा उपयोग होतो. *cf.* मूर्ति तितक्या प्रकृति.

इकडे आड तिकडे विहीर– दोन्हीकडे पाऊल टाकण्यास वाट नाहीं. दोन्हीकडून सारख्याच अडचणींत सांपडणें. A dilemma.

उथळ पाण्याला खळखळाट फार– ज्याच्या अंगीं गुण थोडा त्याला आढ्यता जास्त असते असा अर्थ. An empty vessel makes much noise.

कर नाहीं त्याला डर कशाला !– ज्यानें दुष्कृत्य–अयोग्य आचरण– केलें नाहीं त्याला भीति ( डर ) कां वाटेल ? वाटणार नाहीं.

करील ती पूर्वदिशा– एखादा मनुष्य जें काय म्हणेल, तें लोकांनीं निमूटपणें कबूल करणें अशा अर्थी ही म्हण वापरतात. 'राजा करील ती पूर्वदिशा आणि भट करील ती अमावास्य' ही म्हण कोंकणांत प्रसिद्ध आहे.

राजा करील ती पूर्वदिशा, लोक राजाचे गुलाम, ह्या ज्या आमच्या कल्पना त्या जशा रामराज्यांत होत्या, तशा अजूनही आहेत. –आगरकर.

करील तें कारण आणि बांधील तें तोरण– *cf.* 'करील ती पूर्वदिशा.' यांत 'कारण' शब्दाचा अर्थ 'राजकारण' असा आहे; तसेंच 'तोरण' हा शब्द 'धोरण' या शब्दाच्या जागीं आलेला आहे.

हबशाच्या राज्यांत 'करील तें कारण आणि बांधील तें तोरण' असा न्याय होता. –नाजी.

काप गेले भोंकें राहिलीं– श्रीमंतांच्या बायका कानांत काप घालीत असतात. यावरून भरभराटीचे किंवा श्रीमंतीचे दिवस गेले आणि त्या वेळच्या गोष्टी तेवढ्या राहिल्या आहेत असा अर्थ. प्रत्यक्ष वैभवाच्या अभावीं त्या वेळच्या वढाईच्या गोष्टी ऐकूनच समाधान मानावें लागतें.

कुंपणानें शेत खाल्लें– कुंपण हें शेताच्या रक्षणासाठीं असतें. तें काम त्याच्यानें झालें नाहीं, उलटें त्यानें गुराढोरांस जाऊं देऊन पीक खाऊं दिलें ( ज्याच्या हातीं रक्षणाचें काम त्यानेंच नुकसान होऊं दिलें ) म्हणजे ही म्हण लावतात.

केळीवर नारळी आणि वर चंद्रमौळी– केळी म्हणजे मातीचा घागर, नारळी = नारळाचा आई म्ह० नरोटी; चंद्रमौळी = चंद्र ज्याच्या डोक्यावर

आहे ( ज्या घरांतून वर पाहिलें म्हणजे चंद्र दिसतो; अर्थात् मोडकें-तोडकें घर ). एकंदरींत अत्यंत दारिद्र्यावस्था हा अर्थ. Extreme poverty.

**कोरड्याबरोबर ओलें जळतें**– चुलींत चार लांकडें कोरडीं घातलीं आणि त्यांच्याबरोबर एखादें ओलें घातलें तर तें ओलें लांकूडसुद्धां जळतें; यावरून लाक्षणिक अर्थ असा कीं, अपराध्याबरोबर एखादा गरीब निरपराधी मनुष्यही चिरडला जातो.

**गवयाचें पोर रडलें तरी सुरावरच रडणार**– आनुवंशिक संस्काराची थोरवी वर्णन करतांना या ह्मणीचा उपयोग करतात. नेहमीं शास्त्रोक्त पद्धतीचें गाणें कानीं पडल्यामुळें गवयाच्या मुलालासुद्धां सुरांची चांगली माहिती आपोआप झालेली असते.

**गाजराची पुंगी वाजली तर वाजली, नाहीं तर मोडून खाल्ली**–– वाजवावयाची पुंगी गाजराची केली आणि ती चांगली वाजूं लागली तर बरेंच झालें, नाहीं वाजली तर त्यांत ती करणाराचें कांहीं नुकसान नाहीं. कारण ती वाटेल तेव्हां मोडून खातां येईल. एखादी गोष्ट करून सिद्धीला गेली तर उत्तमच, नाहीं गेली तरी तींत नुकसान नाहीं, तिचा उपयोग अन्य तऱ्हेनें करून घेतां येईल असा अर्थ.

**गाड्याबरोबर नळ्याला यात्रा**– मोठ्या लोकांबरोबर त्यांच्या आश्रितांनाही लाभ अनायासें घडतो. ( जसें– गाडा यात्रेला गेला ह्मणजे चाकाला तेल देण्याचा नळा गाडीला बांधलेला असतो तो त्याच्याबरोबर अनायासेंच जातो. )

गाड्या० या न्यायानें करमणुकीखातर परक्या भाषांचा अभ्यास केला असतां त्यापासून दुसरेही पुष्कळ फायदे करून घेतां येतील. –केसरी.

**घ्याची विद्या येते पण दद्याची विद्या गांवीं नाहीं.** – घेणें ठाऊक आहे, देणें ठाऊक नाहीं.

**घरचें झालें थोडें व्याह्यानें धाडलें घोडें**– मनुष्याला स्वतःच्याच कामकाजासंबंधाच्या पुष्कळ गोष्टी कर्तव्य असतां दुसऱ्यांनीं आपलेंही काम त्याच्यावर लादलें म्हणजे ही म्हण योजतात. ( घरचीं घोडीं पोसणें जड

झालें असतां ज्याह्यानें आपलेंही घोडें पाठविलें म्हणजे दुष्काळांत तेरावा महिना अशी स्थिति होते. )

चालत्या गाडीला खीळ घालणें— सुरळीत चाललेल्या कामांत विघ्न करणें. To put a spoke in the wheel.

चावडीवर दरवडा— चावडी म्हणजे गांवच्या सरकारी अधिकाऱ्यांची कचेरी. ज्यानें लोकांचें संरक्षण करावयाचें त्याला स्वतःचेंच रक्षण करतां येईनासें झालें म्हणजे ही म्हण योजतात.

चुकला फकीर मशिदींत सांपडावयाचा— मुसलमान फकिरांचें वसणें उठणें बहुधा मशिदींतच असावयाचें; यावरून एखाद्याच्या नेहमींच्या वसण्याउठण्याच्या जागेसंबंधानें ही म्हण योजतात.

ज्याचें कुडें त्याचे पुढें— दुसऱ्याचें वाईट जो चिंतितो त्याचेंच वाईट होतें. Evil to him who evil thinks.

तहान लागल्यावर विहीर खणणें— अगदीं आयत्या वेळीं कामाला लागणें. Have not thy cloak to make when it begins to rain.

ता ह्मणतां ताकभात समजावा— यत्किंचित् अंशावरून सगळ्या गोष्टी अंदाजानें समजाव्या.

ताटांत सांडलें काय आणि वाटींत सांडलें काय एकच— भिन्नता नाहीं असा अर्थ. ताटांत सांडलें किंवा वाटींत सांडलें तरी तें वायां जात नाहीं, खाणाराच्या पोटांतच जावयाचें.

संभाजीराजे व व्यंकोजीराजे कोणी परके नाहींत. त्यांच्याकडे असलेला मुलूख आपल्याकडेच असल्यासारखा आहे. 'ताटां०'........ —बाजीराव.

ताटावरचें पाटावर, पाटावरचें ताटावर— श्रीमंतीचा डौल. श्रीमंतांच्या वायका काम न करतां आळसांत किंवा चैनींत वेळ घालवितात हें दाखविण्यासाठीं ही ह्मण योजितात.

तीर्थ आहे तर भट नाहीं, भट आहे तर तीर्थ नाहीं— एखाद्या कार्याला दोन गोष्टींची अवश्यकता असते आणि या दोहोंपैकीं कोणती

तरी एक नेहमीं अनुकूल असते, पण दोन्ही एकदम नसतात, तेव्हां ही म्हण योजतात. *cf.* दांत आहेत तर चणे नाहींत चणे आहेत तर दांत नाहींत.

**दगडावरची रेघ**— कधीं न फिरणारी गोष्ट. दगडावर खोदलेली रेघा कायमची होते, बुजत नाहीं; यावरून कायमची, अगर खात्रीची गोष्ट असा अर्थ. ( याच्या उलट ' पाण्यावरची रेघा ' ) A certainty.

**दिलमें चंगा तो काठवडमें गंगा**— ( चंगा=शुद्ध; काठवट=परातीसारखें रुंद पात्र. ) मन शुद्ध, व निष्कलंक असलें तर त्याला गंगास्नानासाठीं काशीला जाण्याचें कारण नाहीं. घरच्या पाण्यानें स्नान केलें तरी गंगास्नानाचें श्रेय त्याला मिळतें. He that hath a merry heart hath a continual feast.

**दिवस बुडाला, मजूर उडाला**— सूर्य अस्तास गेल्याबरोबर मजूर आपलें काम बंद ठेवून घरीं चालता होतो. मनापासून काम न करणाऱ्या माणसाविषयीं ही म्हण योजतात.

**दृष्टिआड सृष्टि**— आपल्या मागें काय चालतें तें कोणाला दिसतें आहे ! We know but as far as we see.

**देखल्या देवा दंडवत**— सहजगत्या केलेला नमस्कार. भक्तिपूर्वक नव्हे.

**देणें नास्ति घेणें नास्ति**— ( हें धेडगुजरी संस्कृत आहे. ) याचा अर्थ कोणताही व्यवहार करणें नाहीं असा अर्थ.

**दे माय धरणी ठाय होणें**— पुरेपुरेसें होणें; संकटें कोसळलीं असतां मनुष्याच्या मनाचा धीर सुटणें.

**देश तसा वेष**— परिस्थितीप्रमाणें वर्तन. *cf.* काशी गये गंगादास, मथुरा गये जमनादास.

**दोहीं घरचा पाहुणा उपाशीं**— एखाद्याची दोन ठिकाणीं जेवण्याची सोय असली म्हणजे पुष्कळ वेळां असें घडतें कीं एका ठिकाणच्या मंडळीला वाटतें कीं, तो दुसऱ्या ठिकाणीं जेवला असेल म्हणून ती मंडळी जेवून घेते; दुसऱ्या ठिकाणच्या मंडळीलाही तसेंच वाटून तीही जेवून बसते आणि पाहुणा मधल्यामध्यें उपाशीं रहातो. *cf.* दोन्ही डगरींवर हात ठेवणारा पडतो. Between two stools you come to the ground.

नासलें मिरें जोंधळ्याला हार जात नाहीं– एखादी उंची वस्तु कितीही हीन दशेस आली, तरी मूळच्याच हीनजातीच्या वस्तूपेक्षां ती केव्हांही श्रेष्ठ ठरते हा अर्थ.

पडत्या फळाची आज्ञा– एखादा मनुष्य झाडाखालीं बसला आहे आणि झाडाचें फळ तोडून खावें अशी त्याला इच्छा झाली आहे, अशा वेळीं फळ तुटून आयतेंच त्याच्याजवळ येऊन पडलें तर तो तत्काळ तें तोंडांत घालून आपली इच्छा तृप्त करून घेईल. ' मला तूं खा ' अशी त्या फळाची आज्ञा त्याच्या पथ्यावरच पडेल. त्यावरून आपल्या इच्छेप्रमाणें आयतेंच काय घडून येत असतां तें तत्काळ घडवून आणावें अशाविषयींची जी माणसाची आतुरता असते तिला ही म्हण लावतात.

इतकें झाल्यावर त्रिवेणीला आणखी काय पाहिजे होतें ? पडत्या फळाची आज्ञा झाल्याबरोबर ती आल्या वाटेनें चालती झाली. –शिलादित्य.

पदरीं पडलें, पवित्र झालें– जी गोष्ट एकदां स्वीकारली व फिरवितां येण्यासारखी नाहीं, ती वाईट असल तरी मुकाट्यानें तिच्यांत समाधान मानून रहाणें हें योग्य. ( एकदां पदरांत पडलेली भिक्षा कशीही असली तरी तिला नांवें न ठेवितां पवित्र समजून चाललें पाहिजे. )

पुनरपि जननं पुनरपि मरणम्– मूळ अर्थ जन्ममृत्यूचा फेरा. यावरून पुनः पुनः तीच ती गोष्ट करणें व तिच्याबद्दल शिक्षा भोगणें असा अर्थ.

पूर्वेचा सूर्य पश्चिमेस उगवेल– जी अशक्य गोष्ट तीसुद्धां घडून येईल.

फार झालं, हसूं आलें– दुःखाचा अतिरेक झाला म्हणजे त्याबद्दल खेद वाटण्याचें बंद होतें. *cf*. रोज मरे त्याला कोण रडे.

बाव्या गेला आणि दशम्याही गेल्या– दोन्ही गोष्टींस मुकला अशा अर्थी ही म्हण वापरतात.

बुगड्या गेल्या पण भोंकें राहिलीं– बायका कानांत बुगड्या नांवाचा अलंकार घालतात. गरिबी आली म्हणजे बुगड्या जातात. पण त्या घालण्यासाठीं कानाला जीं भोंकें टोंचलेलीं असतात तीं बुजत नाहींत. यावरून पूर्वीचें वैभव गेलें तरी त्याच्या खुणा मागें राहिल्या असा अर्थ. *cf*. काप गेले भोंकें राहिलीं.

मूळ चाल सुरू होण्यास झालेलीं कारणें जरी नष्ट झालीं तरी 'बुगड्या गेल्या पण भोंकें राहिलीं' या म्हणीप्रमाणें कोणतीही चाल त्या कारणाबरोबर नष्ट होत नाहीं. —नि० चं०

**मस्करीची होते कुस्करी**— थट्टेचा परिणाम पुढें भांडणें होण्यापर्यंत जातो. What begins in play may end in fray.

**माझें जेवण चुलींत**— एक बाई नवऱ्यासाठीं साधा स्वैंपाक करून स्वतः-साठीं मात्र कांहीं चांगला पदार्थ करून तो चुलींत लपवून ठेवी, आणि नवऱ्यानें पान वाढून घेण्याला सांगितलें ह्मणजे ह्मणे, 'माझें जेवण चुलींत.' जणूं काय खाण्यापिण्यासंबंधानें तिची कांहीं तक्रार नाहीं, तिला हवें तें चालतें. एके दिवशीं नवऱ्यानें तिची लबाडी बाहेर काढली. यावरून बाह्यतः निरिच्छपणा दाखविणारांच्या लबाडीविषयीं बोलावयाचें असतां ही ह्मण योजतात.

**मातीचे कुल्ले लावल्यानें लागत नाहींत**— उसने आणिलेलें प्रेम टिकत नाहीं. प्रेम हें स्वाभाविक असलें तरच तें टिकतें.

**राजाला दिवाळी काय माहीत !**— राजाच्या घरीं नेहमीं खाण्या-पिण्याची चंगळ आणि रोषनाई असावयाची, तेव्हां त्याची रोजचीच दिवाळी असते. यावरून जो नेहमीं सुखांत रहाणारा त्याला अमकाच एक दिवस आनंदाचा असा नसतो हा अर्थ.

**रात्र थोडी, सोंगें फार**— नाटक मोठें असलें ह्मणजे त्यांत सोंगें पुष्कळ आणतां आणतां रात्र संपून जाते. यावरून कामें पुष्कळ आणि वेळ थोडा असा अर्थ. *Ars longa, vita brevis. cf.* शास्त्रें फार अपार जीवित तुझें अत्यल्प कीं मानवा ।

'रात्र०' यामुळें अथपासून इतिपर्यंत सर्व जगाचा संपूर्ण इतिहास कोणाच्यानेंही शिकवणार नाहीं हें उघड आहे. —बाजीराव.

**रोज मरे त्याला कोण रडे**— तीच ती गोष्ट वारंवार होऊं लागली म्हणजे तिच्यांतलें स्वारस्य जातें व कोणी तिकडे लक्ष देत नाहींत.

आणखी रोज मरे त्याला कोण रडे ह्मणतात ना ? तशांतली गत. नेहमीं तसलींच बोलणीं. या कानानें ऐकावीं आणि या कानानें सोडून द्यावीं.

लागो भागो दिवाळी– लागो ( नुकसान लागो ), भागो ( उत्पन्नांत खर्च भागो ), दिवाळी करणें ( दिवाळीच्या पाडव्याला उद्योगधंद्याला प्रारंभ करणें ). नफा होवो कीं तोटा होवो तिकडे न पाहतां व्यापार करून नशि-ाचाची परीक्षा पाहणें.

[ कित्येकजण या म्हणींची उपपत्ति निराळ्या रीतीनें देतात. ती अशीः—लागो ( नेम लागो ), भागो ( चुको ), दिवाळी ( दिवाळीचा सण करावयाचा ), नाशि-बावर अवलंबून राहून चैनींत कमी पडूं द्यावयाचें नाहीं. ]

वाऱ्यावर वरात आणि दर्यावर हवाला– वरात म्ह० एखाद्यास द्रव्य देण्याविषयीं दिलेली चिठ्ठी ( चेक ). या वरातींत कोणाला किती पैसे द्यावयाचे तें लिहिलेलें असतें. यावरून वाऱ्यावर ( कोणाचेंही नांव न घालतां–वाटेल त्याला ) वरात देणें, म्हणजे बेजबाबदारीचें काम, असा अर्थ

सगळें मुसळ केरांत– मुख्य महत्त्वाच्या गोष्टीकडे दुर्लक्ष झालें म्हणजे या म्हणीचा उपयोग करतात.

समुद्राच्या खाऱ्या पाण्यानें तोंड धुवून ये– एखादी गोष्ट आप-णांस करावयाची नसली, आणि ती करण्याविषयीं एखाद्याचा फार आग्रह असला म्हणजे समुद्राच्या पाण्यानें तोंड धुवून येण्यासारखी कांहीं तरी भलती अट घालून ती गोष्ट न करण्याविषयींची आपली इच्छा आपण बोलून दाखवितों. सभ्यपणाच्या भाषेंत या म्हणीचा उपयोग होत नाहीं, थट्टेंत होतो.

सरासरी गुडघाभर पाणी–एका माणसाला नदी उतरून जावयाचें होतें. त्याला पोहतां येत नव्हतें. म्हणून त्यानें दुसऱ्याला विचारलेंः ' नदींत पाणी किती आहे ? ' ज्याला विचारलें तो गणिती होता. त्यानें पाहिलें कीं नदींत सगळ्या ठिकाणीं सारखें पाणी आहे असें नाहीं. कांहीं ठिकाणीं पुरुषभर, कांहीं ठिकाणीं कमरेइतकें व कांहीं ठिकाणीं पाऊल बुडण्याचीही पंचाईत इतकें आहे, तेव्हां सगळ्यांची सरासरी काढून सरासरी गुडघाभर पाणी आहे असें त्यानें सांगितलें. गुडघाभर पाण्यांतून आपणाला चालत जातां येईल असें वाटून तो गृहस्थ नदींत उतरला आणि बुडून मेला. तात्पर्य, सरासरी ही पुष्कळ वेळां फसवणूक करणारी असते. The misleading average.

सांगितल्या कामाचा आणि दिल्या भाकरीचा–ज्याला स्वतः विचार करण्याची शक्ति नाहीं, तथापि सांगितलेलें काम जो मुकाट्यानें करतो आणि

जें वेतन देतील तें घेतो असा चाकर. A servant who, having no will or capacity of thought of his own, does as he is bidden to do and eats what is given.

**सोन्याहून पिंवळें**– फार उत्तम. Better even than gold.

**हजीर तो वजीर**– जो प्रथम हजर होईल त्याला पहिल्यानें लाभ मिळेल. First come, first served.

**हलवून खुंटा बळकट करणें**– एखाद्या गोष्टीचा निकाल आपले विरुद्ध झाला असतां पुनः तीच गोष्ट अयोग्य वेळीं किंवा अयोग्य रीतीनें काढून पूर्वींचा प्रतिकूल निकाल पक्का करून घेणें. पूर्वींचा निकाल पुढें मागें कदाचित् फिरला असता, पण आतां तीही आशा नष्ट करून टाकणें. (जात्याचा खुंटा नीट पक्का बसला आहे कीं नाहीं, हें पाहण्यासाठीं तो हलवून पाहतात व हलला तर पाचर मारून तो बळकट करतात.)

---

संप्रदायांची व ह्मणींची

# वर्णानुक्रमसूचि.

( या सूचींत दिलेले आंकडे पृष्ठांचे आहेत. )

